रावबहादुर

# शंकर पांडुरंग पंडित

## यांचें चरित्र


लेखक

**श्रीनिवास नारायण कर्नाटकी**

डॉ. सर रा. गो. भांडारकर यांचें चरित्र,
नामदार न्या. का. त्रिं. तेलंग यांचें चरित्र,
डॉक्टर भाऊ दाजी लाड यांचें चरित्र,
या पुस्तकांचा कर्ता.



१९३५

प्रकाशक :

**व्ही. प्रभा आणि कंपनी,**

गिरगांव, मुंबई ४

**किंमत १ रुपया.**

# अनुक्रमणिका.



# प्रस्तावना



रावबहादुर शंकर पांडुरंग पंडित यांचें, शक्य तेवढी माहिती मिळवून, एक चरित्र लिहावें अशी फार दिवसांची माझी इच्छा होती. त्याप्रमाणें परमेश्वरकृपेनें हें चरित्र तयार होऊन आज प्रसिद्ध होत आहे. हें मी लिहिलेलें चवथें चरित्र आहे. तरी हीं चार चरित्रें लिहिण्याचा मुख्य हेतु, तीं लिहीत असतांना कित्येक बाबतींत अनुसरलेलें धोरण व माझ्या पुस्तकांच्या संबंधानें एकंदरींत मला आलेला अनुभव यांविषयीं इकडे चार शब्द लिहिणें योग्य दिसतें.

सदरील चार चरित्रें लिहिण्यांत माझा मुख्य हेतु हाच कीं, चरित्रनायकांची आपल्या महाराष्ट्रांतील लोकांस–विशेषेंकरून तरुण व होतकरू मंडळींना–माहिती व्हावी. डॉ. भांडारकर, न्या. तेलंग, डॉ. भाऊ दाजी व रा. ब. पंडित हे आपल्या महाराष्ट्रांत अत्यंत विद्वान्, थोर व कर्तबगार पुरुष होऊन गेले व त्यांनीं देशाची मोठी कामगिरी केली आहे. त्यामुळें त्यांच्यासंबंधाची प्रस्तुत पिढींतील लोकांना माहिती असणें जरूर आहे. डॉ. भांडारकर हे हल्लींच—सन १९२५ मध्यें–परलोकवासी झाल्यामुळें त्यांच्याविषयींची लोकांस कांहींतरी माहिती असणें संभवनीय आहे. पण न्या. तेलंग, डॉ. भाऊ दाजी व रा. ब. पंडित हे दिवंगत होऊन बराच काळ–तेलंग जाऊन बेचाळीस वर्षें झालीं, पंडित जाऊन एकेचाळीस वर्षें झालीं व डॉ. भाऊ दाजी जाऊन एकसष्ट वर्षें झालीं !—लोटल्यामुळें त्यांच्यासंबंधाची माहिती–कदाचित् त्यांच्या नांवांपलीकडे–प्रस्तुत पिढींतील लोकांस असण्याचा संभव नाहीं. याचें मुख्य कारण एवढेंच कीं, मराठींतील प्रसिद्ध लेखकांचें त्या थोर पुरुषांकडे व त्यांच्या कामगिरीकडे आजवर लक्ष गेलें नाहीं, त्यामुळें त्या चार

पुरुषांसंबंधाची शक्य तेवढी माहिती मिळवून मी त्यांचीं चरित्रें यथामति लिहिलीं, व तीं एक दोन वर्षांच्या अंतरानें अशीं हल्लींच प्रसिद्ध केलीं. रा. ब. पंडितांचें चरित्र तयार होऊन तीन वर्षें झालीं. त्याच्या प्रसिद्धीचा योग आतां आला आहे.

वर सांगितलेली चार चरित्रांसंबंधाची माहिती जमवीत असतांना आपल्या लोकांत वसत असलेला "ऐतिहासिक दृष्टीचा अभाव" हा दोष मला जिकडे तिकडे आड येत होता हें मोठ्या दुःखानें कबूल केलें पाहिजे. वरील पुरुषांपैकीं–फक्त डॉ. भांडारकर खेरीज करून–कोणीच रोजनिशी ठेवलेली आढळली नाहीं. त्यामुळें रोजनिशा किंवा चरित्रनायकांनीं लिहिलेलीं अगर त्यांना आलेलीं पत्रें अशीं प्रत्यक्ष माहिती पुरविणारीं साधनें—डॉ. भांडारकर शिवाय करून–कोणाच्याच बाबतींत मिळालीं नाहींत. सबब चरित्रनायकांनीं लिहिलेले निबंध किंवा पुस्तकें, वर्तमानपत्रांच्या जुन्या फायली व शक्य असेल त्या ठिकाणीं कांहीं जुन्या मित्रांकडून मिळालेली माहिती इतक्यांचाच उपयोग करून सदहू चरित्रें लिहिलीं आहेत.

दुसरी सांगण्यासारखी गोष्ट म्हणजे वरील चारही चरित्रनायक हे संस्कृतज्ञ पंडित असल्यामुळें त्यांनीं आपल्या वेळीं चालू असलेल्या अनेक प्राचीन वाङ्मयात्मक वादविवादांत भाग घेऊन कांहीं महत्त्वाचे ऐतिहासिक शोध लावले आहेत. पण त्यासंबंधाचा बारीकसारीक तपशील मी आपल्या चरित्रांत दिलेला नाहीं. चरित्रें हीं सामान्य वाचकांकरितां लिहिलेलीं असल्यामुळें त्यांत वरील सारखा विस्तार करण्याचें मला प्रयोजन वाटलें नाहीं; व हेंच धोरण बरोबर होतें असें संशोधनक्षेत्रांत काम करणाऱ्या एका विद्वान् गृहस्थांचें मत पडलें. फक्त चरित्रनायकांनीं लिहिलेल्या महत्त्वाच्या लेखांचा अगर निबंधांचा थोडक्यांत सारांश देऊन बाकीच्या लेखांचा मी नुसता नामनिर्देश केला आहे.

पुस्तकें प्रसिद्ध झाल्यावर त्यांवर कांहीं वर्तमानपत्रांतून व नियतकालिकपुस्तकांतून नेहमीं प्रमाणें अनकूल-प्रतिकूल टीका प्रसिद्ध झालेली असून त्यांत कित्येकांनीं उपयुक्त सूचना केल्या आहेत, त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहें. दुसऱ्या आवृत्तीचा योग आल्यास त्या सूचनांचा जरूर विचार करण्यांत येईल. एका गोष्टीचा

इकडे खुलासा करणें जरूर आहे. मी डॉ. भांडारकरांचें चरित्र जेव्हां प्रसिद्ध केलें त्याच्या पूर्वी थोडे दिवस रा. रा. नरसिंह चिंतामण केळकर यांनीं लिहिलेलें लोकमान्य टिळक यांचें चरित्र प्रसिद्ध झालें होतें. त्याचप्रमाणें पुढें डॉ. भांडारकर हे परलोकवासी झाल्यावर सर्व वर्तमानपत्रांतून रीती-प्रमाणें त्यांच्यासंबंधाचे दुखवट्याचे लेख प्रसिद्ध झाले. पण त्यांपैकीं कांहीं लेखांवरून व वर सांगितलेल्या केळकरलिखित टिळकचरित्रावरून असें स्पष्ट दिसून आलें कीं, डॉ. भांडारकरांसंबंधानें लोकांचे बरेच गैरसमज झालेले आहेत. अर्थात् त्याच सुमारास प्रसिद्ध होणाऱ्या डॉ. भांडारकरांच्या चरित्रामध्यें त्या गैरसमजांसंबंधानें–डॉक्टरसाहेबांची खरी बाजू काय होती वगैरे संबंधानें –कांहींतरी खुलासा होणें जरूर होतें. त्याप्रमाणें मी माझ्या पुस्तकांत जरूर ते आधार व उदाहरणें देऊन तसा खुलासा केला आहे. पुस्तकाची एक प्रत रीतीप्रमाणें केसरीकडे पाठविण्यांत आली होती व त्या पत्रांत भांडारकर चरित्रावर टीका येईल असेंहि मला वाटलें होतें; पण केसरीं-तील परीक्षण बऱ्याच सरळ बुद्धीनें केलेलें आहे हें कबूल केलें पाहिजे. परंतु, त्या परीक्षणांत ज्या मुख्य मुद्यांवर माझ्या अपेक्षेप्रमाणें टीका याव-याची ते मुद्देच मुळीं गाळण्यांत आलेले दिसले ! परीक्षणकर्त्यानें बाकी जे किर-कोळ एकदोन आक्षेप घेतले होते त्यांत महत्त्वाचें असें कांहीं नव्हतें. भांडारकर चरित्राचें सबंध परीक्षण ज्यांना पाहाण्याची इच्छा असेल त्यांनीं तें केसरीच्या ता. ४ सप्टेंबर १९२८ च्या अंकांत प्रसिद्ध झालेलें आहे तें अवश्य पाहावें.

पुण्याचे प्रसिद्ध साहित्य–सेवक व "आनंद" कर्ते कै. वासुदेव गोविंद आपटे यांनीं "आनंदा"च्या सन १९२८ फेब्रुवारीच्या अंकांत डॉ. भांडार-करांच्या चरित्रावर पुढील प्रमाणें अभिप्राय दिला आहेः–"मराठी भाषेंत जे कित्येक उत्कृष्ट चरित्रग्रंथ झाले आहेत त्यांत या ग्रंथाची गणना करतां येईल. चरित्रनायकासंबंधाची सर्व लेखी व तोंडी उपलब्ध माहिती मिळवून, ती व्यव-स्थित रीतीनें जुळवून आणि तिचा समयोचित उपयोग करून, एकाद्या पुरुषाच्या हातून घडलेल्या बऱ्यावाईट कृत्यांचें निर्विकारमनानें समालोचन करण्याचें, आणि विशेषतः त्या पुरुषाचा स्वभाव, योग्यता व चारित्र्य यांच्यासंबंधानें न्यायबुद्धीला तंतोतंत अनुसरून निश्चयात्मक मत ठरविण्याचें काम अतिशय

कठीण असतांही रा. कर्नाटकी यांनीं प्रस्तुत चरित्राच्या द्वारें तें उत्तमप्रकारें केलें आहे. त्याच्याबरोबर टीकाकारांविषयीं योग्य आदरभाव मनांत वागवून त्यांच्या टीकेंतल्या दोषांचें आविष्करण व गुणांचें ग्रहण कसें करतां येतें तेंहि रा. कर्नाटकी यांनीं दाखविलें आहे. चरित्रग्रंथ आटोपशीर, चित्ताकर्षक, आणि बोधप्रद झाला आहे. "

तदनंतर कांहीं दिवसांनीं रा. रा. ना. गो. चापेकर यांनीं " महाराष्ट्र–साहित्य-पत्रिका " ( ता. २८ जून १९२८ ) या मासिकांत डॉ. भांडारकरांच्या चरित्रावर बरीच विस्तृत टीका केली आहे. त्या टीकेचें स्वरूप काय होतें हें ज्यांना पाहावयाचें असेल त्यांनीं ती टीका मूळांतच जरूर वाचावी. चापेकरांना त्या पुस्तकांत एकही गुण दिसला नाहीं, हें तर झालेंच, पण आपल्या परीक्षणाच्या शेवटीं, " रा. कर्नाटकींनीं जे परिश्रम घेतले आहेत त्यांचें महाराष्ट्रीय वाचकवर्ग चीज करो, " अशी जी डॉ. रँग्लर परांजपे यांनीं आपल्या ( डॉ. भांडारकरांच्या चरित्रास जोडलेल्या ) प्रस्तावनेंत उदारमनस्कतेची द्योतक अशी इच्छा प्रकट केली आहे, ती सफळ होणार नाहीं अशी चापेकरांनीं मोठें थोर मन करून भीति व्यक्त केली आहे ! किंबहुना तें पुस्तक कोणी वाचूंही नये अशी चापेकरांनीं ( आपली स्वतःची ) इच्छा प्रकट केली आहे असें म्हटल्यासही चालेल ! चापेकरांनीं तसें म्हटलें असतें, तरी हरकत नाहीं; पण माझें म्हणणें एवढेंच कीं, चापेकरांना माझ्या पुस्तकांसंबंधानें जें काय लिहावयाचें होतें तें त्यांनीं तें पुस्तक आधीं नीट वाचून मग लिहिलें असतें तर बरें झालें असतें ! आतां त्यासंबंधीं विस्तार करण्यांत अर्थ नाहीं. फक्त चापेकरांनीं आपल्या परीक्षणलेखांत जीं **तीन महत्त्वाचीं विधानें** केलीं आहेत तींच जशींचीं तशीं इकडे देऊन त्याच्याच शेजारीं मूळ पुस्तकांत माझें म्हणणें काय होतें तें देतों, म्हणजे खरा प्रकार काय आहे हें वाचकांस सहज कळून येईल.

**रा. चापेकरांचें विधान नं. १.**

" डॉ. साहेब राजकारणी पुरुष होते असें दाखविण्याचा त्यांनीं ( कर्नाटकींनीं) आटोकाट प्रयत्न केला आहे."

**रा. कर्नाटकींचें मूळ म्हणणें.**

" गुरुवर्य हे राजकीय बाबतींत **कधीं प्रमुखत्वानें फारसे पडले नाहींत.** व या बाजूला त्यांच्या मनाची

( पाहा, महाराष्ट्र–साहित्य–पत्रिका, ता. २८-६-२८; पृष्ठ १४, खालून ५ व ६ ओळी )

प्रवृत्तिहि नव्हती." ( पाहा, भांडारकरांचें चरित्र, पृष्ठ १६७, वरून ३ व ४ ओळी. ) पुन्हां पृ. ३८९ वर २३ व्या प्रकरणाचें पहिलें वाक्य असें आहे: "डॉ. भांडारकर हे राजकीय बाबतींत **प्रामुख्यानें कधीं पडले** नाहींत."

माझ्या मूळ म्हणण्यांत व चापेकरांच्या विधानांत अंतर किती आहे तें सुज्ञ वाचकांनीं पाहावें, व चापेकरांच्या बाजूस सत्याचा अंश कितीसा आहे हेंहि ठरवावें. मी माझें मूळचें विधान किती जपून केलें आहे हें कोणाच्याहि लक्षांत येण्यासारखें आहे. खरा प्रकार असा होता:—डॉक्टरसाहेबांच्या कांहीं आक्षेपकांनीं ते राजकीय बाबतींत कधीं पडत नसत हा दोष कल्पून गुरुवर्यांवर अनुदारपणाची टीका केली होती. त्यांचा आरोप किती निराधार होता हें दाखविण्याकरितां मी डॉ. भांडारकरांचा राजकीय बाबतींत संबंध आल्याचीं दोन चार उदाहरणें माझ्या पुस्तकांत दिलीं होतीं. यांत अयोग्य असें कांहींच नव्हतें व डॉ. भांडारकरांना मी मोठे राजकारणी पुरुष बनविण्याचा प्रयत्न केला आहे असें कोणाही समंजस मनुष्यास वाटण्याचें कारण नव्हतें. पण चापेकरांनीं इतकी उदारवृत्ति कां ठेवावी ! फिरून दुसरी गंमत पाहा. मी सांगितलेली डॉ. भांडारकर हे दोन वेळ राष्ट्रीयसभेंत हजर असल्याची तेवढी गोष्ट भांडारकरांच्या राजकारणाची थट्टा करण्यापुरती चापेकरांना **चक्क** दिसली ! आणि त्याच्याच पुढें सन १८८९ सालीं आमच्या देशांत मिस्टर केन यांनीं सरकारी अबकारीखात्याविरुद्ध चालविलेल्या चळवळींत डॉ. भांडारकरांनीं ते सरकारी नोकरींत होते तरी प्रामुख्यानें भाग घेतला होता ही, व पुढें कांहीं दिवसांनीं महात्मा गांधी यांनीं आपल्या दक्षिण आफ्रिकेंतील चळवळीला पुणेकरांचा पाठिंबा मिळविण्याकरितां जेव्हां येथें सभा भरविली तेव्हां ना. गोखले व लो. टिळक यांच्याच सूचनेवरून डॉ. भांडारकरांनीं अध्यक्षस्थान स्वीकारून गांधींना महत्त्वाचें साहाय्य केलें ही, अशा ज्या दोन महत्त्वाच्या गोष्टी मी सांगितल्या आहेत **त्या मात्र चापेकरांना दिसल्या नाहींत** ! चापेकरांची दृष्टि किती सरळ व निर्विकार !

**रा. चापेकरांचें विधान नं २.**

" पुराणवस्तुसंशोधनाच्या कामीं अग्रमान भाऊ दाजींचा आहे. होमर-रामायणवादांत तेलंगांच्या निबंधाचीच आठवण प्रथम झाली पाहिजे. पण श्री. कर्नाटकी यांनीं या उभयतांना दुय्यम स्थानच दिलें आहे." (पाहा, म. सा. प. पृ. १५, खालून ओळी १ व २).

**रा. कर्नाटकींचें मूळ म्हणणें.**

"ह्या क्षेत्रांत ( पुराणवस्तुसंशोधनक्षेत्रांत ) अल्पसा कां होईना-पण मुंबईइलाख्यापुरतें बोलावयाचें म्हटल्यास-**प्रथम प्रवेश** कै. बाळशास्त्री जांभेकर व **कै. डॉ. भाऊ दाजी** या दोघांनीं केला" (पाहा, भां. च. पृ. १२३, वरून १५, १६, १७ ओळी ) तसेंच पुढें भां. च. पृ. १६३, वरून ओळी १३ व १४) "या विषयावर (होमर-रामायणवादावर ) कै. न्या. तेलंगांनीं लिहिलेला निबंध तर प्रसिद्धच आहे."

चापेकरांचें विधान वस्तुस्थितीस अगदीं सोडून-अतएव असत्य आहे—चापेकरांना जांभेकर शास्त्रीबुवांची माहिती नाहीं असें दिसतें. पण भाऊ दाजींना मी **स्पष्टपणें अग्रमान** दिलाच आहे, व तेलंगांच्या निबंधाची मला आठवण झालीच होती. **भांडारकरांच्या चरित्रांत** भाऊ दाजी व तेलंग यांना **प्रथम** स्थान द्यावयाचें आणि **स्वतः भांडारकरांना दुय्यम स्थान** द्यावयाचें, ही चापेकरांनीं काढलेली कल्पना मात्र मला सुचली नाहीं ! मी माझें पुस्तक कोणाला पहिला तर कोणाला दुसरा नंबर द्यावा या हेतूनें लिहिलें नाहीं. विषयाच्या स्वरूपाप्रमाणें जें ज्याचें देणें असेल तें त्याचें दिलें पाहिजे ( Every one should be given his due ) या सरळ बुद्धीनें लिहिलें आहे. प्राचीन वस्तुसंशोधनक्षेत्रांतच काम करणाऱ्या आमच्या सन्मान्य देशबंधूंचा आदरपूर्वक उल्लेख करतांना डॉ. भांडारकरांच्या बरोबर बंगालकडचे रमेशचंद्र दत्त, राजेंद्रलाल मित्र व मुंबईच्या बाजूचे भाऊ दाजी, भगवानलाल इंद्रजी, काशीनाथपंत तेलंग, शंकर पांडुरंग पंडित, काशीनाथ बापूजी पाठक व बाळ गंगाधर टिळक यांच्याही नांवांचा उल्लेख केला आहे. टिळकांनीं लिहिलेल्या "गीतारहस्य" या पुस्तकाबद्दल याच चरित्रांत एके ठिकाणीं तो मराठी भाषेंत "एकमेवाद्वितीयम्" इतक्या योग्यतेचा ग्रंथ आहे

असें म्हटलें आहे. पण या सर्व गोष्टी कोणास ? निर्विकार दृष्टीनें पुस्तक वाचणाऱ्यास! कांहींतरी क्लिष्ट कल्पना मनांत आणून दोषैकदृष्टीनें वाचणाऱ्या मनुष्यास पुस्तकांत खरे किंवा खोटे असे कल्पनासृष्टींतले दोषच दोष दिसून त्याला टीकेनें आठच कां, पन्नास पृष्ठें देखील सहज भरतां येतील !

**रा. चापेकरांचें विधान नंबर ३.**

"रानडे, गोखले, मेथा यांच्यांशीं कित्येक बाबतींत भांडारकरांचें जमलें नाहीं हें सुप्रसिद्धच आहे. पण त्याची मीमांसा चरित्रकारांनीं करण्याचेंच टाळलें आहे." (पहा, म. सा. प., पृ. १८, वरून ४ व ५ ओळी.)

**रा. कर्नाटकींचें मूळ म्हणणें.**

मेथा व भांडारकर यांच्यामध्यें मुंबई युनिव्हर्सिटींत एकदां उडालेल्या खटक्याचा व त्याच्या कारणांचा मी पुस्तकांत स्पष्ट उल्लेख केला आहे. (पहा, भां. च. पृ. ९६ व ९७).

सन १८९४ मध्यें डॉ. भांडारकरांनीं व्हाइस चॅन्सेलर या नात्यानें युनिव्हर्सिटींत भाषण केलें. त्यांतील कांहीं मुद्यांसंबंधानें डॉक्टरसाहेबांमध्यें व न्या. रानडे यांच्यांमध्यें मतभेद झाला होता. यासंबंधाचा मीं माझ्या पुस्तकांत विस्तृत रीतीनें उल्लेख केला आहे, (पाहा, भां. च. पृ. १२० ते १२२).

लॉर्ड कर्झन यांच्यावेळीं वरिष्ठ कायदेकौन्सिलमध्यें "युनिव्हर्सिटी बिला" संबंधीं वादविवाद चालू असतां ना. गोखले व डॉ. भांडारकर यांजमध्यें मतभेद झाला होता. यासंबंधाची कारणमीमांसा मी विस्तृत रीतीनें माझ्या पुस्तकांत केली आहे. (पाहा, भां. च. पृ. ४०४ व ४०५).

वरील तिन्ही बाबतींत मी केलेली कारणमीमांसा प्रत्येकीं एक-दोन पृष्ठांवर गेली

आहे. सबब त्यांतील इकडे उतारे देऊन जागा अडविणें प्रशस्त नव्हे. स्थळनिर्देश केला आहे, त्यावरून अर्थबोध होण्याला अडचण पडणार नाहीं. अर्थात् "मी मीमांसा करण्याचेंच टाळलें आहे," हें चापेकरांनीं केलेलें विधान **निखालस खोटें** आहे.

अशीं खोटीं विधानें चापेकरांनीं कां करावीं याची कारणमीमांसा मी करीत नाहीं. मी फक्त त्यांनीं आपलें परीक्षण माझें पुस्तक नीट न वाचतां लिहिलें, इतकेंच म्हणतों. पण इतकें करूनच चापेकर थांबले नाहींत. चुकीचीं विधानें दुरुस्त करण्याकरितां म्हणून मी "साहित्य-पत्रिकें"त प्रसिद्ध करण्या-साठीं एक लेख पाठविला असतां, "असले लेख प्रसिद्ध करण्याची आमची वहि-वाट नाहीं." अशा अर्थाचा त्यांनीं जबाब पाठविला! हा संपादकीय **शिष्टा-चार** झाला कीं अत्यंत अनुचित असा निव्वळ अशिक्षिताला शोभणारा **बेजबाबदारपणा** झाला हें सुज्ञ वाचकांनींच ठरवावें. असा अनुभव माझ्या पंचेचाळीस वर्षांच्या लेखनव्यवसायांत हाच मला प्रथम आल्यामुळें मी तो इकडे दाखल केला आहे.

मी लिहिलेल्या न्या. तेलंग यांच्या चरित्रासंबंधानें देखील मला कांहीं थोडासा कटु अनुभव आला, याबद्दल वाईट वाटतें. त्याविषयीं इकडे आज जास्त लिहिण्याची माझी इच्छा नाहीं. पण परमेश्वराच्या कृपेनें व कांहीं प्रेमळ मित्रांच्या साहाय्यानें मग माझें ५००पानांचें पुस्तक-तेलंग चरित्र-दोन महिन्यांत छापून तयार झालें, व सन १९२९ सालच्या तेलंगांच्या पुण्यतिथीच्याच दिवशीं तें पुस्तक प्रसिद्ध झाल्याचें अध्यक्ष न्या. पाटकर यांनीं जाहीर केलें! पुस्तक प्रसिद्ध झाल्यावर यासंबंधीं मग अनुकूल-प्रतिकूल टीका झाली, पण त्याचें महत्त्व आतां उरलें नाहीं. सन १९३१ या वर्षीं मी लिहिलेलें डॉ. भाऊ दाजींचें चरित्र प्रसिद्ध झालें. त्यासंबंधानें मात्र, पुस्तक प्रसिद्ध व्हावयाच्या पूर्वीं किंवा तें प्रसिद्ध झाल्यानंतर, वरील प्रकारचा अनुभव आला नाहीं.

याप्रमाणें जरी माझ्या एकदोन पुस्तकांसंबंधानें वरील प्रकारचा मला अनुभव आला तरी, माझ्या आतांपर्यंत प्रसिद्ध झालेल्या तिन्ही पुस्तकांचा महा-राष्ट्रांतील जाणत्या व जबाबदार मंडळींनीं कौतुकानें स्वीकार केला व वाचक-

वर्गानें त्या पुस्तकांना अपेक्षेबाहेर आश्रय दिला याबद्दल मी सर्वांचे अंतःकरण-पूर्वक आभार मानतों. तिन्ही पुस्तकांना पुण्याच्या व इंदूरच्या ग्रंथोत्तेजक मंडळी-कडून बक्षिसें मिळालीं आहेत व तिन्ही पुस्तकें शिक्षणखात्याकडून मंजूर झालीं आहेत. डॉ. भांडारकरांचें चरित्र मुंबई युनिव्हार्सिटीकडून सन १९३३ च्या वरिष्ठ प्रतीच्या--एम्. ए. च्या--परीक्षेकरितां नेमण्यांत आलें होतें, व न्या. तेलं-गांचें चरित्र ( संक्षिप्त आवृत्ति ) १९३२ वर्षी मॅट्रिक्युलेशन परिक्षेकरितां नेम-ण्यांत आलें होतें; इतकेंच नव्हे तर हें तेलंगांचें संक्षिप्त चरित्र सर्व सरकारी व बिनसरकारी हायस्कुलांतून वार्षिक परिक्षांकरितां ( Text-book ) नेमावें असा मुख्य अधिकाऱ्यांचा हुकूम सुटला होता. लोकदृष्टीनें पाहिलें तरी वस्तु-स्थिति अत्यंत समाधानकारक आहे हें कळविण्यास आनंद वाटतो. डॉ. भांडार-करांचें चरित्र सन१९२७ मध्यें प्रसिद्ध झालें. पण त्याच्या सर्व प्रती एक वर्षाच्या आंतच खपून गेल्या ! न्या. तेलंगांचें चरित्र सन १९२९ मध्यें प्रसिद्ध झालें व पुढें दोन वर्षांनीं ( १९३१ ) डॉ. भाऊ दाजींचें चरित्र प्रसिद्ध झालें. या चरित्रांच्या देखील पुष्कळ प्रती पूर्वीच खपल्या असून अगदी थोड्या आतां शिल्लक आहेत.

रावबहादुर शंकर पांडुरंग पंडित यांचें चरित्र अनेक दृष्टींनीं तरुणलोकांना –विशेषेंकरून गरिबीमुळें निरुत्साह होऊन बसणाऱ्या लोकांना–अत्यंत स्फूर्ति-दायक व अनुकरणीय वाटेल यांत शंका नाहीं. यास्तव त्यांचें चरित्र लिहावें असें पुष्कळ दिवस मनांत होतें. पण त्याकरितां जरूर लागणारी माहिती मिळवि-ण्याच्या मार्गांत अनेक अडचणी होत्या ! त्यांना वारल्यासच मुळीं आज एके-चाळीस पेक्षां अधिक वर्षे होऊन गेलीं आहेत. तथापि मिळाली तेवढी माहिती परिश्रमपूर्वक मिळवून हें चरित्र लिहून मी आज प्रसिद्ध करीत आहें. मुलकी-खात्यासारख्या मनुष्यास जखडून ठेवणाऱ्या खात्यांतच शंकररावांची सगळी नोकरी झाल्यामुळें त्यांच्या हातून डॉ. भाऊ दाजी अगर न्या. तेलंग यांच्या-सारखीं राजकीय स्वरूपाचीं कामें झालेलीं नाहींत. व डॉ. भांडारकर किंवा न्या. रानडे ( या दोघांना सुट्यांच्यामुळें व कामाच्या स्वरूपामुळें पुष्कळ फुरसत मिळत असे. ) यांच्यासारखी सामाजिक चळवळ चालविण्याला पंडितांना अवकाश मिळाला नाहीं या गोष्टी खऱ्या आहेत. परंतु इतकीं जबाबदारीचीं–

पंडितांना नेहमींच जबाबदारीचीं व कसून शीण आणणारीं कामें करावीं लागत असत–कामें करूनहि त्यांचे हातून वाङ्मयसृष्टींत इतकी महत्त्वाची व बिनमोल सेवा कशी होऊं शकली याचा विचार केला म्हणजे मन आश्चर्यानें थक्क होऊन जातें! त्यामुळें वरील पुरुषांच्या चरित्रांतल्यासारखे पंडितांच्या चरित्रांत विविध प्रसंग पाहावयाला मिळत नाहींत या गोष्टीचें तेवढें महत्त्व वाटेनासें होतें. पण दुसऱ्या दृष्टीनें वाङ्मयक्षेत्रांत त्यांनीं केलेल्या कृतीवर कृति, लिहिलेलीं पुस्तकांवर पुस्तकें, काळजीपूर्वक प्रसिद्ध केलेले ग्रंथांवर ग्रंथ पाहिले म्हणजे त्यांच्या निरलसपणाचें, बुद्धिमत्तेचें मूर्तिमंत चित्र दृष्टीपुढें उभें राहातें, व त्यांच्यापुढें सहज नकळतच जणूं मस्तक आदरानें नम्र होतें. एकंदरींत मोठेपणीं इंग्रजी शिकूं लागून व झटपट शिक्षणक्रम आटपून तसेंच धैर्यानें पुढें सरसावून शिक्षण, वाङ्मय व लोकजागृति इत्यादि क्षेत्रांत पूर्वींच पुढें गेलेल्या लोकांना गांठणें, व त्यांच्याबरोबरीनें कर्तबगारी करून दाखविणें हें काम कांहीं लहानसहान नव्हे! यामुळें पंडितांच्या चरित्राला, तरुण लोकांचे ठिकाणीं उत्साह उत्पन्न करण्याच्या दृष्टीनें, एक प्रकारचें रमणीयत्व आलें आहे यांत शंका नाहीं!

शंकरराव पंडितांना मी स्वतः मुंबईत सन १८८५ सालीं एकदां भेटलों होतों. त्यांचे वडील बंधु भास्करराव हे माझ्या लहान वयांत १८८० च्या सुमारास शाहापुरांत ( बेळगांव नजीक ) अधिकारावर असल्यावेळीं दुसऱ्या दोन गृहस्थांबरोबर आमच्या घरीं आले होते. त्यांचे चिरंजीव नारायण भास्कर ऊर्फ भाई हे माझे मित्र होते. तथापि प्रस्तुत चरित्र लिहिण्याच्या कामीं उपयोगी पडणारी अशी मला माहिती नव्हती हें कबूल केलें पाहिजे. म्हणून मी शंकररावांच्या वृद्ध पत्नी श्रीमती उषाबाई व वडील चिरंजीव श्री. माधवराव बॅरिस्टर यांना भेटलों, व त्यांनीं सुचविल्यावरून मी राजकोटला जाऊन शंकररावांचे कनिष्ठ बंधु श्री. घनश्यामपंत यांना भेटून आलों. राजकोटला जाण्यापूर्वी तिकडच्या कांहीं गोष्टींविषयीं व सर्व पंडितघराण्यांतील मंडळींविषयीं रा. भास्करराव—रा. भाईंचे चिरंजीव यांनीं मला माहिती पुरविली. याप्रमाणें मी पंडितांच्या आप्तमंडळीकडून शक्य तेवढी थोडीबहुत माहिती मिळविण्याचा—व या माहितीबद्दल मी त्यांचा आभारी आहें—प्रयत्न केला; व महत्त्वाची

माहिती मला ग्रंथसंग्रहालयें, वाचनालयें व क्वचित् कांहीं मित्रमंडळी यांच्याकडून मिळाली. त्यांपैकीं कांहीं मुख्य संस्थांचीं व पुस्तकांचीं नांवें देतों:-

| | |
|---|---|
| १. रॉयल एशियाटिक सोसायटी, मुंबई. | २. मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई. |
| ३. भांडारकर इन्स्टिटयूट, पुणें. | ४. मराठी ग्रंथालय, पुणें. |

## पुस्तकें.

| | |
|---|---|
| १. सारस्वत रत्नमाला. | २. महाराष्ट्र सारस्वत, १९१७-१८. |
| ३. मोरोपंती "बृहद्दशम" ची पंडितांनीं काढलेली आवृत्ति. | ४. प्रार्थनासमाजाचा इतिहास. |
| ५. मनोरंजन ( १९१४ ) मधला रा. त्र्यं. गं. धनेश्वर यांचा लेख. | ६. मुंबई युनिव्हर्सिटीचीं कॅलेंडरें. |

७. पुण्याचें फीमेल हायस्कूल स्थापिलें गेलें त्यावेळीं निघालेलें पत्रक ( पॅम्फ्लेट. )

याशिवाय जुने रिपोर्ट, टाइम्स, गॅझेट, इंदुप्रकाश, नेटिव्ह ओपिनियन, इंडियन अँटिकेरी इत्यादि पत्रांच्या जुन्या फायली.

या कामांत कांहीं मित्रांचें साहाय्य झालें आहे. त्यांचा नामनिर्देश केला पाहिजे:

रा. कापडी ( एशियाटिक सोसायटी), रा. देसाई, (मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई;) डॉ. वेलणकर व यांच्या हाताखालचे कारकून लोक (भांडारकर इन्स्टिटयूट); पुण्याच्या मराठी ग्रंथालयांतील कारकून; रा. सा. तावडे, प्रिन्सिपाल; ट्रेनिंग कॉलेज, पुणें; रा. रा. एन्. डी. अभ्यंकर ( शाळा खातें ); प्रो. द. वा. पोतदार, पुणें; या मंडळींकडून मला बरीच मदत झाली, याबद्दल मी त्यांचा फार फार आभारी आहें.

शंकरराव पंडितांचे धाकटे बंधु कै. सीतारामपंत हे देखील मोठे प्रसिद्ध पुरुष होऊन गेले, व त्यांनीं आपल्या धंद्यांत मिळविलेल्या संपत्तीचा सद्व्यय करून अनेक संस्थांना मदत केली आहे. त्यामुळें त्यांचेंहि त्रोटक चरित्र या पुस्तकास परिशिष्टरूपानें जोडलें आहे.

मी माझ्या शक्तीप्रमाणें व सवडीप्रमाणें चार चरित्रें लिहिलीं. परंतु एवढ्यानें आमच्या महाराष्ट्रांतील-किंवा मुंबई इलाख्यांतील थोर पुरुषांची नामावली पुरी होते असें थोडेंच कोणाला म्हणतां येईल? व देशांत इंग्रजांची सत्ता स्थापन

झाल्यापासून हिंदुस्थानच्या इतिहासांत नवीन मन्वंतर सुरू झालें. अर्थात् देशांतील जुनी घडी मोडून नवी घडी बसविण्याच्या कामांत–नवीन शिक्षण, नवीन संस्था, नवीन सार्वजनिक उद्योग यांचा पाया घालण्यांत—बऱ्याच थोर पुरुषांच्या श्रमांचा, त्यांच्या बुद्धीचा व त्यांच्या कर्तबगारीचा उपयोग झाला असला पाहिजे. अशा बऱ्याच पुरुषांची माहिती नांवानें सुद्धां प्रस्तुत पिढीला नसेल! पण ही स्थिति बरोबर नाहीं. सबब त्यांची मिळेल तेवढी माहिती घेऊन, त्रोटक कां असेनात, चरित्रें जरूर तयार झालीं पाहिजेत. मागील पिढींतील थोर पुरुषांचीं चरित्रें पुढील पिढ्यांना उत्साहजनक व मार्गदर्शक होऊं शकतात. एकोणिसाव्या शतकांच्या पूर्वार्धात–किंवा उत्तरार्धांत देखील, देशकल्याणार्थ झटणाऱ्या महाराष्ट्रीय व मुंबईतील थोर पुरुषांचीं नामावली इतकी लांब आहे कीं, त्या सर्वांचीं लहान मोठीं मराठींत चरित्रें तयार होण्याकरितां अनेक विद्वान् व सुशिक्षित लोकांच्या परिश्रमाची जरूर आहे. नामदार जगन्नाथ शंकर शेट, बाळगंगाधरशास्त्री जांभेकर, नवरोजी फर्दुनजी, दादाभाई नवरोजी, जमशेटजी टाटा–फार काय, पण मराठी वाङ्मयसेवकच नुसते घेतले तरी सदाशिव काशिनाथ छत्रे, हरि केशवजी, गोविंद नारायण माडगांवकर–अशीं कितीतरी नांवें सांगतां येतील! यांचीं चरित्रें मराठींत जरूर झालीं पाहिजेत. यांपैकीं ज्यांचीं चरित्रें पूर्वींच तयार झालीं असतील त्यांच्या नव्या आवृत्त्या काढाव्या लागतील. ज्यांचीं चरित्रें नसतील त्यांचीं तयार झालीं पाहिजेत. मी हा एक मोठाच कार्यक्रम महाराष्ट्रापुढें ठेवीत आहें असें कित्येकांस वाटेल! पण माझ्या मतें हें एक देशाचेंच काम आहे. ज्याची इच्छा असेल व ज्याला सवड मिळेल त्यानें यथामति व यथाशक्ति या कार्याला हातभार लावला पाहिजे. मी स्वतः, विद्वान् व सुशिक्षित अशा प्रसिद्ध लेखकांच्या मानानें, अगदींच लहान मनुष्य आहें. परमेश्वरानें आयुष्य व आरोग्य दिलें तर वरील दिशेनें कांहींतरी अल्पस्वल्प प्रयत्न करावा अशी इच्छा आहे, इतकेंच सांगणें माझ्या हातीं आहे. नामदार जगन्नाथ शंकर शेट, प्रोफेसर बाळशास्त्री जांभेकर व शेट नवरोजी फर्दुनजी यांचीं मी लिहिलेलीं त्रोटक चरित्रें हल्लींच कांहीं दिवसांपूर्वी मासिक मनोरंजनमध्यें प्रसिद्ध झालीं आहेत.

मागें सांगितलेल्या चार चरित्रांतील कांहीं विशेषांसंबंधानें उपसंहाररूपानें

कांहीं शब्द लिहावे हें इष्ट वाटल्यावरून तसा उपसंहार शंकररावांच्या या चरित्राच्याशेवटीं जोडला आहे.

गेल्या सात आठ वर्षांत मी लिहिलेलीं पुस्तकें अनेक अडचणींतून देखील वेळच्यावेळीं छापून प्रसिद्ध झालीं ह्याचें बरेंचसें श्रेय त्या त्या छापखान्याचे मालक यांना दिलें पाहिजे. माझें पहिलें पुस्तक, डॉक्टर भांडारकर यांचें चरित्र, छापण्याच्या संबंधांत पुण्यास मला बऱ्याच अडचणी वाटूं लागल्या व त्यांत सुमारें एक वर्ष निघून गेलें. परंतु अखेर मुंबईतील श्रीलक्ष्मीनारायण प्रेसचे उत्साही मालक रा. रामभाऊ तटणीस यांनीं तें काम हातीं घेतल्यामुळें डॉ. भांडारकरांचें चरित्र सन १९२७ मध्यें प्रसिद्ध झालें. म्हणून त्याबद्दलचें खरें श्रेय त्यांचें आहे हें येथें आभारपूर्वक मला सांगितलें पाहिजे.

पुढें सन १९२९ मध्यें न्या. तेलंग यांच्या चरित्रासंबंधीं वरील पेक्षांही अधिक बिकट परिस्थिति उत्पन्न होऊन तें पुस्तकच बाहेर पडणार नाहीं, अशीं एकाकालीं स्पष्ट चिन्हें दिसूं लागल्यामुळें मी अगदीं निरुत्साह होऊन बसलों होतों. पण आतां इतक्या दिवसांनंतर त्याविषयींच्या तपशिलांत न शिरतां, इतकेंच मी सांगतों कीं, तशा स्थितींत मुंबईच्या माझ्या दोनतीन मित्रांनीं स्वतः कळ सोसून मला धीर दिला नसता तर तें दोन वर्षे लागून लिहिलेलें ५०० पानांचें न्या. तेलंगांचें चरित्र कदाचित् प्रसिद्धही झालें नसतें! त्या मित्रांत कर्नाटक प्रेसचे मालक रा. मंगेशराव कुळकर्णी हेच मुख्य होते. यामुळें तें पुस्तक प्रसिद्ध झाल्याचें पुष्कळसें श्रेय त्यांचें आहे हें मला कृतज्ञतापूर्वक कबूल केलें पाहिजे. तदनंतर पुढें त्याच पुस्तकाची संक्षिप्त आवृत्ति व डॉ. भाऊ दाजी लाड यांचें चरित्र हींही कर्नाटक प्रेसमध्येंच छापून प्रसिद्ध झालीं.

रावबहादुर शंकर पांडुरंग पंडित यांचें चरित्र तयार होऊन आज दोनतीन वर्षे झालीं. पण माझ्या आजारीपणामुळें व इतर कांहीं कारणांमुळें तें छापून प्रसिद्ध करण्याचा आजवर योग जुळून आला नाहीं. तो आतां मुंबईच्या व्ही. प्रभा आणि कंपनीचे रा. वर्दे यांनीं तें पुस्तक प्रसिद्ध करण्याचें कबूल केल्यामुळें जमून येत आहे, याबद्दल मी त्यांचे आभार मानतों.

पुणें, रास्तापेठ,
१० सप्टेंबर १९३५.

श्री. ना. कर्नाटकी

# प्रकाशकांचे दोन शब्द.



गेल्या पिढींतील एक विद्वान् गृहस्थ व प्रसिद्ध कार्यकर्ते **रा. ब. शंकर पांडुरंग पंडित,** एम्. ए., यांचें छोटेंसें चरित्र आज महाराष्ट्र जनतेपुढें सादर करण्यास प्रकाशकांस समाधान वाटत आहे. श्री. **श्रीनिवास नारायण कर्नाटकी** यांनीं उतार वयांत फार परिश्रम करून गतकालीन चार थोर पुढाऱ्यांचीं चरित्रें यथामति लिहून हल्लींच्या पिढीवर एक प्रकारचे उपकार केले आहेत असें म्हटल्यास ती अतिशयोक्ति होणार नाहीं. प्रस्तुत चरित्रहि त्यांनीं सुमारें दोन वर्षांपूर्वी लिहिलें होतें. परंतु प्रकाशनाचा योग जुळून आला नाहीं. या गतकालीन थोर विद्वानांची अनेक क्षेत्रांतील कामगिरी चालू पिढीपुढें यावी एवढ्याच उद्देशानें एका स्नेह्याच्या विनंतीवरून आम्हीं तें गेल्या महिन्यांत प्रसिद्ध करण्यास हातीं घेतलें व एक महिन्याच्या आंतच तें प्रसिद्ध होत आहे, ही ईश्वरी कृपा होय. दिपवाळीच्या सुमुहूर्तावर सदर पुस्तक प्रसिद्ध व्हावें या हेतूनें एकंदर काम तांतडीनें करून घ्यावें लागलें; प्रुफें तपासण्यासाठीं श्री. कर्नाटकी यांजकडे पाठवितां आलीं नाहींत; या व इतर कारणामुळें बरेच दोष राहून गेले याबद्दल दिलगिरी वाटते. दुसऱ्या आवृत्तीचा सुयोग आल्यास त्यावेळीं त्यांची दुरुस्ती अवश्य केली जाईल.

पुस्तकाच्या प्रकाशनाच्या कामांत आमच्या एका **मित्रानें** (ज्यांच्या नांवाचा निर्देश करण्यास आम्हांस त्यांची परवानगी नाहीं) अनेक सार्वजनिक कामांचा बोजा अंगावर असतांहि स्वखुषीनें आम्हांस मदत केली याबद्दल त्यांचे येथें मनःपूर्वक आभार मानले पाहिजेत.

तसेंच कर्नाटक प्रिंटिंग प्रेसचे मालक, श्री. **मंगेश नारायण कुळकर्णी,** यांनींहि हें पुस्तक फार त्वरेनें छापून देऊन व श्री. रा. रा. नाबर यांनीं आपल्याकडील दुर्मिळ असे पंडितांचे फोटो व श्री. न. र. फाटक यांनीं न्या. रानडे यांच्या फोटोचा ब्लॉक देऊन आम्हांस उपकारबद्ध केलें आहे.

महाराष्ट्रजनतेची आमच्या या प्रकाशनावर कृपादृष्टि होईल अशी उमेद आहे.

मुंबई
२१ आक्टोबर १९३५

व्ही. प्रभा आणि कंपनी
**प्रकाशक.**

# रावबहादुर शंकर पांडुरंग पंडित

## यांचें चरित्र

---

### प्रकरण पहिलें

## उपोद्घात

रावबहादुर शंकर पांडुरंग पंडित हे एक आपल्या महाराष्ट्रांत अत्यंत विद्वान्, कर्तबगार, मानी व तेजस्वी पुरुष होऊन गेले. १८५७ सालीं मुंबईची युनिव्हर्सिटी स्थापन झाल्यावर सुमारें दहा वर्षांत जीं विद्वद्रत्नें बाहेर पडलीं व जे आपल्या विद्येनें व कर्तबगारीनें मोठ्या योग्यतेस चढले—इतकेंच नव्हे तर ज्यांनीं अनेक क्षेत्रांतून कामें करून आपल्या देशाची जगाच्या दृष्टीनें योग्यता वाढविली व आपलें नांव अजरामर करून ठेविलें आहे, अशा पुरुषांपैकीं शंकरराव पंडित हे एक होते. त्यांच्या चरित्रांतला विशेष हा कीं, त्यांच्या वयाचीं अठरा वर्षें होऊन जाईपर्यंत त्यांना इंग्रजीचा गंध नसून, ते पुढें उद्योगाची कास धरून केवळ आपल्या बुद्धिमत्तेच्या जोरावर व अनेक अडचणी मोठ्या धैर्यानें सोसून इंग्लिश शिकले व मोठ्या पराक्रमानें उच्च पदवीस चढले. ते मुलकी खात्यांतील एक बडे अंमलदार असून ते कांहीं वर्षें मुंबई सरकारचे ओरिएंटल ट्रॅन्सस्लेटर–म्हणजे दुभाषी–होते. इतकेंच नव्हे तर त्यांनीं अत्यंत परिश्रम करून अनेक भाषांमध्यें–इंग्लिश, संस्कृत, लॅटिन, जर्मन, फ्रेंच, मराठी, कानडी गुजराथी, पर्शियन वगैरे भाषांमध्यें–मोठी प्रवीणता मिळविली होती व

त्या योगानें आपल्या दुभाषीपणाच्या जागेस शोभा आणली होती, असें म्हणण्या-सही हरकत नाहीं. त्यांनीं वाङ्मयक्षेत्रांत केलेली कामगिरी तर केवळ बिनमोल आहे. त्यांनीं इतर क्षेत्रांतूनही सवडीप्रमाणें कामें केलीं. पण वेदार्थयत्न, अथर्व-वेद व इतर अनेक पुस्तकें संशोधनपूर्वक प्रसिद्ध करून त्यांनीं–एकदा मुंबईच्या नेटिव्ह ओपिनियन कर्त्यानें म्हटल्याप्रमाणें–आपलें "पंडित" हें आडनांव अन्वर्थक केलें आहे, किंबहुना त्यांनीं तें अजरामर करून ठेविलें आहे. यामुळें शंकरराव पंडितांचें चरित्र हें केवळ अनुकरणीय आहे इतकेंच नसून अडचणींनीं हताश होऊन बसलेल्या मनुष्यामध्यें देखील स्फूर्ति उत्पन्न करून त्याला उद्योगास प्रवृत्त करणारें असें आहे. यामुळें तें हरएक दृष्टीनें अत्यंत मननीय आहे. तात्पर्य, आपल्या महाराष्ट्रांतील ज्या तरुण व होतकरू मंडळीला–प्रस्तुतच्या अडचणीच्या स्थितींतही–ऊर्जितावस्था प्राप्त करून घेऊन शक्य तर देशाची देखील कांहीं आपल्या हातून सेवा व्हावी असें वाटत असेल त्यांना रा. ब. शंकर पांडुरंग पंडितांच्या चरित्राइतकें स्फूर्तिदायक असें दुसरें चरित्र क्वचि-तच मिळूं शकेल. त्यामुळें त्यांनीं तें अवश्य वाचावें व त्याबद्दल विचार करावा, अशी सूचना आहे.

---

प्रकरण दुसरें

## अठरा वर्षें वयाच्या पूर्वी

शंकर पांडुरंग पंडित हे मूळ सावंतवाडी संस्थानांतले रहिवाशी असून त्यांचा कुडाळ पेट्यांतील बांबुळी गांवीं सन १८४० सालीं जन्म झाला. त्यांच्या वडिलांचें नांव नारायणराव असें होतें. नारायणरावांना आठ मुलगे व पांच मुली अशीं अपत्यें होतीं. नारायणराव हे चांगले हुशार पण जुन्या चालीचे गृहस्थ होते. त्यांचे एक पांडुरंगपंत नांवाचे चुलतबंधु होते. ते देशांतरास गेले असतां तेथेंच वारले. त्यांना संतति कांहींच नव्हती. त्यामुळें कुटुंबांत कांहीं दुखणेंबाणें झाल्यास पांडुरंगच समंध रूपानें येऊन मुलांबाळांस त्रास देत असावा, असें नारायणरावांच्या भोळ्या मनास वाटत असे. पण याला उपाय काय करावा हें

कांहीं दिवस नारायणरावांस सुचेना! शेवटीं त्यांनीं ठरविलें कीं, पांडुरंगाच्या नांवानें आपला एक मुलगा अर्पण करावा, म्हणजे तो त्याचें तर्पण किंवा पिंडदान करण्यास अधिकारी होईल! त्याप्रमाणें नारायणरावांनीं एके दिवशीं आपल्या शंकराचा हात धरून आपल्या मृत बंधूस हाक मारून म्हटलें कीं, "बाबारे, हा माझा शंकर मी तुला आजपासून अर्पण करतों. हा तुझें नांव चालवील. आतां तूं यापुढें घरांतील मुलांबाळांस त्रास देऊं नको." याप्रमाणें पुढें शंकरराव हे शंकर पांडुरंग पंडित या नांवानें प्रसिद्ध झाले. असो. वरील आठांपैकीं बहुतेक सर्वच हुशार, उद्योगी व संभावित असे निघाले व ते मग आपआपले उद्योग किंवा नोकऱ्या करून संसार करूं लागले. सुदैवानें कनिष्ठ बंधु रा. घनश्यामपंत हे आज हयात असून ते राजकोटला राहात असतात. पण त्यांपैकीं फक्त शंकरराव मात्र एक कुलदीपक निघाले व त्यांनीं आपल्या विद्येनें व इतर गुणांनीं "पंडित" घराण्याची सर्वत्र प्रसिद्धी केली.

नारायणराव हे बांबुळीचे वतनदार कुळकर्णी होते. त्यांची स्थावर इस्टेट अशी अगदींच बेताची होती. तिचें वार्षिक उत्पन्न एवढ्या मोठ्या कुटुंबाच्या खर्चाच्या मानानें फारच अल्प असे. त्यांत फक्त कुळकर्णीपणाच्या वार्षिक ५०–६० रुपयांची कायती भर पडत असे. म्हणजे एवढ्याशा उत्पन्नांतून सगळ्या कुटुंबाचा खर्च भागवितांना नारायणरावांची फार त्रेधा उडत असे. त्यामुळें कुटुंबांत लग्न–मुंजीसारखें कांहीं कार्यप्रस्थ निघाल्यास बिचाऱ्या नारायणरावांस कर्ज काढण्याशिवाय दुसरा मार्ग नसे. तरी स्वतः नारायणराव हे शांत वृत्तीचे व सदा संतुष्ट असे असल्यामुळें एवढें मोठें कुटुंब तसल्याही गरीब स्थितींत सुखानें नांदत असे.

सन १८४० च्या सुमारास महाराष्ट्रांत शिक्षणाची चांगलीशी सोय नव्हती. खुद्द ब्रिटीश हद्दींत देखील कांहीं मोठ्या शहरांशिवाय इतर ठिकाणीं मराठी शाळा नसत. मग सावंतवाडीसारख्या लहानशा संस्थानांत ती सोय कोठून असणार? तथापि त्या वेळच्या सोयीप्रमाणें व सामान्य लोकांच्या कल्पनेप्रमाणें व आपल्या अनुकूलतेप्रमाणें लिहिणें, वाचणें व साधारण हिशोब करणें हें व्यावहारिक शिक्षण व संध्या, पुरुषसूक्त व रुद्र यांचा पाठ इत्यादि ब्राह्मणास आवश्यक

असें धार्मिक शिक्षण शंकररावांस नारायणरावांनीं इतर मुलांप्रमाणें दिलें होतें. पुढें मुलगे मोठे झाल्यावर पूर्वीपासून चालत आलेल्या वहिवाटीप्रमाणें ते जरूर पडल्या वेळीं कुलकर्णीपणाच्या कामांत वडिलांस मदत करीत असत. ह्याप्रमाणें शंकररावांनाहि केव्हां केव्हां तें काम करावें लागत असे. या रीतीनें शंकर-रावांच्या वयाचीं अठरा वर्षें निघून गेलीं ! म्हणजे अठरा वर्षांचें वय होईपर्यंत शंकररावांचा हा काल हल्लींच्या मानानें अज्ञानदशेंतच गेला.

शंकररावांच्या पूर्वी त्यांचे वडीलबंधु भास्करराव हे आपल्या वडिलांस कुळ-कर्णीपणाच्या कामांत वरचेवर मदत करीत असत. परंतु यायोगानें घरच्या उत्पन्नांत भर पडून कुटुंबाच्या खर्चास कांहींच मदत होत नसे. त्यामुळें नारा-यणरावांस फारच त्रास होत असे. भास्करराव आतां मोठे होऊन त्यांना सर्व समजूं लागल्यामुळें वडिलांची स्थिति त्यांच्या लक्षांत येऊन आपण विद्या संपादन करून कांहीं तरी नोकरी करणें व वडिलांस मदत करणें हें आपलें कर्तव्य आहे अशी त्यांच्या मनांत जाणीव उत्पन्न झाली होती व एके दिवशीं घरांत कोणास न कळवितां ते उठून बेळगांवास निघून गेले ! यापूर्वी त्यांचे एक वडील बंधू महादेव अशाचप्रकारें उद्योग धंद्याकरितां कराचीस पळून गेले होते. बेळगांवासारख्या परक्या ठिकाणीं त्यांना कोणाची ओळख असणार ? पण तेथें त्यांच्याच गांवचा एक सुतार आपला धंदा करून राहात असे. त्याची ओळख काढून भास्कर-रावांनीं त्याच्या घराच्या पडवींत राहून इंग्रजीचा अभ्यास सुरू केला. ते खटपट करून बेळगांवच्या सरदार्स हायस्कूलमध्यें जाऊं लागले. त्यांनीं गांवांत कांहीं शिकवण्या कराव्या, त्या सुताराच्या पडवींत हातानें स्वयंपाक करून रहावें, व उरलेल्या वेळांत इंग्रेजीचा अभ्यास करावा असा क्रम चालविला. पण रात्रींच्या वेळीं दिव्याची सोय नव्हती व तेल विकत घेण्यास जवळ पैसे नव्हते. अशा स्थितींत भास्कररावांनीं त्या सुतारापासून लाकडांचीं सालें मागून घेऊन तीं पेटवावीं आणि त्याच्या प्रकाशानें आपलें लिहिणें वाचणें करावें ! कोण ही इंग्लिश शिकण्याची उत्सुकता व तिच्यापायीं वाटेल तो त्रास सोसण्याची तयारी ! याप्रमाणें बेळगांवास कांहीं दिवस राहिल्यानंतर व थोडेंसें इंग्रजी शिक्षण झाल्यावर भास्करराव कराचीस गेले व तेथें त्यांनीं नोकरी धरली हा इकडे विस्तार करण्याचें कारण इतकेंच कीं, आपल्या वडील भावांचें हें उदाहण शंकररावां-

पुढें होतेंच. अर्थात् भास्कररावांच्याचप्रमाणें आपणही कांहीं विद्या संपादन करून नोकरी धरावी व घरप्रपंचास मदत करावी असें सहज शंकररावांस वाटूं लागलें, व ह्याविषयींच त्यांच्या मनांत वरचेवर विचार घोळूं लागले. पण पुढें शंकररावांच्या या इच्छेस दुजोरा देणारीं अशीं एक दोन कारणें घडलीं. भास्करराव बेळगांवास निघून गेल्यावर घरचीं कुळकर्णीपणाचीं व सरकारी कचेरींतील कामें शंकररावच करीत असत व याप्रमाणें ते आपल्या वडिलांस मदत करीत असत. पुढें एकदां असें झालें कीं, सावंतवाडीच्या पोलिटिकल सुपरिंटेंडेंट साहेबांची स्वारी कुडाळ-पेट्यांत आली होती, व त्यांची कारकून वगैरे मंडळी खुर्च्यांवर बसून व टेबलावर कागद वगैरे ठेवून आपलीं कामें करीत होते. तें पहातांच शंकररावांस सहज वाटलें कीं, हे कारकून अशाप्रकारें काम करीत आहेत, व आपणांस जमिनीवर मांडी मोडून बसून काम करावें लागतें; तेव्हां त्यांच्याचप्रमाणें आपणांसही खुर्च्या–टेबलांशीं बसून काम करण्यास कधीं मिळेल काय ? त्यावेळीं सावंतवाडीस कै. वामनराव चिटणीस हे कारभारी होते. ते कारभारी साहेब शंकररावांच्या मनांत ईर्षा उत्पन्न करण्यास कारण झाले असें म्हणतात. पुढें लवकरच कुडाळच्या मुनसफ कचेरींत एक कारकुनाची जागा रिकामी झाली. त्या जागेकरितां शंकररावांनीं अर्ज केला. पण त्यांचें मोडी अक्षर चांगलें नाहीं, या सबबीवर ती जागा त्यांना देण्यांत आली नाहीं ! वास्तविक पाहतां शंकररावांचें मोडी अक्षर चांगलें होतें. तरी पण ती जागा त्यांना मिळाली नाहीं, याचा अर्थ इतकाच कीं त्या वेळच्या वरिष्ठ अधिकाऱ्याच्या मनांतून ती जागा शंकररावांस द्यावयाची नव्हती. याप्रमाणें थोडीशी मानहानि झाल्यामुळें शंकररावांच्या तल्लख स्वभावास तो प्रकार रुचला नाहीं. तरी त्यामुळें निराश न होतां, आपण विद्या संपादन करण्याकरितां काय उपाय केला पाहिजे, याबद्दल ज्यास्त उत्सुकतेनें ते विचार करूं लागले. याचा परिणाम असा झाला कीं, थोड्याच दिवसांनीं त्यांनीं आपल्या वडील बंधूंचें–भास्कररावांचें–अनुकरण करून एके दिवशीं ते घरीं कोणास न कळवितां इंग्लिश शिकण्याकरितां बेळगांवास निघून गेले ! त्या दिवशीं ( सन १८५८ ) आगस्ट महिन्याची १५ तारीख होती.

---

## प्रकण तिसरें

# इंग्लिश शिक्षणास आरंभ

शंकरराव हे इंग्लिश शिकण्याच्या उद्देशानें बेळगांवास गेले. पण तिकडे त्यांच्याकरितां सर्व प्रकारची सोय कोणी थोडीच करून ठेविली होती? बेळगांवास त्यांना सर्व बाबतींत हाल काढावे लागले. एकादी दुसरी शिकवणी धरण्यास त्यांची तयारी होती. पण ती मिळेपर्यंत त्यांना कष्ट काढावेच लागले. इतके हाल झाले तरी इंग्लिश शिकण्याबद्दलची त्यांची उत्सुकता अणुमात्र कमी झाली नाहीं. उलट ती वाढतच चालली. तेव्हां आपली सर्वप्रकारें सोय लागेपर्यंत शाळेंत जाऊन वर्गाच्या बाहेर बसून वर्गांत चाललेले पाठ ऐकून आपला अभ्यास शंकररावांनीं चालविला. सरदार्स हायस्कूलचे त्यावेळीं रावसाहेब नारायणराव विष्णु बापट हे हेडमास्तर होते. त्यांना व इतर मास्तरांना शंकररावांची शिकण्याबद्दलची ही तीव्र उत्सुकता पाहून कौतुक वाटलें व मग यांची फी पुस्तकें वगैरें या दृष्टीनें शाळेंतच वर्गाबरोबर शिकण्याची सोय करण्यांत आली. गांवांत कांहीं शिकवण्या करून शंकररावांनीं आपला चरितार्थ चालवावा, व सरदार्स हायस्कूलमध्यें जाऊन इंग्रजीचा अभ्यास करावा असा त्यांनीं क्रम चालविला. बेळगांवास त्या वेळीं कै. वासुदेवराव पुणेकर या नांवाचे सारस्वत ब्राह्मण जातीचे एक फार थोर मनाचे सद्गृहस्थ होते व ते तेथें वकिलीचा धंदा करीत असत. कोंकणांतून एक आपल्याच जातीचा बुद्धिमान् पण गरीब मुलगा बेळगांवांत येऊन इंग्लिश अभ्यास करीत आहे, पण त्याची तेथें हरएक दृष्टीनें गैरसोय चालली आहे, ही बातमी सदरील पुणेकर वकीलांच्या कानांवर गेली; त्याबरोबर त्यांनीं शंकररावांस बोलावून आणून सांगितलें कीं, "तुम्ही इकडे इंग्रजी शिकत अहां, पण तुमची इकडे कोठें दुसरीकडे सोय लागली नसेल, तर तुम्ही आमच्या घरीं येऊन खुशाल हें आपलेंच घर असें समजून–राहा आणि आपला निर्वेधपणें अभ्यास करा." मग शंकरराव वासुदेवरावांच्या घरीं राहूं लागले व हायस्कूलमध्यें जाऊन अभ्यास करूं लागले. वासुदेवरावांसंबंधानें शंकरराव हे अखेरपर्यंत आपली कृतज्ञताबुद्धि व आदर व्यक्त

करीत असत, तें बरोबर होतें. शंकरराव हे फार चलाखबुद्धीचे होते व इंग्रजी शिकण्याबद्दलची त्यांची उत्कट इच्छा असल्यामुळें ते बिलकूल आळस न करतां मन लावून आपला अभ्यास करीत असत. त्याचा परिणाम असा झाला कीं, त्यांनीं तीन वर्षांत आपला सातहि इयत्तांचा अभ्यास संपवून ते सन १८६१ सालीं मॅट्रिक्युलेशन परीक्षेला बसले व तींत ते चांगल्या रीतीनें पास झाले ! त्यांच्या विषयीं अशी एक गंमत सांगतात कीं अभ्यास करितांना झोंप येऊं नये म्हणून ते आपली शेंडी खुंटीला टांगीत असत ! अशाप्रकारें अभ्यास करून जे शंकरराव १८५८ मध्यें कुडाळ येथील कचेरींतल्या कारकुनीच्या जागेकरितां खटपट करीत होते, तेच फक्त तीन वर्षांनीं अत्यंत चिकाटीनें इंग्रजीचा अभ्यास करून मॅट्रिक परिक्षेंत उत्तम रीतीनें पास झाले ! मग ते एक पगारी विद्यार्थी होऊन मुंबईस कॉलेजांत अभ्यास करण्याकरितां गेले. या सर्व प्रकाराचा अत्यंत गौरवयुक्त रीतीनें उल्लेख करून "नेटिव्ह ओपिनियन" कर्त्यानें एकेप्रसंगीं असे उद्गार काढले ( २२-३-९४ ) !

"आपल्यापेक्षां चांगल्या स्थितींतील लोकांना पाहून आपली स्थिति त्यांच्यासारखी कां असूं नये असे प्रश्न पुष्कळांच्या मनांत वारंवार येत असतील. पण ह्या प्रश्नांस शंकरराव पंडितांप्रमाणें जबाब देणारे किती बरें निघतील?"

याचें उत्तर वाचकांनींच द्यावें !

---

## प्रकरण चवथें

# कॉलेजांतील अभ्यास

सन १८६१ मध्यें शंकरराव यांची मॅट्रिक परीक्षा होऊन ते एक पगारी विद्यार्थी होऊन मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजांत आले व तेथें अभ्यास करूं लागले, हें मागील प्रकरणांत सांगितलेंच आहे. पण ते जे अभ्यासाकरितां म्हणून कॉलेजांत आले ते तेथें–प्रथम कांहीं वर्षें एल्फिन्स्टन कॉलेजांत व नंतर पुण्याच्या डेक्कन कॉलेजांत–सन १८६९ पर्यंत होते. त्यांनीं त्या मुदतींत अध्ययन, अध्यापन व ग्रंथलेखन इतकीं सर्व कामें चालविलीं होतीं. त्याच मुदतींत

त्यांची पुण्याच्या दक्षिणाप्राईझ कमिटीच्या सेक्रेटरीच्या जागीं नेमणूक होऊन त्यांच्या सरकारी नोकरीला तेव्हांच आरंभ झाला होता. सन १८६३ सालीं शंकराराव हे "फर्स्ट एग्झॅमिनेशन इन आर्टस" (साहित्यांतील पहिली परीक्षा) परीक्षेचा अभ्यास करीत असतांनाच एल्फिन्स्टन कॉलेजचे प्रिन्सीपॉल ह्यूलिंग्स साहेब यांनीं त्यांना जुनीयर फेलोची (दुय्यम प्रतीच्या उपशिक्षकाची) जागा देऊं केली. पण पंडितांना ती पत्करावी असें वाटेना. त्यांचें लक्ष मुख्यतः त्यांच्या पुढें होणाऱ्या परीक्षेकडे होतें. त्यामुळें आपल्या अभ्यासास व्यत्यय येईल अशी कोणतीही जबाबदारी पत्करणें त्यांना पसंत नव्हतें. परंतु प्रिन्सि-पॉल साहेबांना न दुखविण्याच्या इराद्यानें त्यांनीं अशी तोड काढली कीं, कॉलेजांतील खालच्या वर्गास शिकविण्याच्या बाबतींत कांहीं अडचण भासत असेल तर आपण आठवड्यांतून चार तास ते वर्ग मोबदल्याशिवाय शिकवि-ण्यास तयार आहों असें साहेब मजकूर यांस कळवावें. त्याप्रमाणें प्रिन्सिपॉल साहेबांस पंडितांनीं कळवितांच त्यांनीं तें त्यांचें म्हणणें आनंदानें कबूल केलें. व त्याप्रमाणें पंडित लागलींच कॉलेजांतील वर्ग शिकवूं लागले. पुढें थोड्याच दिवसांनीं शंकररावांची (फ. ए. इन आर्टस) परीक्षा पास झाली. त्याबरोबर —म्हणजे त्यांची बी. ए. व्हावयाच्या पूर्वी दोन वर्षें—त्यांची ज्यूनीयर फेलोच्या जागीं नेमणूक झाली. त्या जागेवर असतांना त्यांना मॅट्रिकच्या विद्यार्थ्यांना व "फर्स्ट एग्झॅमिनेशन इन आर्ट्स" या वर्गांतील विद्यार्थ्यांना शिकवावें लागत असे. फेलोच्या जागेवर काम करीत असतांना आपण वरील दोन्ही वर्गांना कोणकोणते विषय शिकविले यासंबंधीं पंडितांनीं मग सन १८६५ च्या जून मध्यें प्रिन्सिपॉलसाहेबांस रिपोर्ट केला. नवंबर १८६३ ते डिसेंबर १८६५ पर्यंत शंकरराव, हे मुंबईस एल्फिन्स्टन कॉलेजांत ज्यूनीयर फेलोच्या जागीं होते, व मग ते पुण्याच्या डेक्कन कॉलेजांत सीनीयर (अव्वल प्रतीचे) फेलो होऊन गेले. मुंबईस होते त्या मुदतींतच ते सन १८६५ मध्यें इंग्लिश व लॅटिन (दुसरी भाषा) घेऊन बी. ए. ची परीक्षा दुसऱ्या वर्गांत पास झाले. पंडितांबरोबर बी. ए. परीक्षेंत पास झालेल्यामध्यें दळवी, बाळ, भागवत व जठार ही मंडळी होती. त्याच वर्षी डॉ. भांडारकर, न्या. रानडे व रा. रा. बाळ मंगेशराव वागळे यांची एम्. ए. ची परीक्षा पास झाली होती. म्हणजे शंकरराव

पंडितांनीं सन १८६१ ते १८६५ पर्यंत ते एल्फिन्स्टन कॉलेजांत होते त्या मुदतींत किती कामें केलीं तीं पाहा. ते उत्तम प्रकारें अभ्यास करून सन १८६५ मध्यें बी.ए. परीक्षेंत चांगल्या रीतीनें पास झाले. त्यांनीं फेलोच्या जागीं असतांना कॉलेजांतील कांहीं वर्गांना शिकविण्याचें काम केलें, आणि मराठी भाषेंत मोरोपंत कवीचें अत्यंत गहन म्हणून प्रसिद्ध असलेलें "बृहद्दशम किंवा कृष्णविजय" हें काव्य स्पष्टीकरणाच्या विपुल टीपा व शब्दार्थ देऊन त्यांनीं सन १८६३ मध्यें प्रसिद्ध केलें. त्याचप्रमाणें ह्यांनीं "अभिजात मराठी" (Marathi classics) या विषयावर एक अत्यंत मार्मिक असा इंग्रजींत लेख लिहून तो "Elphinstone School Paper" (एल्फिन्स्टन शाळा-पत्रक) याच्या १८६३ आक्टोबरच्या अंकांत प्रसिद्ध केला! शंकररावांच्या या शेवटल्या दोन कृतींविषयीं पुढील एकाद्या प्रकरणांत थोडासा विस्तार करूं.

सन १८६५ च्या डिसेंबरमध्यें शंकरराव जेव्हां पुण्याच्या डेक्कन कॉलेजांत सीनियर फेलो होऊन आले त्यावेळीं तेथें प्रोफेसर वर्डस्वर्थ हे प्रिन्सिपॉल होते. वर्डस्वर्थ साहेबांच्या कारकीर्दींत पंडित हे सीनियर फेलोच्या जागीं असतांना त्यांना कॉलेजांत इंग्लिश, लॅटिन व संस्कृत इतके विषय शिकवावे लागत असत. शंकरराव यांना संस्कृत भाषा शिकण्याची आवश्यकता मुंबईस एल्फिन्स्टन कॉलेजांत अभ्यास करीत होते तेव्हांपासूनच वाटूं लागली होती. तशांतून कोणी एका गृहस्थांनीं शंकररावांस चिडविण्याच्या हेतूनें "संस्कृत भाषा शिकण्यास फार फार श्रम लागतात. तसे श्रम घेणें तुमच्या हातून होईल असें दिसत नाहीं" असे नाउमेद करणारे उद्गार काढले होते असें ऐकतों. सदरील गृहस्थास पंडितांनीं ताबडतोब उत्तर दिलें कीं, "मी परिश्रमपूर्वक संस्कृत शिकून संस्कृतचा प्रोफेसर होईन, तरच नांवाचा शंकर पांडुरंग पंडित असेन!" या आख्यायिकेंत तथ्य किती आहे हें सांगतां येत नाहीं. पण पंडितांनीं संस्कृतांत फार लवकर नैपुण्य मिळविलें व मग थोड्याच दिवसांनीं ते संस्कृतचे प्रोफेसर झाले, ह्या गोष्टी खऱ्या आहेत. तें कसेंही असलें तरी पंडित हे पुण्यास आल्यावर तेथें एका शास्त्रीबोवांजवळ संस्कृत भाषा नेमानें शिकूं लागले, हें खरें आहे. संस्कृत भाषेंत शंकररावांची गति इतकी लवकर झाली कीं, ते सहा महिन्यांच्या आंतच मुंबई युनिव्हर्सिटीच्या भगवानदास पुरुषोत्तमदास संस्कृत स्कॉलरशिपच्या—त्या

दिवसांत अत्यंत कठीण मानल्या गेलेल्या–परीक्षेस बसले! पंडित हे पुण्यास आल्यावर संस्कृत भाषेचें अध्ययन व अध्यापन हीं दोन्ही श्रमाचीं व जबाबदारीचीं कामें एकाच वेळीं करूं लागले असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्याच मुदतींत ते वेळांत वेळ काढून एका सोल्जराजवळ जर्मन भाषाहि शिकत होते. पंडितांना डेक्कन कॉलेजांत इंग्लिश शिकवावें लागत असे हें वर सांगितलेंच. प्रिन्सिपॉल साहेबांनीं आपल्या १८६५–६६ सालच्या रिपोर्टांत स्पष्ट उल्लेख करून शंकररावांच्या शिक्षणपद्धतीविषयीं पुढीलप्रमाणें आपली गुणग्राहकता व्यक्त केली आहेः " इंग्लिशच्या प्रोफेसरचें काम स्वतः प्रिन्सिपॉल, संस्कृतचे प्रोफेसर व सीनियर दक्षिणा फेलो मिस्टर शंकर पांडुरंग पंडित, बी. ए. अशा तिघांमध्यें वांटून दिलेलें होतें. पंडितांचा त्यावेळीं फार चांगला उपयोग झाला. त्यांचे इंग्लिश व लॅटिन हे दोन्ही विषय उत्तम ( scholar ) असून त्यांना यशस्वी आणि परिणामकारक रीतीनें शिकविण्याची कला चांगली साधली आहे, "

शंकरराव पंडितांनीं १८६६ च्या मेमध्यें आपल्या कामाचा जो रिपोर्ट, प्रिन्सिपॉल साहेबांस सादर केला, त्यांत ते म्हणतात कीं, " इंग्लिशचे प्रोफेसर बिलेअर्स ( Mr. Bellairs ) यांची अन्य ठिकाणीं बदली झाल्यामुळें इंग्लिश शिकविण्याचें काम मला करावें लागत असे. त्या सालीं मी बेकनचे निबंध, ग्रेची कविता, स्कॉटचें "लेडी ऑफ् धि लेक " हें काव्य व जॉनसनचे "वॉन्डरर" आणि " रासेलस " हे विषय शिकविले. व ज्यास्त काम केल्याबद्दल मला दरमहा रु. १०० जास्त मिळत असत. " ह्याच मुदतींत ते एम्. ए. चा अभ्यास करीत असून त्यांनीं ह्या परीक्षेकरितां इंग्लिश व लॅटिन हे विषय घेतले होते. पंडितांनीं त्या सालांत ह्या परीक्षेकरितां सुमारें वीस मोठाले इंग्लिश ग्रंथ व पंधरा लॅटिन भाषेंतले ग्रंथ वाचले होते. याशिवाय खाजगी रीतीनें त्यांनीं ऋग्वेदसंहितेचा पहिला अष्टक, काव्य-नाटक या विषयांवरील सुमारें आठ ग्रंथ व संस्कृत वाङ्मय यावर युरोपीअन पंडितांनीं लिहिलेले सुमारें दहा ग्रंथ इतके वाचले होते. एकंदरींत त्या एका वर्षांत शंकरराव पंडितांनीं केलेल्या कामावरून त्यांच्या कार्यक्षमतेविषयीं व कामाबद्दलच्या त्यांच्या उत्साहाविषयीं कोणासही सहज कल्पना करतां येईल.

प्रिन्सिपॉल वर्डस्वर्थसाहेब यांनीं सन १८६६–६७ सालच्या आपल्या रिपोर्टांत पुढील प्रमाणें लिहिलें आहेः—

" आतां आमच्या कॉलेजांतील फेलोंपैकीं निदान एक तरी लॅटिन जाणणारा असणें अगदीं जरूर आहे. प्रस्तुत सीनियर फेलो असलेले मिस्टर शंकर पांडुरंग पंडित, बी. ए. यांचें लॅटिन शिकविण्याबाबतचें काम उत्तम रीतीनें चाललें आहे. त्याशिवाय ते कॉलेजांतील संस्कृत शिकविण्याचेंही काम करीत असतात. "

सन १८६८ सालीं शंकरराव हे इंग्लिश व लॅटिन असे दोन विषय घेऊन एम्. ए. च्या परीक्षेंत दुसऱ्या वर्गांत पास झाले.

१८६९–७० या सालीं डेक्कन कॉलेजांतील इंग्लिशचे प्रोफेसर मिस्टर ऑग्झेन्हॅम हे सहा महिन्यांच्या रजेवर गेले होते. त्या मुदतींत कामाच्या सोयीसाठीं एका फेलोची नेमणूक करण्यांत आली होती, व प्रोफेसर ऑग्झेन्हॅम यांचें इंग्लिश शिकविण्याचें काम स्वतः प्रिन्सिपॉलसाहेब, डॉक्टर कीलहॉर्न व सीनियर फेलो मिस्टर शंकर पांडुरंग पंडित, एम. ए. अशा तिघांमध्यें वांटलेलें होतें. याशिवाय या तिघांना आपआपलें नेहमींचें काम करावें लागतच होतें. पंडितांच्या शिकविण्याच्या पद्धतीसंबंधानें खुद्द प्रिन्सिपॉलसाहेबांचें काय मत होतें, हें वर एक दोन ठिकाणीं सांगितलेंच आहे. पण त्याविषयीं त्या वेळच्या एकाद्या हुशार विद्यार्थ्याचें मत काय होतें हें सांगणें योग्य दिसतें. सन १८६९ मध्यें अकोल्याचे विद्वान् गृहस्थ कै. रावबहादूर विष्णु मोरेश्वर महाजनी हे डेक्कन कॉलेजांत ज्यूनियर बी. ए. च्या वर्गांत अभ्यास करीत होते. त्यांनीं आपल्या विद्यार्थिदशेंतील डेक्कन कॉलेजसंबंधाचा अनुभव वि. ज्ञा. विस्ताराच्या (१९०० सप्टंबर-आक्टोबरचा जोड अंक पृ. २८८) एका अंकांत प्रसिद्ध केला आहे. त्यांत त्यांनीं शंकररावांच्या शिक्षणपद्धतीविषयीं पुढीलप्रमाणें लिहिलें आहे. पंडितांनीं ज्यूनियर बी. ए. च्या क्लासाला टेनिसनचें " Princess " हें काव्य शिकविलें. ऑग्झेन्हॅम साहेबांनीं त्या काव्याचीं पहिलीं तीन खंडें पूर्वींच शिकविलीं होतीं. व पुढील राहिलेलें काव्य पंडितांनीं मार्मिकपणें शिकविलें. यासंबंधानें सदहू महाजनी म्हणतात. " प्रोफेसर ऑग्झेन्हॅम यांच्या जागेवर रा. रा. शंकर पांडुरंग पंडित यांची तूर्तातूर्त नेमणूक झाली. त्यांनीं आम्हांस हें " Princess, "

काव्य फार मार्मिकपणें शिकविलें. आम्हांला वाटलें नव्हतें कीं, हिंदुस्थानांतील पंडिताला हें काव्य विद्यार्थ्यांस चांगल्या रीतीनें शिकवितां येईल. परंतु जी भीति होती ती एक दोन प्रसंगांतच नाहींशी झाली. आमचा पंडितांच्या-संबंधानें पूर्वीपासून आदर होताच, तो या वेळेपासून जास्त झाला. + + + + पंडित नुसता वाक्यांचा अर्थ सांगून निर्वाह करीत नसत. त्या त्या स्थळीं असणाऱ्या रसांची ते फोड करीत असत. सर्व काव्यामध्यें परिहास व परमार्थ या दोन्ही रसांची कशी बेमालूम गोंवणी केली आहे हें त्यांनीं ठिकठिकाणीं दाखवावें."

पंडित हे डेक्कन कॉलेजांत फेलो होते त्या मुदतींतच त्यांची "दक्षिणा प्राइझ कमिटीच्या सेक्रेटरी"च्या जागीं कृष्णशास्त्री चिपळूणकर यांच्या मागून सन १८६६ सालीं नेमणूक झाली. या जागेचा पगार म्हणून त्यांना दरमहा शंभर रुपये मिळत असत. म्हणजे पंडितांच्या सरकारी नोकरीस तेव्हांपासूनच आरंभ झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं. सदरील सेक्रेटरीच्या जागेवर पंडित हे सन १८६९ पर्यंत होते. तदनंतर त्यांची एकदम कलादगीस डेप्युटी कलेक्टरच्या हुद्यावर नेमणूक झाली. डेप्युटी कलेक्टरच्या जागेवर असतांना व अन्य ठिकाणीं बदली झाल्यावर पंडितांनीं आपलीं कसकशीं कामें केलीं यासंबंधीं पुढील प्रकरणांत विस्तार करूं.

---

प्रकरण पांचवें

## सरकारी नोकरी

शंकरराव पंडित यांची सन १८६९ सालीं कलादगी जिल्ह्यांत डेप्युटी-कलेक्टरच्या जागीं नेमणूक झाल्याचें पूर्वी सांगितलेंच आहे. त्यांची त्याप्रमाणें नेमणूक झाली तरी त्यांचा पुण्याच्या द. प्रा. कमिटीच्या सेक्रेटरीच्या जागेवर कांहीं दिवस हक्क होताच. त्या दिवसांत वरिष्ठ प्रकारच्या शिक्षणास उत्तेजन देण्याच्या इरायानें मुंबईचे तत्कालीन गव्हर्नरसाहेब सर बार्टल फ्रेयर हे कांहीं

निवडक सुशिक्षित लोकांस डेप्युटी कलेक्टरांच्या किंवा फर्स्ट क्लास सब-जज्जांच्या एकदम–म्हणजे खालपासून पायरी पायरीनें वर चढावें न लागतां–जागा देत असत. त्यांपैकीच एक रा. ब. शंकर पांडुरंग पंडित हे होते. याप्रमाणें शंकरराव रेव्हिन्यू खात्यांत जे शिरले ते तेथें सन १८९० सालपर्यंत होते. नंतर त्यांची पोरबंदरच्या ॲडमिनिस्ट्रेटरच्या जागीं नेमणूक झाली. मुलकी खात्यांत शंकरराव होते, त्या मुदतींत त्यांची निरनिराळ्या ठिकाणीं व निरनिराळ्या महत्वाच्या हुद्यांवर सरकाराकडून नेमणूक करण्यांत आली होती. सन १८७१ ते १८७३ पर्यंत ते डेक्कन कॉलेजांतील (संस्कृतचे प्रोफेसर) डॉक्टर कीलहॉर्नसाहेब हे रजेवर गेल्यावेळीं त्यांच्या गैरहजेरींत संस्कृतचे प्रोफेसर झाले होते. त्याचप्रमाणें सन १८७४ सालीं शंकररावांना लंडन येथें भरलेल्या ( Oriental Congress ) प्राच्यभाषा-विशारद पंडितांच्या परिषदेंत मुंबईसरकारतर्फे प्रतिनिधि म्हणून पाठविण्यांत आलें होतें. पुढें सन १८७८ सालीं त्यांची मुंबईस असिस्टंट लायसेन्स टॅक्स कलेक्टरच्या जागेवर नेमणूक झाली होती. व सन १८७९ मध्यें मुंबईचे गव्हर्नर सर रिचेर्ड टेंपल साहेब यांनीं शंकररावांची रा. ब. विनायकराव वासुदेवजी यांच्या मागून "ओरिएंटल ट्रॅन्स्लेटर टु धि गव्हर्नमेंट ऑफ बॉंबे" या महत्वाच्या व जबाबदारीच्या जागेवर नेमणूक केली. शंकरराव या जागेवर सुमारें साडेसहा वर्षे–सन १८७९ मार्च ते १८८५ आक्टोबरपर्यंत–होते. १८८५ सालांच्या अखेरी अखेरीस पंडित हे एका क्षुल्लक बाबीवरून कांहीं बड्या लोकांच्या रोषास पात्र झाल्यामुळें त्यांना त्यांच्या हुद्यावरून कांहीं थोडे दिवस सस्पेंड करण्यांत आलें होतें. व नंतर त्याबद्दल फेरतपास होऊन त्यांची मुंबईहायकोर्टांतील ( अपेलेट साइडच्या) डेप्युटी रजिस्ट्रारच्या जागेवर नेमणूक झाली. पण त्या जागेवर शंकरराव मुळीं हजरच झाले नाहींत. त्यांनीं मग दोन वर्षांची रजा घेऊन थोडी विश्रांति घेतली. रजेच्या मुदतींत ते त्यांचे जिवलग मित्र न्या. रानडे यांच्याबरोबर चारपांच महिने उत्तर हिंदुस्थानांत फिरत होते. सन १८८७ च्या अखेरीस ते रजेवरून परत आल्यावर त्यांची अहमदनगरला हुजूर डेप्युटी कलेक्टरच्या जागीं नेमणूक झाली. तेथें ते फेब्रुवारी १८९० पर्यंत होते. व त्या सालीं मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड रे साहेब यांची मुदत संपत आल्यामुळें त्यांनीं शंकरराव

पंडितांची काठेवाडांतील पोरबंदरसंस्थानच्या अॅडमिनिस्ट्रेटरच्या जागेवर नेमणूक केली व मग ते साहेब बहाद्दुर विलायतेस निघून गेले. असें म्हणतात कीं, सन १८८५ मध्यें घडलेल्या सर्व प्रकारांत रा. ब. पंडितांचा मुळींच दोष नव्हता अशी लॉर्ड रे साहेबांची खात्री झाली होती व पंडितांवरील सरकारचा विश्वास ढळला नाहीं हें दाखविण्याकरितां साहेब बहाद्दुरांची आपण हिंदुस्थानचा किनारा सोडण्यापूर्वी कांहीं तरी कृति करण्याची इच्छा होती. त्याप्रमाणें त्यांनीं शंकररावांना पोरबंदरच्या अॅडमिनिस्ट्रेटरच्या जागेवर नेमलें व मग ते विलायतेस गेले. पंडित हे त्या जागेवर अखेरपर्यंत म्हणजे सन १८९४ सालापर्यंत होते. पोरबंदरला गेल्यावर त्यांना फार काम—व तेंही भानगडीचें काम—पडल्यामुळें ते एक दोन वर्षांनीं "Bright's disease" या विकृतीनें आजारी पडले व अखेर सन १८९३ च्या आक्टोबर मध्यें रजा घेऊन औषधोपचाराकरितां म्हणून मुंबईस आले. तिकडे आल्यावर त्यांना पुष्कळ औषधोपचार करण्यांत आले, पण त्यांचा कांहीं एक उपयोग न होतां ते शेवटीं सन १८९४ च्या मार्च १८ रोजीं परलोकवासी झाले !

शंकर पांडुरंग पंडित हे विद्वान् होते, निरलस होते, व त्यांची "कडक, निःस्पृह व न्यायप्रिय मॅजिस्ट्रेट" अशी सर्वत्र प्रख्याति होती. घेतलेलें काम चोख रीतीनें करून तें शेवटपर्यंत नेण्याकडे त्यांच्या स्वभावाची प्रवृत्ति होती. त्यामुळें त्यांनीं डेप्युटी कलेक्टरच्या जागेवर किंवा अन्य कोणत्याही हुद्यावर असतांना आपलें काम उत्तम प्रकारें करून कोणत्याही दृष्टीनें सरकारचें नुकसान न करतां लोकांचें हित साधण्याचा यत्न केलेला होता. सन १८७१ मध्यें व पुढें सन १८७७ सालीं ते कलादगी—हल्लींच्या विजापूर—जिल्ह्यांत डिस्ट्रिक्ट डेप्युटी कलेक्टर होते. त्या दोन्ही सालांत त्या जिल्ह्यांत भयंकर दुष्काळ पडला होता. त्या जिल्ह्याची स्थितिच अशी आहे कीं, मुंबई इलाख्यांत अवर्षण पडून ज्या कांहीं जिल्ह्यांतून दुष्काळाचीं चिन्हें प्रथम दृग्गोचर होतात, त्यांपैकीं कलादगी जिल्हा हा एक आहे. सदरील दोन्ही सालांतील दुष्काळाच्या वेळीं शंकररावांनीं सर्व जिल्ह्यांत स्वतः अत्यंत निरलसपणें फिरून ठिकठिकाणच्या दुष्काळग्रस्त लोकांबद्दलची चांगल्या प्रकारें व्यवस्था ठेविली होती. कर्तव्याची खरी जाणीव केव्हांही झालें तरी फारच थोड्या लोकांच्या ठिकाणीं असते. पण

मुख्य अधिकारीच निरलस व मेहनती असला म्हणजे हाताखालच्या कामगारांना देखील कामाकडे दुर्लक्ष करतां येत नाहीं. असाच प्रकार शंकरराव पंडित हे कलादगी जिल्ह्यांत होते त्या वेळच्या दुष्काळांत घडला. स्वतः शंकरराव अत्यंत कर्तव्यदक्ष असल्यामुळें आपलें देखरेखीचें वगैरे काम ते मेहनत घेऊन करीत होते व हाताखालच्या कामगारांकडून त्यांचीं त्यांचीं कामें चोख रीतीनें करून घेत होते. ह्यामुळें शंकररावांच्या कारकीर्दींत कलादगी जिल्ह्यांतील दुष्काळपीडित लोकांची उत्तम व्यवस्था लागून पंडितांची त्याबद्दल सरकारकडून व लोकांकडून तारीफ झाली.

मुंबईस मोठी सभा होऊन दुष्काळग्रस्त लोकांस अन्नवस्त्रें पुरविण्यांत आलीं. त्या सभेंत जमलेच्या रकमेचा जो हिसा रा. सा. मंडलीक यांच्या मार्फत कलादगी जिल्ह्याच्या वांट्यास आला त्याची व्यवस्था रा. ब. पंडितांनींच केली. त्याबद्दलचें पंडितांनीं मंडलिकांस (१२-२-७८) पाठविलेल्या पत्रांत असें वर्णन आहे:—"आम्ही दिलेलीं वस्त्रें घेऊन लोक बाजारांत वाटेल तेवढ्या कमी किमतीला विकूं लागले. म्हणून तीं फाडून दोन भाग करून पुन्हां शिव-वून तपकिरी रंगानें रंगवून दिलीं. लुगडीं त्यांवर जाणार नाहीं अशी कांहीं खूण करून दिलीं. मालमंडीसारख्या गवताचें बीं खाऊन लोक रहात आहेत."

सन १८७१ ते १८७८ या मुदतींत पंडित हे निरनिराळ्या जिल्ह्यांत डेप्युटी कलेक्टरच्या जागेवर होते. कलादगी जिल्ह्यांतील दुष्काळच्या वेळच्या त्यांच्या कामगिरीसंबंधानें वर हकीकत सांगितलीच. पण ते सुरत, खेडा, खानदेश व अहमदनगर या जिल्ह्यांतही कामावर होते. त्यांपैकीं ते खानदेश जिल्ह्यांत डेप्युटी कलेक्टर होते त्या मुदतींत तेथील नदीला पूर येऊन नदीच्या दोन्ही कांठांवरील अनेक गांवें व घरें वाहून जाऊन असंख्य लोक निरा-श्रित झाले! शंकरराव हे मूळ कोंकणांतले रहिवाशी असल्यामुळें त्यांना पोंहोणें व प्रसंगीं होडी वल्हविणें या गोष्टींची चांगलीं माहिती होती. त्यामुळें वरील महापुरासारख्या आपत्तीच्या वेळीं मोठें धाडस करून एक होडी नदीच्या प्रवाहांत चालवून व केव्हां केव्हां तर नदींत उडी टाकून कित्येक लोकांचे त्यांनीं प्राण वांचविले! एवढा दयार्द्रबुद्धीचा व धाडशी डेप्युटी कलेक्टर

झालाच नसेल !! त्याचप्रमाणें धुळ्यानजीकचें "कुसुंबें" नांवाचें एक खेडें नदीच्या पुरानें साफ वाहून गेलें होतें. तें पुन्हां वसविण्याच्या कामीं शंकरराव पंडितांनीं फार खटपट केल्यामुळें तेथील लोकांनीं मोठ्या कृतज्ञताबुद्धीनें त्या नवीन गांवास "शंकर पेठ" असें नांव दिलें असें म्हणतात.

शंकरराव हे सन १८८७ ते १८९० पर्यंत अहमदनगराला हुजूर डेप्युटी कलेक्टर होते. त्या मुदतींत तेथें त्यांनीं आपलें काम तर चोख रीतीनें केलेंच परंतु त्यांनीं आपल्या कारकीर्दींत तेथें सामाजिक दृष्टीनें व लोकजागृतीच्या दृष्टीनें देखील जें काम केलें त्याचें फार मोठें महत्त्व होतें. परंतु यासंबंधानें पुढील एखाद्या दुसऱ्या स्वतंत्र प्रकरणामध्यें विचार करण्याबद्दलचें आश्वासन देऊन आम्हीं तूर्त येथेंच थांबतों. सन १८९० मध्यें शंकरराव हे पोरबंदरला ॲडमिनिस्ट्रेटर होऊन गेल्याचें पूर्वीं सांगितलेंच आहे.

प्रकरण सहावें

## ग्रंथसंशोधन व संस्कृत पुस्तकमाला

शंकरराव पंडित हे कॉलेजांत अभ्यास करीत होते तेव्हां त्या सर्व मुदतींत ते अध्ययन, अध्यापन व ग्रंथलेखन इतकीं कामें करीत होते. त्यांपैकीं अध्ययन व अध्यापन यांसंबंधानें मागील एका प्रकरणांत विवेचन आलेलेंच आहे. आतां पंडितांच्या ग्रंथलेखनाविषयीं लिहावयाचें आहे. शंकररावांचीं ते कॉलेजांत होते त्या वेळेपासून ग्रंथसंशोधन व ग्रंथलेखन हीं जीं कामें सुरू झालीं, तीं–पुढें ते सरकारी नोकरीवर असतांना महत्वाचीं, जबाबदारीचीं व एका क्षणाचीही फुरसत न देणारीं कामें करीत होते तरी–अखेरपर्यंत चाललीं होतीं. त्यांत खंड कधीं पडलाच नाहीं. त्या व्यवसायांत त्यांनीं सरकारी खात्याकरितां प्रसिद्ध होत असलेल्या संस्कृत पुस्तक मालेपैकीं कांहीं पुस्तकेंही तयार केलीं होतीं. त्यांत कालिदासाचीं विक्रमोर्वशीय व मालविकाग्निमित्र हीं दोन नाटकें व रघुवंश हें काव्य, हीं मुख्य होत.

" विक्रमोर्वशीय " या पांच अंकी नाटकाची पहिली आवृत्ति पंडितांनीं सन १८६९ मध्येंच प्रसिद्ध केली होती. ती तयार करण्यांत त्यांनीं फार परिश्रम केले होते. त्या कामाकरितां त्यांनीं आठ हस्तलेख व काटयवेमची एक व रंगनाथची एक अशा दोन टीका मिळविल्या होत्या. या सर्व साधनांची काळजीपूर्वक छाननी करून मग त्यांनीं ती पहिली आवृत्ति तयार केली होती. पंडितांनीं त्या पुस्तकास एक विद्वत्ताप्रचुर प्रस्तावना जोडून त्यांत त्यांनीं वरील साधनांचा उल्लेख केला आहे व निरनिराळ्या पाठभेदांविषयीं चर्चा केली आहे. प्रस्तावना फारच विस्तृत आहे. तिचें या ठिकाणीं प्रयोजन नाहीं, पण त्याच्या शेवटील प्याऱ्यामध्यें पंडितांनीं या सबंध आवृत्तीसंबंधानें पुढील-प्रमाणें लिहिलें आहेः—

" प्रस्तुत नाटकाच्या यापूर्वी छापून प्रसिद्ध झालेल्या आवृत्त्या उपयोगी आहेतच, पण त्या फार जुन्या असून त्या परकीय पंडितांनीं तयार केल्या आहेत. त्यामुळें ह्यांत शोधपूर्वक अधिक सुधारणा व्हावयास पाहिजे होती. कांहीं पाठ चुकीचे आहेत व त्यामुळें त्यांची युरोपियन पंडितांनीं केलेलीं भाषांतरेंही चुकीचीं आहेत. पण अशीं ( चुकीचीं ) स्थळें फार थोडीं आहेत. प्रस्तुत आवृत्ति एक सुधारणेच्या दिशेनेंच केलेला प्रयत्न आहे. "

विक्रमोर्वशीय नाटकांत पुरूरवा राजा व उर्वशी यांच्या एकमेकांवरील प्रेमाचें वर्णन आहे. उर्वशी ही स्वर्गांतील इंद्राच्या दरबारांतील एक अप्सरा असून तिला केशी नामक राक्षसानें पळवून नेली होती; पण तिला पुरूरवा राजानें सोडविली. त्यावेळीं तिचें राजावर व राजाचें तिजवर प्रेम जडलें. उर्वशी ही राजावरील प्रेमानें इतकी मूढ किंबहुना अंध झाली होती कीं, तिला दुसरें तिसरें कांहीं सुचेनासें झालें होतें. त्यामुळें ती एकदां इंद्राच्या सभेंत असते वेळीं अनवधानतेनें दुसरें कांहीं काम करीत असतांना तिच्या मुखांतून तिच्या प्रियकराचें नांव निघून गेलें. त्याबद्दल इंद्रानें क्रुद्ध होऊन तिला मृत्युलोकीं जाण्याची शिक्षा दिली. पण त्यानें पुन्हां विचार करून दयार्द्र अंतःकरणानें—तुझ्यापासून झालेल्या पुत्राचें राजास दर्शन होतांच तूं परत स्वर्गांत येशील—असा उःशाप दिला.

पण इकडे पुरूरवा राजाला आपलें उर्वशीवरील प्रेम आपल्या—काशी-राजपुत्री—ज्येष्ठ राणीपासून लपवावयाचें होतें. त्यामुळें राजानें खोटाच बहाणा करून राणीला असें सांगितलें कीं, "माझें खरें प्रेम तुजवरच आहे." पण स्त्रिया असल्या कामांत बहुधा फार चाणाक्ष असतात. त्यामुळें थोड्याच दिवसांत राणीला स्पष्ट दिसून आलें कीं, राजाच्या मनाचा ओढा उर्वशीकडे आहे व केवळ उदार भावनेनें प्रेरित होऊन व नवऱ्याच्या मनःस्थितीकडे लक्ष देऊन तिनें स्वतः स्वस्थ राहाण्याचा निश्चय केला. व या पूर्वी राजाबद्दल मनांत राग धरल्याबद्दल आपणांस खरा पश्चात्ताप वाटत असल्याचें तिनें राजाला आपल्या वर्तनानें दाखविलें.

पुढें कांहीं दिवसांनीं पुरूरवा राजा व उर्वशी यांचा, कांहीं अनपेक्षित योगायोगामुळें—उर्वशी ही लतारूपानें अदृश्य झाल्यामुळें—,वियोग झाला व राजा त्या वियोगदुःखानें अति पीडित होऊन रानावनांतून हिंडत व भेटतील किंवा दिसतील त्या पशुपक्ष्यांना विचारीत तिचा शोध करूं लागला. नाटकाचा हा भाग करुणरसानें भरलेला असल्यामुळें फारच हृदयंगम झाला आहे. पुढें कांहीं काल लोटल्यावर राजा पुन्हां त्या लतेजवळ येतांच त्याला पुन्हां उर्वशीची प्राप्ति झाली व उभयतांस फार आनंद झाला. परंतु इतक्यांत उर्वशीच्या पुत्राचें राजास दर्शन झाल्यामुळें उर्वशी परत स्वर्गलोकीं जाणार ही भीति राहिलीच; पण अखेर नारदऋषींनीं येऊन इंद्राची आज्ञा—पुरूरवा राजा व उर्वशी हीं दोघें मृत्युलोकीं सुखानें राहोत अशी—झाल्याचें त्यांस निवेदन केल्यामुळें तीं मग सुखानें राहूं लागलीं; व याप्रमाणें नाटकाचा शेवट गोड झाला.

विक्रमोर्वशीय नाटकाच्या शेवटीं पंडितांनीं ज्या टिपा दिल्या आहेत, त्या अत्यंत वाचनीय असून कॉलेजांतील विद्यार्थ्यांना तर माहितीच्या दृष्टीनें फार उपयोगी आहेत. त्याचें एकच उदाहरण देतोंः–सदरील पुस्तकाच्या तिसऱ्या आवृत्तीच्या शेवटील टीपांच्या पांचव्या पृष्ठावर (पंडितांनीं) "सूत्रधार" या शब्दाचा धात्वर्थ दिला आहे. "सूत्र" म्हणजे दोरा व "धार" म्हणजे धरणारा या रीतीनें तो शब्द उत्पन्न झाला आहे हें तर झालेंच,

पण ह्या शब्दाची उत्पत्ति पुढीलप्रमाणें झाली आहे असें पंडितांनीं सांगितलें आहे—

"The name appears to be derived from that of an exhibitor of dolls and paper-figures called in Marathi "कळसूत्री बाहुल्या" and in Canarese "गोंबी आटा", which are still exhibited and made to dance by a class of itinerary persons called "गोंबी आटा माडुववरु" in Canarese, and that from even now the only dramatic performances of village populations." म्हणजे कळसूत्री बाहुल्यांचा नाच किंवा खेळ करून लोकांचें मनोरंजन करणारे व त्यायोगानें चरितार्थ चालविणारे असे पुष्कळ लोक गांवोगांव फिरून आपलें पोट भरीत असतात. त्यांत मुख्याची गोष्ट हीच कीं, त्या बाहुल्या किंवा चित्रें जरी कागदाचीं अगर चिंध्याचीं केलेलीं असलीं तरी पडद्याच्या मागून सूत्रें ओढून मालक पडद्याच्या बाहेर त्या बाहुल्या नाचवीत असतो आणि बाहुल्यांकडून करविलीं जावयाचीं भाषणें वगैरे तो मालक स्वतः किंवा बरोबरचा एकादा साथीदार करीत असतो व याप्रमाणें ते लोक जनरंजन करतात. त्यामुळें कोणत्याही नाटकाच्या रंगभूमीवरील मुख्य व्यवस्थापकास "सूत्रधार" म्हणण्याची वहिवाट पडली आहे. याचप्रमाणें इतर कांहीं टीपांच्या द्वारें पंडितांनीं मनोरंजक माहिती दिली आहे.

त्याच (१८६९) सालीं शंकरराव पंडितांनीं कालिदासाच्या "मालविकाग्निमित्र" या नाटकाचीहि वरील प्रमाणेंच एक आवृत्ति तयार करून प्रसिद्ध केली. ती आवृत्ति देखील पंडितांनीं निरनिराळ्या ठिकाणांहून असे सात हस्तलेख गोळा करून व त्यांची चांगली छाननी करून तयार केली आहे. त्याचप्रमाणें त्यांनीं तिला एक विद्वत्वसूचक प्रस्तावना जोडून त्यांत त्यांनीं त्या नाटकासंबंधानें कांहीं युरोपियन पंडितांनीं जीं विचित्र मतें प्रसिद्ध केलीं होतीं त्यांचें सप्रमाण खंडण केलें आहे. ह्यासंबंधाचा अगदीं थोडक्यांत सारांश असा आहेः—प्रो. होरेस विल्सन यांनीं असें प्रतिपादन केलें होतें कीं, ज्या कालिदासानें शाकुंतल व विक्रमोर्वशीय हीं दोन नाटकें लिहिलीं, त्याच कालिदासानें मालविकाग्निमित्र हें नाटक लिहिलेलें दिसत नाहीं. कारण पहिल्या दोन कृतींत कवीची जी तर्कशक्ति व माधुर्य दिसून येतें तें मालविकाग्निमित्र नाटकांत दिसत नाहीं. यावरून हें नाटक ख्रिस्ती शकाच्या दहाव्या-

किंवा अकराव्या शतकांत लिहिलें गेलें असावें. शंकरराव पंडितांनीं या दोन्ही कोट्या निराधार असल्याचें सबळ आधार देऊन सिद्ध केलें आहे. कवीची तर्कशक्ति व भाषापद्धति हे गुण जसे शाकुंतल व विक्रमोर्वशीय या दोन नाटकांत दिसून येतात तसेच ते मालविकाग्निमित्र नाटकांतही आहेत हें सिद्ध करण्याकरितां पंडितांनीं या नाटकांतील व दुसऱ्या दोन्ही नाटकांतील कांहीं शब्द, शब्दसमुच्चय, व श्लोक एकत्र जवळजवळ आणून आपलें म्हणणें सिद्ध केलें आहे. पंडितांनीं दुसरींही कारणें दिलीं आहेत. एकतर आपल्या देशांतील परंपरागत दंतकथा अशी आहे कीं, शाकुंतल व विक्रमोर्वशीय या दोन नाटकांचा जो कर्ता तोच मालविकाग्निमित्र नाटकाचाहि कर्ता आहे. दुसरी गोष्ट अशी कीं, स्वतः कर्ता ( मालविकाग्निमित्र ) नाटकांत ही " कालिदासकृति " आहे असें स्पष्ट म्हणतो. चवथें कारण असें आहे कीं, कालिदास हा साधारणतः आपल्या कवितेच्या आरंभीं शंकराची स्तुति करून त्याला वंदन करीत असतो. तसेंच त्यानें मालविकाग्निमित्र नाटकांतहि केलें आहे. पांचवी गोष्ट अशी कीं, कालिदास हा मोठा विनयशील असून तो नेहमीं आपल्याकडे लघुत्व घेऊन बोलत असतो. रघुवंशाच्या पहिल्याच सर्गांतील तिसरा श्लोक प्रसिद्ध आहेः—

**मंदः कवियशः प्रार्थी गमिष्याम्युपहास्यताम् ।**
**प्रांशुलभ्ये फले लोभादुद्बाहुरिव वामनः ॥**

( माझ्यासारख्या बुद्धिमंदानें कवि होऊं पाहणें म्हणजे लोकांच्या उपहासालाच पात्र होणें होय. उंच मनुष्याच्याच सहज हाताला लागणारें फळ केवळ लोभानें वर हात करून पाडूं पाहणाऱ्या ठेंगू मनुष्याला कोण बरें हंसणार नाहीं ? ) तसेंच शाकुंतल नाटकाच्या पहिल्याच अंकांत सूत्रधार मोठ्या शालीनतेनें आपल्या नाट्यकलाकौशल्याविषयीं पुढीलप्रमाणें उद्गार काढतोः—

**आपरितोषाद्विदुषां न साधु मन्ये प्रयोगविज्ञानम् ।**
**बलवदपि शिक्षितानामात्मन्यप्रत्ययं चेतः ॥**

( एकाद्याची नाट्यकलाकुशलता पाहून विद्वान व तज्ज्ञ लोक खुष झाल्याशिवाय, ती श्रेष्ठ आहे असें मी समजत नाहीं. मनुष्य हा कितीहि शिकलेला असला तरी त्याच्या मनाला स्वतःविषयीं खात्री वाटत नसते ! )

हीच कालिदासाची मनोवृत्ति व्यक्त करणारा मालविकाग्निमित्र नाटकाच्या दुसऱ्या अंकांत पुढील श्लोक आहे:—

उपदेशं विदुः शुद्धं सन्तस्तमुपदेशिनः ।
श्यामायते न युष्मासु यः कांचनमिवाग्निषु ॥

( ज्याप्रमाणें अग्नीमध्यें तापविल्यानें सोन्याची परीक्षा होते, तद्वत् जी कृति तुमच्या परीक्षेंत पास झाली तीच शहाणे लोक उत्तम कृति असें म्हणतात. ) असो; आणखी अशीं उदाहरणें देतां येतील. इतक्या प्रमाणांवरून असें स्पष्ट रीतीनें सिद्ध होतें कीं, शाकुंतल व विक्रमोर्वशीय या नाटकांचा जो कर्ता तोच मालविकाग्निमित्र नाटकाचाहि कर्ता आहे.

या नाटकाच्या कालाविषयींचेंहि विल्सन साहेबांचें मत शंकरराव पंडितांनीं खोडून टाकलें आहे. त्या साहेबबहादुरांच्या मतें मालविकाग्निमित्र हें नाटक दहाव्या किंवा अकराव्या शतकांत लिहिलें गेलें असावें. या मताच्या खंडनार्थ पंडितांनीं सप्रमाण केलेलें विवेचन बरेंच विस्तृत आहे. त्याचें येथें प्रयोजन दिसत नाहीं. फक्त पंडितांनीं दिलेल्या एकाच प्रमाणाचा येथें उल्लेख करतों. मालविकाग्निमित्र नाटकांत "परिव्राजिका" हें एक स्त्री पात्र आहे. ती परिव्राजिका धर्मानें बौद्ध आहे. तरी तिच्याबद्दल सर्वांना—राजाला, राणीला, हरदास, गणदास वगैरे ब्राह्मणांना देखील—मोठा आदर वाटत होता असें दाखविलें आहे. ही बौद्धधर्माची स्थिति ख्रिस्ती शकाच्या दहाव्या-अकराव्या शतकांत असणें शक्य नाहीं. त्या धर्माचें ह्या दोन शतकांत हिंदुस्थानदेशांतून पूर्ण उच्चाटन झालें होतें. अशा स्थितींत परिव्राजिकेसारखें पात्र त्या काळीं रचल्या गेलेल्या नाटकांत घालतां येणें संभवनीय नव्हतें. बौद्धधर्माविषयीं इतका आदर तो धर्म अगदीं जोरांत असतांनाच लोकांस वाटणें शक्य आहे. म्हणजे तो काल चवथ्या किंवा पांचव्या शतकाच्या अलीकडे ओढतांच येत नाहीं ( Vide, Telang's introduction to Bhartrihari's Niti and Vairagya Shatakas, p. XII ). तो कदाचित् त्याच्याही मागें जाऊं शकेल. पंडितांचे या संबंधांत असे शब्द आहेत:—

" The probability is that the play was written not at

a time when Buddhism was despised and had already been driven out of India, but when it was still regarded with favour and was looked up to with reverence; and this must refer us to a time several centuries prior to the tenth or eleventh century after Christ."

याप्रमाणें पंडितांनीं प्रोफेसर विल्सन साहेबांनीं मालविकाग्निमित्र नाटकासंबंधानें पुढें आणलेल्या कोट्या निराधार असल्याचें सिद्ध केलें आहे.

या नाटकांत मालविका व अग्निमित्र यांच्या एकमेकांवरील प्रेमाविषयींचें वर्णन आहे. मालविका ही धारिणी राणीची दासी होती, व ती गायन व नृत्य या कला शिकत होती. पण राणी ही राजाच्या–अग्निमित्राच्या–अंतःकरणाविषयीं मत्सरग्रस्त असल्याकारणानें ती मालविकेला राजाच्या दृष्टीस पडूं देत नसे. एकदां असें झालें कीं, राणीनें आपल्या चित्रशाळेंत बाकीच्यांच्या चित्रांबरोबर अनवधानतेनें मालविकेचेंहि चित्र काढवून ठेविलें होतें. तें राजाच्या नजरेस पडतांच तिला--मालविकेला--प्रत्यक्ष पाहण्याविषयीं त्याच्या मनांत उत्सुकता उत्पन्न झाली. पुढें तिचें गायन, नृत्य या कलांमधील नैपुण्य पाहण्याची राजास संधि मिळाली. त्यावेळीं राजाच्या मनांत तिजविषयीं प्रेम उत्पन्न झालें. याची शंका येऊन मग राणीनें मालविकेला कुलुपांत बंदोबस्तानें ठेविलें. पण पुढें कांहीं युक्तिप्रयुक्ति योजिल्यावर ती पुन्हां राजाच्या दृष्टीस पडली. इतक्यांत अग्निमित्राच्या मुलानें--राजपुत्रानें–सिंधुनदीच्या कांठावरील यवन लोकांवर जय मिळविल्याची सुवार्ता आली व त्या विजयोत्सवाच्या निमित्तानें राणीनें सर्व लहान मोठ्या माणसांना देणग्या व बक्षिसें वांटलीं. त्याच वेळीं राणीनें आनंदाच्या भरांत राजाचें मालविकेवरील प्रेम आवरतां येण्यासारखें नाहीं हें पक्कें जाणून तिला राजाला देऊन टाकिली. आणि याप्रमाणें नाटकाचा गोड शेवट झाला !

पंडितांनीं सरकाराकरितां कालिदासाच्या " रघुवंश " काव्याचीही एक आवृत्ति तयार केली होती. रघुवंशाचे एकंदर एकोणीस सर्ग आहेत. त्यांचे पंडितांनीं तीन भाग करून ते प्रसिद्ध केले आहेत. पहिला--१ ते ६ सर्गांचा–भाग त्यांनीं ते डेक्कन कॉलेजांत फेलो असतांनाच सन १८६९ सालीं प्रसिद्ध केला. हा भाग तयार करतांना पंडितांनीं निरनिराळ्या ठिकाणांहून असे सहा हस्तलेख

गोळा केले होते; व मधून मधून अवलोकनाकरितां दोन जास्त हस्त-लेख त्यांनीं मुंबईहून आणविले. पंडितांनीं या भागाच्या शेवटीं स्पष्टीकरणाच्या टिपा जोडलेल्या असून प्रथमच एक विद्वत्वदर्शक प्रस्तावना जोडली आहे. त्यांत त्यांनीं निरनिराळ्या हस्तलेखांच्या दृष्टीनें पाठभेदांसंबंधीं चर्चा केली आहे.

या भागांत वैवस्वत मनूच्या वंशांत उत्पन्न झालेला जो राजा दिलीप त्याचा मुलगा रघु व त्याचा मुलगा अज अशा तीन राजांच्या कारकिर्दीचें वर्णन आलें आहे. दिलीप राजा व त्याची राणी सुदक्षिणा यांनीं वसिष्ठ ऋषींच्या आश्रमांतली जी (कामधेनूची मुलगी) नंदिनी तिची सेवा करून तिला प्रसन्न केल्यामुळें तिच्या कृपाप्रसादानेंच राजाला (व राणीला) पुत्रप्राप्ति झाली. पुढें दिलीपानें शंभर अश्वमेध यज्ञ करण्याचा संकल्प करून व प्रत्येक अश्वमेधाच्या वेळीं अश्वरक्षणार्थ राजपुत्रालाच (रघूला) देऊन त्यानें नव्याण्णव अश्वमेध पार पाडले. शंभराव्या यज्ञाच्या वेळीं अश्वाच्या बाबतींत रघु व इंद्र यांजमध्यें युद्ध होऊन राजपुत्राचें शौर्य पाहून इंद्र फार खुष झाला व दिलीप राजाला शंभरहि अश्वमेधांचें फळ–शंभरावा यज्ञ न करावा लागतांही–देण्यास कबूल झाला! नंतर रघु हा राजपदावर चढून दिग्विजयाला निघाला व तें काम संपल्यावर त्यानें विश्वजित् यज्ञ करून ब्राह्मणांना सर्वस्व दान केलें! रघूला मग कांहीं काळानें अज हा मुलगा झाला व त्याचें (राजपुत्राला) योग्य असें शिक्षण झाल्यावर विदर्भ देशाच्या राजाच्या बोलावण्यावरून अजाला तेथील इंदुमती राजकन्येच्या स्वयंवराकरितां पाठवून देण्यांत आलें. इतकी कथा पंडितांनीं प्रसिद्ध केलेल्या पहिल्या भागांत आली आहे. त्यापैकीं दुसऱ्या सर्गांतील, दिलीपराजा व सिंह यांजमधील संवाद, तिसऱ्या सर्गांतील इंद्र व रघु यांच्यामधील संवाद व पांचव्या सर्गांतील रघु व गुरुदक्षिणेची याचना करण्याकरितां आलेला वरतंतुशिष्य कौत्स यांजमधील संवाद हे भाग अत्यंत हृदयंगम आहेत. असो.

शंकरराव पंडितांनीं रघुवंशाचा (सात ते तेरा सर्गांचा) दुसरा भाग सन १८७२ मध्यें म्हणजे ते डेक्कन कॉलेजांत संस्कृतचे प्रोफेसर असतांना–प्रसिद्ध

केला. या भागांत अजाचें पाणिग्रहण, अजविलाप, दशरथराजाचें मृगयागमन, व श्रावणाच्या आईबापांनीं त्याला दिलेला शाप, रामावतार, सीतेशीं रामाचा विवाह, रावणाचा वध, व दंडकारण्यांतून परत अयोध्येला येणें इतका कथा-भाग आलेला आहे. या भागाच्याहि शेवटीं पंडितांनीं स्पष्टीकरणाच्या टिपा जोडल्या आहेत.

रघुवंशाचा तिसरा (चवदा ते एकोणीस सर्गांचा) भाग पंडितांनीं सन १८७४ मध्यें–ज्या सालीं ते लंडन येथील परिषदेस गेले होते, त्या सालीं प्रसिद्ध केला. त्यांत सीतेचा परित्याग, रामाचें स्वर्गारोहण, कुशाचा कुमुद्वतीशीं विवाह, अतिथिवर्णन व वंशानुक्रम हे भाग आले आहेत. या तिसऱ्या भागाच्याही शेवटीं पंडितांनीं टिपा जोडलेल्या असून प्रथमच एक प्रस्तावनाहि जोडली आहे. प्रस्तावनेंत त्यांनीं अनेक विषयांसंबंधीं चर्चा केली आहे. त्याचा थोडक्यांत इकडे तात्पर्यार्थ देतों. सदरील तिसरा भाग तयार करण्याकरितां पंडितांनीं आठ हस्तलेख मिळविल्याचें सांगितलेंच. त्यांपैकीं पांच जैन वाङ्मयासंबंधाचे होते. कित्येकांच्या मतें कालिदासानें रघुवंशाची कथा १९ सर्गांत पूर्ण केली नाहीं; त्याच्याही पुढें कांहीं अधिक सर्ग असले पाहिजेत; पण ते उपलब्ध नाहींत ही दुःखाची गोष्ट आहे. रामावतारापर्यंतची रघुवंशाची नामावलि वर दिल्याप्रमाणें स्पष्टच आहे. रामानंतर पुढील राजांनीं सुमारें पांचशें वर्षें राज्य केलें. कुश, अतिथि, निषध, नल, नभःशब्द, पुंडरीक, क्षेमधन्वन्, देवानीक, अहीनगु, पारियात्र, शिल, उन्नाभ, वज्रनाभ, शंखण, व्युषिताश्व, विश्वसह, हिरण्यनाभ, कौशल्य, ब्रह्मिष्ठ, पुत्र, पुष्य, ध्रुवसंधि, सुदर्शन व अग्निवर्ण.

कित्येक पाश्चात्य पंडितांच्या मतें "रघुवंश" हें काव्य कालिदासानें लिहिलेलें नसावें ! या प्रश्नाविषयीं व ह्या काव्याच्या कालाविषयीं शंकरराव पंडितांनीं लंडन येथील परिषदेंत वाचलेल्या निबंधांत विस्तृत रीतीनें विवेचन केलें आहे. त्याचाच थोडासा अनुवाद त्यांनीं प्रस्तुत रघुवंशाच्या तिसऱ्या भागास जोडलेल्या प्रस्तावनेंत केला आहे. त्या निबंधाचा सारांश पुढील प्रकरणांत यावयाचा असल्यामुळें त्या संबंधानें इकडे विस्तार करण्याचें कारण नाहीं. परंतु प्रस्तावनेंत पंडितांनीं एकंदरींत काय ठरविलें आहे याचें थोडक्यांत दिग्दर्शन करतों.



**रा. ब. शंकर पांडुरंग पंडित**

( लंडन परिषदेला गेले असतांना तेथें घेतलेला फोटो. )

१. कालिदास हा शककर्ता विक्रमादित्य याचा समकालीन होता या दंत-कथेला बाधक होईल असें रघुवंश काव्यांत कांहींच नाहीं.

२. कालिदासानें या काव्यांत व्यक्त केलेल्या ज्योतिःशास्त्राच्या ज्ञानावरून त्याचा काल ख्रिस्तपूर्व पहिलें शतक—तो काल स्वतंत्र रीतीनें ठरल्यास—ठरण्यास मुळींच अडचण येणार नाहीं.

३. नाटकांचा कर्ता कालिदास हाच रघुवंश, कुमारसंभव व मेघदूत या काव्यांचाही कर्ता आहे हें स्पष्ट आहे.

४. कालिदास हा आठव्या शतकाच्या बराच पूर्वी–म्हणजे उज्जयिनी येथें राज्य करणाऱ्या एका विक्रमादित्याच्या वेळीं होऊन गेला असला पाहिजे.

५. दहाव्या शतकांतील धारा येथील भोजराजाशीं कालिदासाचा संबंध जोडण्याविषयींच्या ज्या गोष्टी कित्येक लोक सांगतात त्या सर्व निराधार व त्याज्य आहेत.

६. रामायण हें कालिदासाच्या पुष्कळच—कितीतरी—पूर्वी रचलें गेलें असलें पाहिजे.

७. या संबंधाची डॉ. वेबर साहेबांची कल्पना अगदीं चुकीची आहे.

---

## प्रकरण ७ वें

# लंडन येथील परिषद्

सन १८७४ सालीं लंडन येथें भरलेल्या प्राच्यभाषाविशारद पंडितांच्या परिषदेंत ( Conference of Orientalists ) मुंबई सरकारकडून रा. ब. शंकर पांडुरंग पंडित यांना मुंबई इलाख्याचे प्रतिनिधि म्हणून पाठविण्यांत आलें होतें. त्यांनीं परिषदेंत हजर राहून कशाप्रकारें काम केलें याचा थोडासा विस्तार पुढें येईलच. पण सरकारकडून हा मान मिळण्यापूर्वींच्या शंकररावांच्या स्थितीविषयीं इकडे चार शब्द लिहिणें जरूर आहे. शंकरराव पंडित हे १८६५ मध्यें पुण्यास डेक्कन कॉलेजांत सीनियर फेलो होऊन आल्यावर त्यांनीं एका

शास्त्रीबोवांजवळ नेमानें संस्कृत भाषा शिकण्यास सुरवात केली हें पूर्वी सांगितलेंच आहे; त्याचवेळीं सीनियर फेलो या नात्यानें ते डेक्कन कॉलेजांत संस्कृत शिकविण्याचेंहि काम करीत असत, हेंहि प्रिन्सिपॉल साहेबांच्या रिपोर्टांचा दाखला देऊन मागें दर्शविलें आहे. पुढें सहाच महिन्यांनीं शंकरराव भगवानदास पुरुषोत्तमदास संस्कृत स्कॉलर्शिपच्या परीक्षेला बसले होते, या गोष्टीवरून त्यांची संस्कृतांत किती शीघ्रगति झाली होती हें सहज दिसून येतें. ह्याच मुदतींत त्यांनीं एका सोल्जराजवळ जर्मन भाषेचाहि अभ्यास चालविला होता याचाहि मागें उल्लेख आला आहे. शिवाय त्यांचा ह्याच वेळीं लॅटिन ही दुसरी भाषा घेऊन एम्. ए. चा अभ्यास चालू असून त्यांनीं कालिदासकृत विक्रमोर्वशीय व मालविकाग्निमित्र हीं दोन नाटकें व रघुवंश हें महाकाव्य या मोठाल्या ग्रंथांचें मुंबईसरकारकडून प्रसिद्ध होत असलेल्या संस्कृतपुस्तकमालेकरितां ( The Bombay Sanskrit Series ) ठिकठिकाणचे हस्तलेख आणवून तपासपूर्वक संशोधन करणें व टीपा लिहिणें हीं कामें चालविलीं होतीं. १८६८ मध्यें त्यांची एम्. ए. ची परीक्षा दुसऱ्या वर्गांत पास झाली व वरील संस्कृत पुस्तकांच्या सटीप आवृत्त्या सन १८६९ सालीं प्रसिद्ध झाल्या ! या सर्व—अवघ्या चार वर्षांत घडून आलेल्या-गोष्टींचा समुच्चयदृष्टीनें विचार केला म्हणजे त्यावरून शंकररावांच्या ठिकाणीं स्पष्ट दिसून येणाऱ्या ज्ञानलालसा, उद्योगशीलता, बुद्धीची ग्राहकता व चिकाटी या गुणांबद्दल मन आश्चर्यानें थक्क होतें व त्यांच्याबद्दल अत्यंत आदर वाटतो. अशा संस्कृतज्ञ पंडितांची पुढें दोनच वर्षांनीं डेक्कन कॉलेजमधले संस्कृतचे प्रोफेसर डॉ. कीलहॉर्न हे रजेवर गेल्या वेळीं त्यांच्या गैरहजेरींत ( १८७१ ते १८७३ पर्यंत ) त्यांच्या जागीं नेमणूक व्हावी यांत नवल वाटण्यासारखें कांहीं नाहीं; व अशा सर्वथैव लायक गृहस्थांना पुढच्याच ( १८७४ ) सालीं लंडन येथील प्राच्यभाषापंडितांच्या परिषदेला सरकारनें आपले प्रतिनिधि म्हणून पाठवावें हें ओघानेंच प्राप्त झालें.

लंडन येथें भरलेली ही परिषद तशाप्रकारची दुसरी होय व तिच्या कामास ता. १४ सप्टेंबर १८७४ रोजीं सुरवात झाली. जगांतील प्राच्य-भाषाविशारद अशा पंडितांची युरोप खंडांतील मुख्य मुख्य शहरांत

वेळोवेळ परिषद भरवावी व त्या योगानें विश्वपंडितांमध्यें विचारविनिमय करण्यास एक साधन उत्पन्न करावें ही कल्पना प्रथम फ्रान्स देशांतील एक विद्वान् गृहस्थ रॉसनी ( Mon. de Rosny ) यांनीं काढली, व अशी पहिली परिषद सन १८७३ सालीं पॅरिस येथें भरविण्यांतहि आली. तिचे सदरहू रॉसनी साहेब हेच अध्यक्ष होते. दुसरी परिषद लंडन येथें भरली व तिचे डॉ. सॅम्युअल बर्च ( Dr. Samuel Birch ) हे अध्यक्ष होते.

या लंडन येथील परिषदेच्या कामाच्या सोयीसाठीं, अनेक शाखा करण्यांत आल्या होत्या व त्यांचे निरनिराळे अध्यक्ष निवडण्यांत आले होते. त्यांपैकीं " आर्यन्‌शाखा " ही एक मुख्य असून तिचे प्रोफेसर मॅक्समुल्लर हे अध्यक्ष होते. व त्याच शाखेंत आपले रा. ब. शंकर पांडुरंग पंडित हे एक हिंदुस्तानचे प्रतिनिधि म्हणून त्यांचा समावेश करण्यांत आला होता.

आर्यन शाखेच्या कामास सुरवात करतांना प्रो. मॅक्समुल्लर साहेबांनीं एक फार महत्त्वाचें भाषण केलें. तें वास्तविक इकडे दिलें पाहिजे. परंतु तें फारच विस्तृत आहे, व त्यामुळें तें समग्र देतां येणें शक्य नाहीं. आम्ही फक्त त्यांतून कांहीं थोडे निवडक असे उद्बोधक उतारे देतों. त्यावरून त्या भाषणाच्या खऱ्या स्वरूपाची वाचकांस कल्पना होईल.

प्रो. मॅक्समुल्लर म्हणाले, " ज्याप्रमाणें युरोपखंडाच्या उत्तरेकडील रानटी–स्वीडिश, रशियन वगैरे–लोकांचा दक्षिणेकडील ग्रीक व लॅटिन संस्कृतीशीं संबंध आल्याबरोबर त्यांच्या ठिकाणीं जागृति उत्पन्न झाली व ते सुधारणेच्या पंथास लागले, त्याचप्रमाणें युरोपीअन राष्ट्रांचा पौरस्त्य लोकांशीं व त्यांच्या वाङ्मयाशीं संबंध येऊं लागल्यापासून त्यांच्यामध्यें–युरोपीअन लोकांमध्यें–जागृति उत्पन्न झाली आहे व आपणांस त्या पौरस्त्य लोकांपासून शिकण्यासारखें काय आहे, याविषयीं ते विचार करूं लागले आहेत. अशा प्रकारच्या विचारसरणीस प्रेरणा उत्पन्न करणाऱ्या युरोपीअन गृहस्थांमध्यें पहिला मान सर विल्यम जोन्स, टॉमस कोलब्रूक इत्यादि पंडितांना दिला पाहिजे. नंतर कांहीं दिवसांनीं त्यांना जर्मन पंडित येऊन मिळाले व त्याच्या नंतर फ्रेंच पंडित आले. ...... आम्हांस ही गोष्ट कबूल करणें भाग आहे कीं, पूर्वदिशेकडून येणाऱ्या या ज्ञानरवीच्या

किरणांचा आम्हांस लाभ झाला नसता तर हल्लींइतकें पुढें आलेलें--किंबहुना इतकें भरभराटलेलें--युरोपखंड म्हणजे प्राचीन आशिया खंडाचें एक पुढें आलेलें एक टोंक (promontory) एवढ्याच स्वरूपानें राहिलें असतें! ....... आजमितीस आम्ही केवळ निराळ्याच जगांत आहों. पूर्व व पश्चिम यांमध्यें अभेद्य असलेली भिंत आज नष्ट झालेली आहे. सर्व धर्मांचें मूळ पूर्वदिशेकडूनच आलें आहे, व फक्त ख्रिस्ती धर्म खेरीज करून बाकी सर्व धर्मांतील पवित्र पुस्तकें पौरस्त्य भाषांमध्येंच लिहिलेलीं आहेत..... ...... या सर्व धर्मांतील मूलतत्त्वांचा विचार केला म्हणजे देवाविषयीं प्रेम —Love of God—हें एकच तत्त्व त्यांतून ओंवलें गेलें आहे असें स्पष्ट आढळून येतें.

"प्राच्यवाङ्मयाचा निर्विकार दृष्टीनें विचार केला असतां असें आढळून येतें कीं, तत्त्वज्ञानाच्या कोणत्याहि शाखेंत असा बहुधा एकहि विषय नाहीं कीं, ज्याचा प्राचीन हिंदुलोकांनीं विचार केला नव्हता. आणि निरनिराळे प्रश्न घेऊन त्यासंबंधीं विचार करण्यांत इकडे हिंदु व तिकडे ग्रीक अशा तत्त्ववेत्त्यांचीं मनें कशीं गुंतलीं होतीं, व दोन्ही बाजूंची विचारसरणी एकाच वेळीं समांतर रेषांनीं कशी चालली होती हें पाहिलें म्हणजे मन आश्चर्यानें भरून जातें! ........ वरील प्रकारचें हिंदु व ग्रीक तत्त्वज्ञानविषयक विचारसरणींत कांहींसें साम्य आढळून येतांच एकानें (Dr. C. B. Schlüter, 1874) असें म्हटलें कीं, ग्रीक तत्त्ववेत्त्यांनीं हिंदुस्थानांतून आपलें तत्त्वज्ञान आणलें असलें पाहिजे. तर दुसऱ्या कित्येक पंडितांनीं असें ठरविलें कीं, ग्रीक तत्त्ववेत्त्यांपासूनच लबाड हिंदुब्राह्मणांनीं आपलें तत्त्वज्ञान घेतलें. आणि संस्कृत वाङ्मय म्हणजे सगळें थोतांड (imposition) आहे!! पण असल्या विचित्र व भ्रामक कल्पनांना तुलनात्मक पद्धतीनें आतां आळा घातला आहे. या पद्धतीनें हिंदु व ग्रीक वाङ्मयांचें काळजीपूर्वक अवलोकन केल्यापासून असें स्पष्टपणें आढळून आलें आहे कीं, जी गोष्ट एका देशांत शक्य आहे, तीच दुसऱ्या देशांतहि शक्य आहे. एकापासून ती दुसऱ्यानें घेतली असें म्हणण्याचें बिलकूल कारण नाहीं. ग्रीस देशामध्यें प्लेटो व ॲरिस्टॉटल यांचा जन्म व्हावयाच्यापूर्वीं ज्या प्रकारची परिस्थिति उत्पन्न झाली

असेल, तशीच ती हिंदुस्थानांत वेदान्त व सांख्य या ( व्यास व कपिल यांच्या ) मतांचा उदय व्हावयाच्यापूर्वी उत्पन्न झाली असेल. याचा अर्थ इतकाच कीं, मनुष्यांचीं मनें, त्या मनांमध्यें निरनिराळ्या कल्पना उत्पन्न करण्यासारखी भोंवतालची परिस्थिति व त्या कल्पना व्यक्त करण्याकरितां जरूर लागणारी भाषा इतकी सामुग्री एके ठिकाणीं तयार असल्यावर व्यास व कपिल यांनीं निर्माण केलेल्या ( षड्दर्शनांपैकीं ) दर्शनांसारखे ग्रंथ किंवा थेल्स आणि हेगेल ( Thales and Hegel ) यांनीं रचलेले तत्त्वज्ञानविषयक ग्रंथ हे निर्माण झालेच पाहिजेत. तसे ते न झाले तर मात्र आश्चर्य !

वरील प्रकारच्या वाङ्मयात्मक संशोधनक्षेत्रांत प्रथम प्रथम कांहीं वर्षें युरोपियन पंडितच काम करीत असत. किंबहुना त्यांचेंच तिकडे साम्राज्य होतें असें म्हणण्यासही हरकत नाहीं. पण पुढें सुशिक्षित हिंदु लोकही त्या कार्याकडे लक्ष देऊं लागले. याविषयीं प्रो. मॅक्समुल्लर साहेबांनीं पुढील प्रमाणें उल्लेख करून अशा मंडळींचा गौरव केला आहे. "अलीकडे नवीन पद्धतीनें शिकलेली मंडळी ( हिंदुस्थानांत ) पुढें येत असून ते आमच्या युरोपीअन पंडितांशीं चढाओढ करीत आहेत. डॉ. भाऊ दाजी यांनीं अनेक विषयांवर लिहिलेले संशोधनात्मक निबंध केवळ बिनमोल आहेत. कलकत्त्याचे राजेंद्रलाल मित्र, गिरिप्रसाद सिंह वगैरे मंडळींचे याच दिशेनें चाललेले प्रयत्न प्रशंसनीय आहेत."

प्रो. मॅक्समुल्लर साहेबांनीं डॉ. भांडारकर व रावबहादुर शंकर पांडुरंग पंडित यांनीं तयार केलेल्या संस्कृत पुस्तकांसंबंधानें, तीं युरोपीय पंडितांनीं प्रसिद्ध केलेल्या पुस्तकांपेक्षां कोणत्याही दृष्टीनें कमी योग्यतेचीं नाहींत, असे उद्गार काढले आहेत: "The editions of Sanskrit texts published at Bombay by Prof. Bhandarkar and Mr. S. P. Pandit and others need not fear comparison with the best works of European scholars."

त्याचप्रमाणें "इंडियन अॅन्टिक्वरी" मध्यें प्रसिद्ध होणाऱ्या हिंदी पंडितांच्या लेखांसंबंधानें देखील प्रो. मॅक्समुल्लर साहेबांनीं प्रशंसेचेच उद्गार काढले आहेत. ते

असे: "In the 'Indian Antiquary' we meet with contributions from several learned natives, among them............ from Mr. Kashinath Trimbak Telang.........which are read with the greatest interest and advantage by European scholars." म्हणजे रा. तेलंग यांचे व इतरांचे लेख युरोपीअन पंडितांना आदरणीय वाटत असून ते त्यांचेकडून लक्षपूर्वक वाचले जातात.

प्रो. मॅक्समुल्लर यांनीं अखेर समारोपाच्या रूपानें हिंदी पंडितांसंबंधानें असे उत्तेजनपर उद्गार काढले: "या ग्रंथसंपत्तीवरून असें स्पष्टरीतीनें दिसून येतें कीं, हिंदी सुशिक्षित लोकांमध्यें वाङ्मयाची अभिरुचि वाढत आहे व त्यांच्यामध्यें देशाभिमान जागृत होत आहे:.........

**संगच्छध्वं संवदध्वं सं वो मनांसि जानताम् ।**
**देवा भागं यथापूर्वे संजानाना उपासते ।**
......................."

वरीलप्रमाणें सन १८७४ मध्यें प्रो. मॅक्समुल्लर साहेबांनीं आमच्या सर्व साधारण सुशिक्षित लोकांमध्यें उत्पन्न झालेल्या वाङ्मयविषयक अभिरुची-संबंधानें व आमच्या देशाभिमानासंबंधानें जे कौतुकाचे उद्गार काढले त्याबद्दल आम्ही आभार मानतों. पण त्यांच्या अपेक्षेप्रमाणें गेल्या साठ वर्षांत आमच्या महाराष्ट्रांत भाऊ दाजी-भांडारकर-तेलंग-पंडित-पाठक, वैद्य इत्यादिकांची परंपरा चालू ठेवणारे किती निघाले अगर प्रस्तुत किती दृष्टीस पडतात याचा विचार केला म्हणजे मात्र निराशाच वांट्यास येते, याबद्दल मनास अत्यंत विषाद वाटतो !

परिषदेच्या त्याच आर्यन शाखेपुढें रा. ब. शंकर पांडुरंग पंडित यांनीं आपला कालिदासावरचा निबंध वाचला. "रघुवंशकाव्य हें कोणीं लिहिलें व केव्हां ?" ( Who wrote the *Raghuvaṁsha* and when ? ) असा त्या निबंधाचा मथळा होता. त्यांत पंडितांनीं कित्येक युरोपीअन लेखकांनीं रघुवंशकाव्यासंबंधानें काढलेल्या शंकांचें सप्रमाण खंडन केलें आहे. उदाहरणार्थ, डॉ. वेबर या जर्मन पंडितानें आपल्या "रामायणा"वरील निबंधांत असें म्हटलें आहे: "There is at least some doubt whether we are right in ascribing it ( *Raghuvaṁsha* ) to the author of the dramas and the *Meghaduta*."

( नाटकें व मेघदूत यांचा कर्ता जो कालिदास त्यानेंच रघुवंश काव्य लिहिलें असें मानण्यांत आमची चूक होत नसेल ना, अशी शंका वाटते ! ). यासंबंधानें पंडितांनीं शोधपूर्वक शक्य तेवढे सर्व आधारभूत ग्रंथ तपासपूर्वक पाहिले व ते म्हणतात कीं, " डॉ. वेबर सांगतात तशी शंका घेण्याचें मुळींच कारण नाहीं. " पहिली गोष्ट ही कीं, कालिदास हाच " रघुवंश " काव्याचा कर्ता आहे याविषयीं संबंध हिंदुस्थान देशांत आजपर्यंत कोणीच शंका काढिली नाहीं. उलट एका पिढीपासून दुसऱ्या पिढीला याप्रमाणें कित्येक शतकेंपर्यंत उतरत आलेल्या परंपरागत दंतकथेवरून पाहिल्यास असें खात्रीनें समजतें कीं, नाटकांचा कर्ता जो " कालिदास " त्यानेंच " रघुवंश " व इतर काव्यें लिहिलीं. या दंतकथेचें एक स्वरूप म्हणजे " रघुवंश " काव्यावर लिहिल्या गेलेल्या अनेक टीका होत. या टीका भिन्नभिन्न काळीं व भिन्नभिन्न ठिकाणीं रचल्या गेल्या आहेत व त्यांपैकीं प्रत्येक टीकाकार " रघुवंश " हें काव्य कालिदासानें लिहिलें असेंच म्हणतो. शंकरराव पंडितांना अशा नऊ टीका पाहण्यास मिळाल्या. त्यांपैकीं एकाहि टीकाकारानें, वरील डॉ. वेबर साहेबांनीं काढलेल्या प्रकारची शंका काढलेली नाहीं. एक टीकाकार " दिनकर " हा सन १३८५ मध्यें होऊन गेला. त्यानें आपल्या टीकेंत " चारित्रवर्धन " याचाच मुख्यतः आधार घेतला आहे. " चारित्रवर्धन " या टीकाकाराला इतकी मोठी योग्यता प्राप्त होण्याला तो निदान एकदोन शतकें तरी पूर्वीं होऊन गेला असला पाहिजे. या दोन टीकाकारांनीं—दिनकर व चारित्रवर्धन यांनीं—आपल्या ग्रंथांत दुसऱ्या कांहीं पूर्वीं होऊन गेलेल्या टीकाकारांचे आधार घेतले आहेत. त्यांपैकीं " चारित्रवर्धन " ह्यानें " विस्तरकार " व " कृष्णभट्ट " या दोन पूर्वींच्या टीकाकारांचा उल्लेख केला आहे. " दिनकर " यानेंहि आपल्या ग्रंथांत उल्लेखिलेल्या टीकाकारांमध्यें पुन्हा " कृष्णभट्ट " हा आहेच. या पूर्वींच्या टीकाकारांनीं जर रघुवंश काव्याचा कर्ता " कालिदास " हा नाटकांच्या कर्त्या " कालिदासा"हून कोणी भिन्न होता असें म्हटलें असतें तर पुढच्या दोन—दिनकर व चारित्रवर्धन—टीकाकारांनीं त्या गोष्टीचा उल्लेख करून तिच्या सत्यासत्यतेविषयीं आपल्या ग्रंथांत कांहींतरी " होय—नाहीं " अशा प्रकारची चर्चा केली असती हें उघड आहे. पण तशी त्यांनीं चर्चा

मुळींच केली नाहीं. उलट " दिनकर " हा मोठ्या विनयानें आपल्याकडे लघुत्व घेऊन असें म्हणतो कीं जसा चंद्राचा प्रकाश **जड** अशा समुद्राला खळबळवून सोडतो, तशी कालिदासाची कविता माझ्या मनांत ( मीही जडच ! ) विपुल प्रकाश पाडते.

**सौधाकरैककिरणावलिरम्बुराशिम् ।**
**उल्लासयत्यतिजडं विपरीतमेतत् ॥**
**श्रीकालिदासकवितैव परं मनो मे ।**
**वैदुष्यसंपदमलं विपुलीकरोति ॥**

या श्लोकाचा तात्पर्यार्थ वर आलाच आहे.

" मल्लिनाथ " हा टीकाकार तर याहीपेक्षां अधिक स्पष्टपणें म्हणतो कीं, " व्याचष्टे कालिदासीयं काव्यत्रयम् ". म्हणजे मल्लिनाथ हा " रघुवंश, कुमारसंभव व मेघदूत " हीं तिन्ही काव्यें कालिदासानेंच लिहिलीं असें स्पष्ट म्हणतो. " मल्लिनाथ " हा ख्रिस्ती शकाच्या चवदाव्या शतकांत होऊन गेला असें डॉ. भाऊदाजी हे म्हणतात. मल्लिनाथ हा आपल्या टीकेंत "नाथ" व " दक्षिणावर्त " या दोन पूर्वी होऊन गेलेल्या टीकाकारांचा उल्लेख करतो. या दोन टीकाकारांचा "दिनकर" व " चारित्रवर्धन " यांनींही उल्लेख केलेलाच आहे. म्हणजे आपल्या हिंदुस्थानदेशांत सुमारें सातशें वर्षें चालत आलेल्या दंतकथेवरून पाहतां " रघुवंश " या काव्याचा कर्ता " कालिदास " हा कोणी नाटकांच्या कर्त्या कालिदासाहून दुसरा " कालिदास " आहे असें मुळींच दिसत नाहीं.

यापुढें पंडितांनीं अंतःप्रमाणांवरून—म्हणजे रघुवंशांतले बरेच श्लोक घेऊन व ते कुमारसंभवांतल्या व शाकुंतल नाटकांतल्या श्लोकांशीं ताडून दाखवून—आपलें म्हणणें अत्यंत स्पष्ट रीतीनें—सूर्यप्रकाशाप्रमाणें—सिद्ध केलें आहे. ते सगळे श्लोक इकडे—शेजारीं शेजारीं मांडलेले असे—देऊन जागा अडविण्याचें कारण नाहीं. फक्त " रघुवंशा " च्या सातव्या सर्गांतील पंधराव्या श्लोकाचा उत्तरार्ध व " शाकुंतल " नाटकाच्या पांचव्या अंकांतील दुसऱ्या श्लोकाचा उत्तरार्ध इकडे घेऊन दाखवितों. म्हणजे त्यांवरून पंडितांनीं दिलेल्या अंतःप्रमाणाच्या समर्पकपणाविषयीं कोणाचीही खात्री होईल.

रघुवंश. VII 15:—

गतेयमात्मप्रतिरूपमेव । मनोहि जन्मांतरसंगतिज्ञम् ॥

शाकुंतल V2:—

तच्चेतसा स्मरति नूनमबोधपूर्वम् । भावस्थिराणि जननांतरसौहृदानि ॥

म्हणजे पूर्वजन्मीं संबंध आल्यामुळें कदाचित् एखाद्या वस्तूकडे अगर मनुष्याकडे मन ओढत असेल.

पंडितांचा निबंध अठ्ठावीस पानांचा आहे. त्याचा थोडक्यांत वरील प्रमाणें सारांश असून आतां पंडितांनीं शेवटीं जो निष्कर्ष काढला आहे तो थोडक्यांत देतों.

१. नाटकांचा ( शाकुंतल, विक्रमोर्वशीय व मालविकाग्निमित्र यांचा ) कर्ता जो " कालिदास " तोच रघुवंश, कुमारसंभव व मेघदूत या काव्यांचाहि कर्ता आहे.

२. कालिदास हा ख्रिस्ती शकाच्या आठव्या शतकाच्या मध्याच्या पुष्कळच पूर्वी होऊन गेला असला पाहिजे.

३. धार येथील ( अकराव्या शतकांतील ) भोज राजाशीं कालिदासाचा संबंध जोडण्याविषयींच्या ज्या कथा केव्हां केव्हां सांगण्यांत येत असतात त्या सर्व निराधार व अविश्वसनीय आहेत.

याप्रमाणें शंकरराव पंडितांनीं लंडन येथील परिषदेंत आपला विद्वत्त्वपूर्ण निबंध वाचला. त्याबद्दल परिषदेंत जमलेल्या युरोप, अमेरिका खंडांतील विद्वान लोकांनीं त्याची वाहवा केली यांबद्दल आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. त्याचप्रमाणें ही बातमी आमच्या देशांत समजल्याबरोबर इकडील सर्व जाणत्या लोकांना आनंद व्हावा व त्यांनीं तसे उद्गार काढावे हेंहि साहजिक होतें. मुंबईच्या " नेटिव्ह ओपिनियन " पत्रानें या संबंधांत असें लिहिलें होतें: " त्या सभेंत ( १८७४ सालच्या लंडन येथील परिषदेंत ) त्यांनीं ( पंडितांनीं ) कालिदासाच्या कालावर निबंध वाचून युरोपांतील मोठमोठ्या पंडितांकडून आपली वाहवा करून घेतली. "

पण पंडितांच्या या कृतीचें एवढ्यानेंच महत्त्व संपत नाहीं. त्याचें स्थूल दृष्टीनें त्याहीपेक्षां निःसंशय जास्त महत्त्व होतें. सर विल्यम जोन्स, टॉमस कोलब्रूक, होरेस विल्सन, डॉ. वेबर, प्रो. मॅक्स मुल्लर इत्यादि युरोपीअन पंडितांनीं आमच्या हिंदुस्थान देशांतील प्राचीन वाङ्मयाचें परिश्रमपूर्वक आलोडन करून बरीच उपयुक्त माहिती जगापुढें आणली हें खरें आहे, इतकेंच नव्हे तर जगाच्या इतिहासांतील कामगिरीच्या दृष्टीनें आमच्या आर्यपूर्वजांचें स्थान किती उच्च होतें हें त्या पंडितांनींच दाखवून दिलें; व त्याबद्दल आम्ही त्यांचें सदैव ऋणी राहिलें पाहिजे. परंतु त्या पंडितांच्या बाजूस एक दोन उणिवा होत्या व त्यामुळें त्यांचे सिद्धांत केव्हां केव्हां चुकीचे ठरत असत. एक तर ते पंडित भिन्न परिस्थितीमध्यें वाढलेले असत, व त्यांचा ग्रीक-लॅटिन वाङ्मयाशीं अगदीं बाळपणापासून दृढ परिचय झालेला असल्यामुळें, जगाच्या कोणत्याहि भागांत एकादी चांगली गोष्ट किंवा संस्था त्यांना आढळून आल्यास त्याच्या बुडाशीं ग्रीक व लॅटिन संस्कृतीचें बीज असलें पाहिजे असा त्यांना पावलोपावलीं संशय येत असे. शिवाय ते धर्मानें ख्रिस्ती असल्यामुळें जगांतील दुसऱ्या कोणत्याही धर्मांत ख्रिस्ती धर्माच्या संसर्गाशिवाय कांहीं चांगले गुण असणें संभवनीयच नाहीं अशी त्यांची दृढ समजूत असे. यामुळें हिंदुलोकांविषयीं व त्यांच्या प्राचीन वाङ्मयाविषयीं त्या पंडितांच्या विचित्र व भ्रामक कल्पना असत. ते आमच्या ग्रंथांचें प्राचीनत्व कबूल करण्यासच तयार नसत. दुसरें असें कीं, हा देश गेलीं हजार वर्षें परकीय अंमलाखालींच पडलेला असल्यामुळें येथील लोकांत त्यांच्या मतें कांहीं चांगले गुण असणेंच शक्य नाहीं. तिसरी गोष्ट अशी कीं, इकडील ब्राह्मणांची जात म्हणजे एक लुच्च्या लोकांचें मंडळ असल्यामुळें त्यांचेंच इतर जातींवर वजन पडतें, व त्यांनीं वाङ्मयाच्या बाबतींत बराच घोंटाळा करून टाकला आहे, असें त्यांचें म्हणणें असे. अशाप्रकारच्या पूर्वग्रहांनीं सदरील पंडितांचीं मनें दूषित झालेलीं असल्यामुळें त्यांच्याकडून अनेकदां आमच्या वाङ्मयासंबंधानें विचित्र मतें बाहेर पडत असत. त्यांत पुन्हां आमच्या बाजूस सदैव विद्यमान असणाऱ्या 'ऐतिहासिक दृष्टीचा अभाव' या उणिवेची भर पडत असल्यामुळें त्या पंडितांना आमच्या

प्राचीन ग्रंथांविषयीं अगर संस्थांविषयीं, कालाच्या दृष्टीनें, वाटेल तें मत किंवा मतें प्रतिपादन करण्यास चांगली सवड मिळत असे. या सगळ्या अज्ञानमूलक—व म्हणून अन्यायमूलक—विचित्र प्रकारावर उत्तम तोड म्हणजे आमच्याच मंडळीनें पुढें येऊन वाङ्मयसंशोधनाच्या कामास प्रवृत्त होणें हीच होती. आणि सांगण्यास आनंद व अभिमान वाटतो कीं, परमेश्वरकृपेनें अशी मंडळी मग पुढें येऊन त्यांनीं आपल्या वैभवपूर्ण प्राचीन वाङ्मयाचें परिश्रमपूर्वक संशोधन चालविलें व वरील प्रकारच्या पाश्चात्य पंडितांच्या, विचित्र कल्पनांना किंबहुना त्यांच्या काल्पनिक भराऱ्यांना कायमचा आळा घातला! या दृष्टीनें विचार केला म्हणजे कै. बाळशास्त्री जांभेकर, डॉ. भाऊ दाजी, डॉ. भांडारकर, रा. ब. शंकर पांडुरंग पंडित व न्या. तेलंग यांनीं वाङ्मयक्षेत्रांत केलेली कामगिरी अत्यंत महत्त्वाची व बहुमोल ठरते, व त्याबद्दल आम्हां सर्व हिंदुलोकांना पराकाष्ठेचा अभिमान वाटतो. देशांत ठिकठिकाणीं पसरलेल्या शिलालेखांच्या व लेण्यांच्या विशदीकरणाच्या कामाचा प्रथम कांहीं वर्षें युरोपियन पंडितांनींच बहुतेक मक्ता घेतला होता; व त्या क्षेत्रांत कांहीं कालपर्यंत त्यांचेंच वर्चस्व किंबहुना साम्राज्य होतें. फक्त सदरहू बाळशास्त्री जांभेकर यांनीं सन १८४२ च्या सुमारास सातआठ शिलालेखांचा शोध करून लिहिलेले विद्वत्वसूचक लेख मुंबईच्या रॉयल एशियाटिक सोसायटीच्या त्या वेळच्या त्रैमासिकांत प्रसिद्ध झाले आहेत. असे हे विद्वान् व त्या वेळचे तरुण व होतकरू गृहस्थ अगदीं अल्पवयांत—छत्तिसाव्या वर्षी—कालवश झाले ही दुर्दैवाची गोष्ट आहे. त्यानंतर डॉ. भाऊ दाजी, डॉ. सर रामकृष्ण भांडारकर, रा. ब. शंकरराव पंडित व न्या. तेलंग हे पुढें आले व त्यांनीं वाङ्मयक्षेत्रांत बिनमोल कामगिरी केली आहे. यासंबंधाचा उल्लेख पुढील एका प्रकरणांत करूं.

---

प्रकरण आठवें

# मराठी ग्रंथसंशोधन

गेल्या दोन प्रकरणांत शंकर पांडुरंग पंडित यांनीं संस्कृत वाङ्मयक्षेत्रांत केलेल्या संशोधनकार्याचें अल्पसें दिग्दर्शन केलें. आतां त्यांनीं तशा प्रकारचें कार्य मराठी वाङ्मयक्षेत्रांत काय केलें याविषयीं थोडेंसें लिहावयाचें आहे.

पंडितांचें आपल्या मातृभाषेवरील प्रेम तर प्रसिद्धच होतें. त्यांनीं मराठींत ग्रंथसंशोधन पुष्कळच केलें होतें. त्यांत पुन्हां त्यांची सन १८६६ सालीं दक्षिणा प्राइझकमिटीच्या सेक्रेटरीच्या जागीं नेमणूक झाल्यामुळें मराठी भाषेची सेवा करण्यास त्यांना मुबलक क्षेत्र मिळालें होतें. त्या संबंधानें आतां क्रमानें थोडासा विस्तार करूं.

शंकरराव हे सन १८५८ ते १८६१ पर्यंत बेळगांवास होते, तेव्हांपासूनच त्यांना मराठी कवितेची गोडी लागून ते आपला व्यासंग उत्तम ठेवीत असत असें स्पष्ट दिसतें. कारण पुढें सन १८६३ च्या जून मध्यें त्यांनीं जो एक "बृहद्दशम" हा मराठी कविताबद्ध ग्रंथ शुद्ध करून विरामचिन्हांनीं युक्त असा प्रसिद्ध केला, त्यांत त्यांनीं बेळगांवचे एक "गर्दे" नांवाचे शास्त्री यांचें साहाय्य झाल्याचें नमूद केलें आहे. सन १८६१ मध्यें पंडित हे पगारी विद्यार्थी होऊन मुंबईस एल्फिन्स्टन कॉलेजांत पुढील अभ्यासाकरितां आल्यावरसुद्धां त्यांनीं आपला अभ्यास संभाळून मराठी कवितेचा जबरदस्त व्यासंग ठेवला होता. पंडित हे मराठी कविताग्रंथाचे मोठे मार्मिक भोक्ते असून त्यांना वामन, मोरोपंत व तदनंतरच्या कवींबद्दल मोठा अभिमान वाटत असे. इतकेंच नव्हे तर त्या काळांतले ( १८६० च्या सुमारास ) आपले लोक मराठी कवितेचा करावा तितका अभ्यास करीत नसत व त्याला तशीं कांहीं कारणेंही होतीं, या गोष्टी पंडितांच्या ध्यानांत आल्या होत्या; व त्यामुळें मराठी कवितेचें योग्य संशोधन करून व त्याच्या स्पष्टीकरणाचीं जरूर तीं साधनें उत्पन्न करून लोकांस त्या कवितेच्या अभ्यासाचा मार्ग सुलभ करून देणें हें आपलें—सुशिक्षित लोकांचें—कर्तव्य आहे असें त्यांना

वाटत असे; व त्या दिशेनें ते स्वतः प्रयत्न करीत असत. या त्यांच्या हौसेला मग वर सांगितल्याप्रमाणें "दक्षिणा प्राइझ कमिटी"च्या साधनानें उत्तेजन मिळून त्यांच्या हातून मराठी वाङ्मयाची बहुमोल सेवा झाली.

सन १८६३ सालीं पंडितांनीं "Marathi Classics" (अभिजात मराठी) या विषयावर एक अत्यंत मार्मिक व उद्बोधक असा लेख लिहून त्यावेळच्या "Elphinstone School Paper" (एल्फिन्स्टन शाळापत्रक) याच्या अक्टोबरच्या अंकांत प्रसिद्ध केला आहे. या शाळापत्रकाचें प्रथम प्रथम इतकें महत्त्व नव्हतें. पण पुढें सन १८६१ सालापासून प्रो. ह्यूलिंग्स साहेब हे त्याचे संपादक झाल्यामुळें त्या पत्रकाचें महत्त्व वाढलें व त्याचा शाळाखात्यांत व इतरत्र मनस्वी खप वाढला. असो. वर्ध्याचे प्रोफेसर श्रीधर विष्णु परांजपे यांनीं आपल्या "केकावली" वरील पुस्तकांत पंडितांच्या सदरील निबंधांतून एक बराच लांब उतारा दिलेला आम्ही कांहीं वर्षांपूर्वी पाहिल्यावरून त्या निबंधाकडे आमचें लक्ष प्रथम गेलें. परंतु तो मूळ निबंध पुष्कळ खटपटीनंतरही आम्हांस मिळेना; अखेर आमचे मित्र रा. फफे, पुण्याच्या ट्रेनिंग कॉलेजांतील एक शिक्षक, यांनीं आम्हांस सदर्हू निबंध कांहीं दिवसांपूर्वी दाखविला, आणि तो वाचतांच शंकरराव पंडितांचा आपल्या महाराष्ट्र कवींबद्दलचा एवढा अभिमान व प्रेम पाहून आम्हांस मोठें कौतुक वाटलें! सन १८५८ सालपर्यंत शंकरराव यांना कारकुनी पेशाच्या-जुन्या पद्धतीप्रमाणें-लिहिण्यावाचण्यापलीकडे मराठीचा किंवा इंग्रजीचा गंध नव्हता. तरी पुढील पांचच वर्षांत मॅट्रिकची परीक्षा चांगल्या रीतीनें पास होऊन कॉलेजांत बी. ए. चा अभ्यास चालू असतांना पंडितांनीं मराठी कवितेचा एवढा जबरदस्त व मार्मिक व्यासंग ठेवावा आणि त्यासंबंधीं इंग्लिश भाषेमध्यें चिकित्सक दृष्टीनें (Critically) एक सुंदर निबंध लिहून त्या परकीय भाषेवरील आपलें प्रभुत्व व्यक्त करावें याबद्दल कोणास बरें कौतुक व आश्चर्य वाटणार नाहीं?

आतां पंडितांच्या सदर्हू निबंधाचा अगदीं थोडक्यांत तात्पर्यार्थ देतों. पण तत्पूर्वी वाचकांस एकच इशारत द्यावी असें वाटतें. पंडितांनीं आपला निबंध सुमारें सत्तर वर्षांपूर्वी म्हणजे जवळ जवळ पाऊण शतकापूर्वी लिहिला होता. इतक्या

दीर्घकालांत मराठी वाङ्मयाची बरीच वाढ झाली आहे. अर्थात् पंडितांचे सर्वच विचार हल्लींच्या मराठी वाङ्मयाला लागू पडतील असें नाहीं. त्यामुळें त्या निबंधाकडे त्या काळच्या परिस्थितीच्या दृष्टीनें पहावयाचें आहे इतकें वाचकांनीं लक्षांत ठेवावें म्हणजे झालें. निबंधाचा मथळा " Marathi Classics " ( अभिजात मराठी ) असा आहे, हें सांगितलेंच. त्याविषयीं पंडितांनीं पुढीलप्रमाणें आपले विचार प्रगट केले आहेत. " मराठी कवितेंतला मुख्य विशेष हा आहे कीं, तिची भाषा केवळ प्रचारांतली--म्हणजे लोक बोलतात तशी--असते असें नाहीं. मराठी कवितेला सामान्यतः " प्राकृत कविता " असें म्हणतात, आणि तें बरोबर दिसतें. प्राकृत भाषेचें स्थान संस्कृत व प्रचारांतील मराठी भाषा यांच्या मधलें आहे. वास्तविक रीतीनें पाहिल्यास कोणत्याही भाषेंतील कवितेंत प्रचारांतल्या शब्दांहून भिन्न असे पुष्कळ शब्द असतात. पण प्राकृत कवितेंतला विशेष हा कीं, त्यांतील शब्दांच्या एक दशांश शब्दसुद्धां मराठी गद्य ग्रंथांत किंवा बोलण्याच्या मराठींत सांपडणार नाहींत ! प्राकृत कवितेच्या अभ्यासकांच्या मार्गांत ही एकच अडचण नाहीं. दुसऱ्याही कांहीं अडचणी आहेत. उदाहरणार्थ, ज्ञानेश्वरांच्या " ज्ञानेश्वरी "ची भाषा किंवा मुकुंदराजांच्या " विवेकसिंधू " ची भाषा ही सामान्य वाचकांस समजण्यासारखी नाहीं. आधीं ते ग्रंथ सदहू साधुश्रेष्ठांनीं आठशें--नऊशें वर्षांपूर्वींच्या लोकांकरितां त्यांच्या नेहमींच्या भाषेंत लिहिले होते हें लक्षांत ठेविलें पाहिजे. दुसरें असें कीं, त्या ग्रंथांत ग्रथित केलेले विचार किंवा सर्व विश्वांतील वस्तुजाताकडे पाहण्याकरितां अवलंबिलेली वैराग्ययुक्त दृष्टि या गोष्टींशीं समरस झालेल्या एकाद्या साधूच्या ठिकाणीं आपण आहों असें वाचकांनीं कल्पिल्याशिवाय ती कविता समजून घेण्याचा प्रयत्न करणें व्यर्थ आहे. ही झाली अगदीं जुन्या व साधी कविता रचणाऱ्या कवींच्या संबंधाची गोष्ट. पुढें अभिजात व प्रौढ मराठी भाषेंत कविता करणाऱ्या कवींचा उदय झाला. या वर्गांतील आद्यकवीचा मान वामनास दिला पाहिजे. वामन हा संस्कृतज्ञ पंडित होता, व प्रथम प्रथम त्यास मराठी-भाषेविषयीं इतकें प्रेमही वाटत नसे, हें प्रसिद्ध आहे. पण पुढें त्याला उपरति होऊन त्यानें आपली कवित्वशक्ति मराठीभाषेकडे वळविली. वामनानें आपल्या मराठी कवितेंत संस्कृतांतले शब्द, वृत्तें, यमक, अनुप्रास इत्यादि अलंकाराचे

प्रकार आणावयाची सुरवात करून भाषेला एवढें प्रौढ स्वरूप आणलें कीं, वामनाची ( मराठी ) कविता समजण्याकरितां वाचकांस संस्कृत भाषेची कांहीं तरी ओळख असणें जरूर आहे, अशी स्थिति प्राप्त झाली. पुढें अठराव्या शतकांत मोरोपंत झाला. त्यानें वामनापेक्षांही चार पावलें पुढें जाऊन मराठी-भाषेचें वैभव जास्त वाढविलें आणि तिला हिंदुस्थानदेशांतील सर्व अभिजात भाषांमध्यें अत्यंत उच्च स्थानीं नेऊन बसविलें! मोरोपंतानें मोठ्या शालीनतेनें आपल्या कवितेस कंथेची–गोधडीची–उपमा दिली आहे हें खरें, पण एकाद्या भाषेस शब्दालंकार व यथायोग्य शब्दसामुग्री यांच्या साहाय्यानें किती मोहक स्वरूप देतां येतें, व मोठमोठे गहन तात्त्विक अगर अध्यात्मिक विचार समास-पद्धतीचें अवलंबन करून कसे अगदीं थोडक्या शब्दांत व्यक्त करण्याचें भाषेंत सामर्थ्य आणतां येतें हें ज्याला पहावयाचें असेल, त्यानें मोरोपंताची कविताच वाचली पाहिजे. संस्कृत भाषेचें थोडेंतरी ज्ञान व संस्कृत शब्दांचा बराचसा भरणा प्राप्त करून घेतल्याशिवाय मोरोपंतांची कविता समजणेंच शक्य नाहीं. यासंबंधांत शंकरराव पंडितांचेच मूळ शब्द इकडे देणें योग्य दिसतें:

"Some centuries afterwards, Waman was the first who introduced the greatest number of Sanskrit metres and words, the first who adorned his verses with long harmonious rhymes and was the first who imposed upon every one who wished to hear him, the necessity of having at least some elementary knowledge of Sanskrit. Then followed our lofty and learned poet of the eighteenth century. He wrote, as he says himself, in a mystical Kantha (a patch-work of many-coloured cloth), and carried to the utmost height the outward ornament of rhyme, the logical accuracy and scientific exactness in use of words, the art of expressing long complicated thoughts within a most wonderfully short compass, by means of compounds or samasas (which is one of the characteristic beauties of Sanskrit, and hence of Marathi); and lastly almost a reverential observance of rules of grammar and idiom. And though he writes freely in the grave Arya metre, yet what are known as his masterpieces

can, by no means, be understood by an ordinary student or reader of Marathi poetry, much less of Marathi prose. Some knowledge of Sanskrit and a large vocabulary of Sanskrit words must, as a matter of necessity, be called upon to help him in securing an introduction to the works of Moropant."

याचा सारांश मराठींत वर आलाच आहे. असो. मराठी कवितेचा अभ्यास करणाऱ्या लोकांच्या मार्गांत या अडचणी आहेतच. याशिवाय विरामचिन्हां-संबंधाचा दोष, शब्दकोशांचा अभाव, याही अडचणी आहेत. तसेंच कवितेंत पौराणिक कथा, आख्यानें, उपाख्यानें यांचा उल्लेख आल्यास ह्यासंबंधीं खुलासा करणारीं किंवा कविता वाचीत असतांना कांहीं भूगोलविषयक अगर ऐतिहासिक माहिती पाहिजे असल्यास ती पुरविणारीं साधनें किंवा ग्रंथ आपल्या मराठी भाषेंत नाहींत. हीं कामें सुशिक्षित लोकांनीं केलीं पाहिजेत. नुसत्या जुन्या पोथ्या किंवा कशा तरी छापलेल्या कवितांच्या आवृत्त्या बिलकूल उपयोगाच्या नाहींत. स्वतः पंडितांनीं या दिशेनें अल्पसा प्रयत्न आरंभिला होता. स. १८६३ सालीं जूनमध्यें–म्हणजे हा निबंध लिहिला त्याच सालीं—पंडितांनीं मोरोपंतांचें अत्यंत गहन म्हणून प्रसिद्ध असलेलें जें "बृहद्दशम अथवा कृष्णविजय" हें काव्य त्याची संशोधनपूर्वक तपासून एक आवृत्ति प्रसिद्ध केली होती. यासंबंधानें पंडित सदरील निबंधांत असें म्हणतातः—

"And with the intention of removing such a desideratum as far as individual efforts can do, an edition of Moropant's *Krishna-Vijaya* has lately been brought out by the writer of this a rticle. The work is considered as the master-piece of its author's genius. And perhaps it is so."

सदरहू मोरोपंताचें काव्य शुद्ध करून त्याची आवृत्ति तयार करण्याकरितां पंडितांनीं फार श्रम केलेले दिसतात. व ती आवृत्ति त्यांनीं मुंबईतील त्यावेळचे प्रसिद्ध विद्वच्छ्रेष्ठ डॉ. भाऊ दाजी यांना अर्पण केली होती. डॉक्टर भाऊ दाजी हे त्या सुमारास (१८६३ मध्यें) मुंबईतील एक प्रसिद्ध पुढारी असून त्यांनीं तेथील "रॉयल एशियाटिक सोसायटी" या संस्थेचे एक सभासद या नात्यानें संस्कृत व मराठी या दोन्ही प्रकारच्या वाङ्मयाची

अत्यंत महत्वाची सेवा चालविली होती. ही गोष्ट व त्याबद्दल पंडितांना वाटत असलेला आदर हीं त्यांनीं अत्यंत विनम्र भावानें व्यक्त केलेलीं त्यांच्याच शब्दांत देतों:—

"To Bhau Daji Esq., G.G.M.C., J.P., Fellow of the University of Bombay.

This humble attempt at the promotion of the study of Marathi poetry is now respectfully dedicated as a token of approbation of his zeal and labours in the cultivation of Marathi literature."

मराठी कवितेच्या अभ्यासकाला सामान्यतः ज्या अडचणी वाटण्याचा संभव असतो त्यांचा वर उल्लेख आलाच आहे. अर्थात् त्या अडचणी दूर करण्याच्या हेतूनेंच पंडितांनीं ही" बृहद्दशम " ची आवृत्ति तयार केली होती. यासंबंधानें पंडित स्वतः आपल्या प्रस्तावनेंत असें म्हणतातः—

" वाचणाऱ्यांस कोशादिकांचें सहाय्य असलें किंवा नसलें तरी शोधपूर्वक तयार करून साधारण लोकांस वाचण्यासाठीं आणि विद्यार्थ्यांच्या अध्ययनासाठीं प्रसिद्ध करण्यास जे खरोखर योग्य असे मराठी कवितेंत ग्रंथ आहेत त्यांपैकींच हा " बृहद्दशम " एक होय. विद्वज्जनांचें मत याविषयीं असें आहे कीं, यांत कवीनें मोठे श्रम केले आहेत. इतकेंच नव्हे, पण त्यानें आपल्या कवित्व-चातुर्याचा जितका खर्च करवला तितका अंश यांत त्यानें खर्च केला आहे. मागें सांगितलेल्या सर्व अडचणी यास लागू असल्यामुळें आणि या ग्रंथाची योग्यताही तशी मोठी असल्यामुळें त्यांतील आर्यांचीं पदें पाडून, शब्द निर-निराळे छापून, संस्कृत व अव्यवहारित इत्यादि मराठी शब्दांचे अर्थ व सर्व कठीण संस्कृत समासांचे विग्रह व अर्थ प्रत्येक पृष्ठाच्या खालीं देऊन आणि सर्व ग्रंथांत विरामचिन्हें लिहून वाचणाऱ्यांस व अध्ययन करणाऱ्यांस हा ग्रंथ होईल तेवढा व तूर्त करवला तेवढा सुबोध करून आम्ही प्रसिद्ध केला आहे." तरी पंडित पुढें म्हणतात कीं, "परंतु इतकें केलें तरी हा ग्रंथ पुष्कळ लोकांस सर्वांशीं समजण्याजोगा नाहीं, असें म्हटलेंच पाहिजे. कारण कीं यांत कित्येक आर्या अशा आहेत कीं, त्यांची सविस्तर टीका लिहिल्याशिवाय सर्व वाचणाऱ्यांस तो

ग्रंथ समजेल अशी आशा करवत नाहीं......माझ्या परीक्षेच्या अभ्यासाच्या योगानें वेळ सांपडला नाहीं, म्हणून हें प्रस्तुत काम माझ्या मनाप्रमाणें झालें नाहीं. कदाचित् दुसरी आवृत्ति निघाली तर त्यावेळीं तसें करण्याची इच्छा आहे."

"बृहद्दशम अथवा कृष्णविजय" हें काव्य मोरोपंतांनीं आर्यागीति वृत्तांत रचलें असून तें त्यांच्या उत्तम काव्यांपैकीं एक आहे असें म्हणतात. त्याचे एकंदर ४९ अध्याय आहेत. पण मुख्य विषयावर ३९ अध्याय असून त्यांत श्रीमद्भागवत पुराणाच्या दहाव्या स्कंधांतील सर्व श्रीकृष्णावताराच्या कथेचें मराठींत वर्णन आलें आहे. यासंबंधानें खुद्द मोरोपंत प्रस्तुत काव्याच्या पहिल्या अध्यायाच्या सातव्या आर्यागीतींत असें म्हणतातः—

**कृष्ण कथा शुकराया ॥ अभिमन्युसुतास मुक्त आशु कराया ॥**
**वदला स्पष्टा दशमीं; ॥ ह्या गायिन एकवीस अष्टादश मी ॥ ७ ॥**

यांत श्रीकृष्ण अवताराची कथा, जी शुकमुनींनीं परीक्षिति राजास भागवताच्या दशमस्कंधांत सांगितली तीच इकडे एकुणचाळीस अध्यायांत वर्णिली आहे. "दशमस्कंधाची" मराठींत मोठी आवृत्ती आणली म्हणून त्याला "बृहद्दशम" अर्थात् कृष्णविजय हें नांव दिलें आहे तें योग्यच आहे.

पंडितांनीं ग्रंथांतील विषयांची अनुक्रमणिका, अध्यायांच्या क्रमाप्रमाणें, चरित्र-तात्पर्य थोडक्यांत काढून गीतीच्या रूपानें स्वतः रचून प्रत्येक अध्यायास एक गीति—कांहीं थोड्या अध्यायांस एकापेक्षां अधिक गीति विषयाच्या विस्तारामुळें घालाव्या लागल्या आहेत—याप्रमाणें ग्रंथाच्या आरंभीं घातली आहे. मासल्याकरितां पंडितांनीं रचलेल्या कांहीं गीति ( अनुक्रमणिका ) इकडे देतों. त्यावरून त्यांचे ठिकाणीं चांगल्या प्रकारची कवित्वशक्ति होती हें वाचकांच्या निदर्शनास येईल.

बृहद्दशमाच्या **दुसऱ्या** अध्यायांत पुढील कथा आली आहेः—

**मग भगवान् जगतरणा ॥ देवक्युदरीं सुशुद्धिं अवतरला ॥**
**ती अज–जगदीशकथा ॥ नव नव ऐकूनि, लोक भव तरला ॥**

**सातव्या** अध्यायांतली कथा.

शकट ध्वंसूनि हरी ॥ लीलानरतनु वधी तृणावर्ता ॥
घाबरला व्रजजन जो ॥ कृष्णा देखे मृतासुरावर्ता ॥

**बारावा** अध्याय.

गोपांसह वनिं जेवी ॥ तों विधि गो, वत्स, गोप सर्व हरी ॥
आपण नटूनि वृंदा ॥ घालवि विधिचा समग्र गर्व हरी ॥

**एकविसावा** अध्याय.

निजकाळीं वर शोभा ॥ शरदागम जो प्रजावना आणी ॥
कृष्णहि वाजवि वेणू ॥ त्यातें वर्णी **मयूर** कविवाणी ॥

**पंचविसावा** अध्याय.

गोवर्धन धारण हरि ॥ करि, पविधरमेघवृष्टितें वारी; ॥
वारी पासाव जना ॥ तारी, हरिमद हरूनि कितवारि ॥

**एकुणपन्नासावा अध्याय.**

भीष्मद्रोणांप्रमुखां ॥ भेटे अक्रूर, तेविं कुंतीस;
तत्तनयांही भेटुनि, ॥ कृष्णाशय मग सखा वदे तीस ॥
कुंतीसांत्वन करुनी, ॥ धृतराष्ट्रा करुनि व्यर्थ उपदेशा ॥
दे शासन कितवां जो ॥ त्या मग भेटे फिरूनि वरदेशा ॥

याप्रमाणें पंडितांनीं ग्रंथाच्या आरंभींच गीतिवृत्तांत विषयानुक्रमणिका दिली आहे. व शेवटीं सबंध ग्रंथासंबंधानें त्यांनीं आपलें मत दिलें आहे. तें असें:—

"The poet has nowhere else shown his art and genius to so full an extent; nowhere else is his language so sublime, words select, his thoughts so natural. In no other poem has he dispersed so many wise observations under the poetical veil, and thereby enriched a hackneyed subject, and in no other poem of his, is his style so classical and exact."

पंडितांच्या मतें मोरोपंतानें या काव्यांत आपली कवित्वशक्ति जितक्या उत्कृष्ट रीतीनें प्रकट केली आहे तितकी त्यानें दुसऱ्या कोठेंच केली नाहीं. अत्यंत प्रौढ भाषा, वेंचींव शब्द, व कवितारूपानें व्यक्त केलेले म्हणींसारखे अगर सुभाषितांसारखे—जणूं सूत्रबद्ध—मार्मिक विचार, हे प्रकार या काव्यांत जसे पहावयास मिळतात, तसे ते मोरोपंताच्या कवितेंत दुसऱ्या ठिकाणीं कोठेंच मिळत नाहींत. तसेंच या काव्याची भाषा ही अत्यंत उदात्त व अभिजातस्वरूपाची आहे. सारांश, प्रसिद्ध मराठीग्रंथकार कै. रामचन्द्र भिकाजी गुंजीकर यांनीं एकदां म्हटल्याप्रमाणें (भ्रम–निरास पृ. १६४) शंकरराव पंडितांनीं "मोरोपंताचें जें सर्वांत गहन काव्य बृहद्दशम–कृष्णविजय" त्यावर उत्कृष्ट टीपा देऊन, अन्व यसुलभ करून ह्या कवीला उदयास आणलें, यांत शंका नाहीं.

मराठी कवितेच्या दृष्टीनें शंकरराव पंडितांनीं जी दुसरी एक महत्त्वाची कामगिरी केली आहे ती तुकारामाच्या गाथेसंबंधानें होय. हा ग्रंथ (द. प्रा. कमिटीचे सेक्रेटरी या नात्यानें) शंकरराव पंडितांच्याच देखरेखीखालीं सन १८६९ सालीं उत्तम रीतीनें प्रकाशित झाला आहे. या कामांत त्यांना इंदुप्रकाशचे मालक कै. विष्णुशास्त्री पंडित व कै. जनार्दन सखाराम गाडगीळ या दोन गृहस्थांचें साहाय्य झालें होतें. गाडगीळ यांनीं तुकारामाचें इंग्रेजींत लिहिलेलें चरित्र या ग्रंथास जोडलेलें असून त्याची विद्वत्वसूचक प्रस्तावना ही स्वतः शंकरराव पंडितांनीं लिहिली आहे. हें पुस्तक इंदुप्रकाश छापखान्यांत छापलेलें असल्यामुळें त्याला "इंदुप्रकाशची गाथा" म्हणतात. या गाथेंतच तुकारामबोवांची सुशिक्षित लोकांस ओळख करून दिली गेल्यामुळें कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं देखील यासंबंधानें आपल्या निबंधमालेंत गौरवयुक्त रीतीनें उल्लेख केला आहे. ही गाथा तयार करण्याच्या कामीं शंकररावांनीं अतिशय श्रम केले होते. त्यांनीं अभंगांच्या उपलब्ध असलेल्या बहुतेक सर्व जुन्या प्रती निरनिराळ्या ठिकाणांहून मिळविल्या होत्या. व त्यांची काळजीपूर्वक छाननी करून आपल्या दृष्टीनें विश्वसनीय असे पाठभेद ठरविले होते. त्यामुळें ही पंडितांनीं तयार केलेली गाथा म्हणजे अधिकारयुक्त ग्रंथ मानला जात असून तो सर्व लोकांस--वारकरी पंथांतले, तसेच सुशिक्षित व अशिक्षित

लोक या सर्वांस मान्य झाला आहे. सबब शंकरराव पंडित यांच्या हातून ही मराठी भाषेची संस्मरणीय सेवा झालेली आहे.

शंकरराव पंडित यांची "दक्षिणा प्राइझ कमिटी"च्या सेक्रेटरीच्या जागेवर सन १८६६ सालीं नेमणूक झाली हें मागें सांगितलेंच आहे. त्या कमिटीचे प्रथम आठ सभासद होते. सदरील सालीं आणखी जास्त आठ सभासदांची नेमणूक झाली. त्यांत प्रोफेसर केरो लक्ष्मण छत्रे, रा. ब. भास्कर दामोदर पाळंदे, रा. बाळ मंगेश वागळे, रा. विष्णुशास्त्री पंडित व डॉ. भाऊ दाजी हे होते. कमिटीची वर्षांतून जुलै महिन्यांत एक सभा पुण्यास भरत असे व दुसरी जानेवारी महिन्यांत मुंबईस भरत असे. कमिटीच्या कामाच्या पद्धतींत या वर्षी —१८६६ मध्यें—एक महत्त्वाचा फेरबदल करण्यांत आला. त्यावेळपर्यंत कमिटीची उत्तेजनार्थ मदत सरसकट मराठींत प्रसिद्ध होणाऱ्या सर्व ग्रंथांना मिळत असे. याचें मुख्य कारण हें कीं, त्यापूर्वी चांगले लेखक पुढें येत नसत. त्यामुळें ग्रंथांची कसून परीक्षा केली जात नसे; व सरसकट सर्व पुस्तकांना मदत मिळत असे. पण याचा परिणाम असा होई कीं लोकोपयोगी असे फार थोडे ग्रंथ प्रसिद्ध होत असत. शालोपयोगी पुस्तकें मात्र बरींच प्रसिद्ध होत असत. त्यामुळें आतां ( ता. २०-८-६६ ) कमिटीनें असा ठराव केला कीं, यापुढें सामान्य लोकांना उपयोगी अशीं पुस्तकें लिहिणाऱ्या लोकांनाच फक्त कमिटीची मदत मिळेल, व या नियमानुसार कमिटीनें लागलीच "शिवाजी वरील कविता" लिहिणारास रु. ४०० चें एक बक्षिस व "तरुण हिंदु लोकांच्या मनावर भिन्न भिन्न दिशांनीं बरेवाईट परिणाम उत्पन्न करणारीं कारणें" ( Conflicting agencies now operating on a young Hindu's mind) या विषयावर एक उत्तम कादंबरी लिहिणारास रु. ४०० बक्षिस, अशीं दोन बक्षिसें जाहीर केलीं. त्याच प्रमाणें सन १८६६-६७ सालीं पुढील ग्रंथांस त्यांच्या समोर दाखलिलेली मदत देण्यांत आली.

१. महादेव मोरेश्वर कुंटेकृत "विप्रसांत्वन," रु. १००.

२. कृष्णशास्त्री राजवाडेकृत "महावीर चरित्र" याच्या भाषांतरास, रु. ४००.

३. गणेश शास्त्री लेलेकृत "विद्धशालभंजिका" याच्या भाषांतरास, रु. ३००.

आणखीहि अशींच दुसरीं लहानमोठीं पुस्तकें कमिटीची मदत मिळून प्रसिद्ध झालीं. पण त्यासंबंधीं आतां विस्तार करीत नाहीं. एकंदरींत सदरील (१८६६–६७) वर्षीं मराठींत ग्रंथनिष्पत्ति समाधानकारक झाली असा पंडितांनीं आपल्या रिपोर्टांत शेरा मारला आहे.

पुढील ( १८६७-६८ ) सालीं विनायक कोंडदेव ओक यांची "मधुमक्षिका" ( Bee ); केशवराव सुखटणकर यांचें "पानपतची लढाई" हें पुस्तक व कृष्णशास्त्री राजवाडे यांनीं केलेलें "विक्रमोर्वशी"चें भाषांतर हीं पुस्तकें द. प्रा. कमिटीपुढें मदतीकरितां आलीं होतीं, व त्यांस अनुक्रमें रु. १००, रु. २८० व २७५ अशीं बक्षिसें देण्यांत आलीं.

त्याचप्रमाणें सन १८६८–६९ सालीं, दोंदेकृत "चंद्रकांत"; गणेशशास्त्री लेले कृत "शिवराज चरित्र" ही कविता; कुंटेकृत "शिवाजी राजा" ही कविता; जोव्हेरकरकृत "विचित्रपुरी"; गणेशशास्त्री लेलेकृत "कर्पूरमंजरी" इत्यादि पुस्तकांस कमिटीकडून बक्षिसें देण्यांत आलीं.

बहुतेक पुस्तकांची स्वतः पंडित हे द. प्रा. क. चे सेक्रेटरी या नात्यानें काळजीपूर्वक व कसून परीक्षा करीत असत व त्याप्रमाणें त्यांवर बरेवाईट शेरे मारीत असत. विनायक कोंडदेव ओक यांच्या "मधुमक्षिका" पुस्तकाविषयीं पंडितांचा ग्रह चांगला झाला होता. त्यांच्या दृष्टीनें रा. ओक यांच्या शिक्षणाचा—ते नेवासें येथील मराठी शाळेचे मास्तर होते—विचार करतां त्यांनीं "मधुमक्षिका" यासारखें पुस्तक लिहिणें हें खरोखर फार स्तुत्य व भूषणावह होतें. पुस्तककर्त्यानें वाचकांपुढें मांडावयाच्या निरनिराळ्या विषयांची—बऱ्यावाईटपणाच्या दृष्टीनें—फार चांगली छाननी केली होती. इतकेंच नव्हे तर, स्वतः कर्त्यानें त्या त्या विषयासंबंधानें जी माहिती अगर जें ज्ञान परिश्रमपूर्वक मिळविलें होतें तें त्यानें वाचकांपुढें फार मनोरंजक रीतीनें मांडलेलें होतें. ओकांच्या पुस्तकाची भाषा अत्यंत शुद्ध असून सुबोध होती. कांहीं ठिकाणीं तर ती अगदीं उत्साहकारी होती. सदरील पुस्तकास कमिटीनें रु. १०० बक्षिस दिल्याचें मागें सांगितलेंच आहे.

सन १८६७ सालीं कमिटीपुढें अनंत दीक्षितकृत "गौरीहरविनोद"

हें नाटक मदतीकरितां आलें होतें. तें वाचून पंडितांचें मत एकंदरींत बरें झालें नव्हतें. त्यांनीं त्या पुस्तकावर खरमरीत टीका करून तें आश्रयाला पात्र नाहीं असें ठरविलें. अर्थात् कमिटीकडून त्या पुस्तकाला कांहींएक मदत मिळाली नाहीं.

याप्रमाणें द. प्रा. क. च्या सेक्रेटरीच्या जागेवर सुमारें चार वर्षें काम केल्यानंतर सन १८६९ मध्यें पंडितांची कलादगी जिल्ह्यांत डेप्युटीकलेक्टरच्या मोठ्या हुद्याच्या जागेवर नेमणूक झाली. तरी त्यांचा हक्क पुण्याच्या द. प्रा. क. सेक्रेटरीच्या जागेवर होताच. वर सांगितलेल्या कामांशिवाय शंकरराव पंडितांनीं मराठी भाषेची जी एक चिरस्मरणीय कामगिरी केली आहे, ती " वेदार्थयत्न " या मासिक पुस्तकाच्या द्वारें केलेली होय. त्यासंबंधानें आतां पुढील प्रकरणांत विचार करूं.

---

प्रकरण नववें

## वेदार्थयत्न.

रा. ब. शंकर पांडुरंग पंडित यांचा वैदिक वाङ्मयासंबंधाचा व्यासंग फार दांडगा होता. त्यामुळें साहजिकच आपल्या महाराष्ट्रांतील सामान्यलोकांना देखील वेदांच्या अर्थाविषयीं कांहीं माहिती असावी व त्या दिशेनें आपण थोडासा प्रयत्न करावा असें त्यांना वाटलें. " वेद " आपणांला पूज्य वाटतात. पण वेदांत काय सांगितलें आहे याची मात्र खरी कल्पना आपणांस नसते. या सर्व गोष्टींचा विचार करून पंडितांनीं " वेदार्थयत्न " या नांवाचें एक मासिक पुस्तक काढून त्या मार्गानें आपल्या लोकांना आपल्या पवित्र " वेद " ग्रंथांविषयींची माहिती करून देण्याचा निश्चय केला. म्हणजे पंडितांनीं हें " वेदार्थयत्न " मासिक पुस्तक कांहीं वर्षें मराठींत चालवून महाराष्ट्रांतील सामान्य जनतेला त्यांच्या पवित्र ग्रंथाचें ज्ञान करून घेण्याचा मार्ग मोकळा करून दिला व त्यायोगानें त्यांनीं आमच्यावर मोठे उपकार करून ठेवले आहेत.

दुसरी एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. आमच्या संस्कृत भाषेविषयीं व आमच्या वेदादि ग्रंथांविषयीं जर्मन लोकांना इतकी आस्था वाटत असे कीं, पंडितांच्या " वेदार्थयत्न " या मासिक पुस्तकाचा हिंदुस्थानपेक्षां जर्मनीमध्यें जास्त खप होत असे.

" वेदार्थयत्न " या मासिकाचा पहिला अंक सन १८७६ च्या एप्रिल महिन्यांत निघाला. पहिल्याच अंकाच्या प्रस्तावनेंत पंडितांनीं आपण आरंभिलेल्या कामासंबंधानें लोकांच्या माहितीसाठीं थोडासा खुलासा केला आहे, तो असा:—

" आपल्या लोकांच्या सर्व विधिनिषेधात्मक धर्माचें मूळ आम्ही " वेद " असें मानतों. सर्व शास्त्रांचें आदिस्थान " वेद " असें आपण म्हणतों. इतिहासाला आधार " वेद " आहेत, असें आपण प्रतिपादन करतों. स्मृति–पुराणांचें आदिकारण " वेद " असें आम्ही मानतों. अर्थात् अशा महत्वाच्या ग्रंथांसंबंधानें–वेदांसंबंधानें–आम्हांस माहिती असणें अत्यंत जरूर आहे.

वेदांचे " संहिता " व " ब्राह्मण " असे दोन भाग आहेत. वेद चार आहेत; ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद. या चारही वेदांच्या निरनिराळ्या संहिता व निरनिराळीं ब्राह्मणें आहेत. सामवेद संहिता ही ऋग्वेद संहिताच आहे. ऋग्वेदांतील ऋचा आहेत त्या तशाच सामवेदांत घेतल्या आहेत. फक्त दोन्ही ठिकाणचा क्रम मात्र भिन्न आहे. अथर्व वेदांतही ऋग्वेदांतलेच पुष्कळ मंत्र आहेत. नवे असे मंत्र त्या वेदांत फार नाहींत. ऋक्संहिता, सामसंहिता व अथर्वसंहिता या पद्यरूप आहेत. यजुर्वेदसंहिता ही मात्र पुष्कळ अंशीं गद्यरूप आहे. यजुर्वेदांत यज्ञयागाला उपयोगी असे विषय आहेत. तरी ऋक्–साम–अथर्व वेदांतल्याप्रमाणें कांहीं स्तुतिपर भागही पण त्यांत आहेत. अर्थात् वेदांचें खरें स्वरूप समजण्यास ऋग्वेदसंहिताच उत्तम आहे. सबब तिचेंच आम्ही मराठींत भाषांतर देत आहों.

प्रत्येक संहितेचीं निरनिराळीं ब्राह्मणें आहेत. ब्राह्मणांत बहुधा यज्ञ कसा करावा हें सांगितलेलें असतें. कांहीं ठिकाणीं संहितेंतील मंत्रांचा अर्थ सांगितलेला आहे. दुसऱ्या कांहीं ठिकाणीं मंत्रांसंबंधानें इतिहास दिलेला आहे. व तिसऱ्या एकाद्या

ठिकाणीं यज्ञांचीं फलें सांगितलीं आहेत. कित्येक ठिकाणीं आचार वर्णिलेले आहेत. कांहीं ठिकाणीं शब्दांच्या उत्पत्ति दिल्या आहेत. म्हणजे ब्राह्मणें हीं टीकेसारखीं आहेत. त्यांत संहितेंतील मंत्रांचा विस्तार केला आहे.

१. ऋग्वेदाचीं–ऐतरेय व कौषीतकि अशीं दोन ब्राह्मणें आहेत.

२. कृष्ण यजुर्वेदाचें–तैत्तिरीय हें एकच ब्राह्मण आहे.

३. शुक्ल यजुर्वेदाचें—शतपथ हें ब्राह्मण आहे.

४. सामवेदाचीं–प्रौढ व अद्भुत अशीं दोन ब्राह्मणें आहेत.

५. अथर्ववेदाचें–गोपथ हें एक ब्राह्मण आहे.

संहितेचा अर्थ समजल्यावर ब्राह्मणें समजण्यास कठीण नाहींत. पुस्तकांत खालीं आम्ही ऋग्वेद संहितेचें मुख्य भाषांतर मराठींत देत आहोंत. व मराठी भाषा न जाणणाऱ्या हिंदी लोकांकरितां भाषांतर इंग्रजींत देत आहों. टीपा मात्र मराठींतच दिल्या जातील.

वेदाची भाषा प्राचीन असल्यामुळें ती हल्लींच्या कांहीं संस्कृतज्ञ अशा लोकांनाही समजण्यास कठीण आहे. पण मंत्रांचा अन्वय अर्वाचीन संस्कृतांत "भाषा" या सदराखालीं देऊन तशा लोकांचीही आम्ही सोय केली आहे.

ऋग्वेदाचीं दहा मंडलें आहेत, व सुमारें एक हजार सूक्तें आहेत; व संबंध ऋग्वेदाच्या दहा हजारांपेक्षां कांहीं अधिक इतक्या ऋचा आहेत.

भाषांतर करतांना आम्ही सायणाचार्यांचें वेदांवरील भाष्य व इतर कांहीं अशींच साधनें यांचा उपयोग केला आहे.

वेदासारखा विषय हा ज्ञानाची ज्यांना खरी भूक लागली असेल, त्यांच्याकरितां आहे. तो कादंबरीसारखा केवळ मनाचें रंजन करणारा नाहीं, किंवा गायनासारखा कानाला गोड लागणाराही नाहीं. वेद हा आपला हिंदु लोकांचा–राष्ट्रीय ग्रंथ. याच्याच आधारावर आपले सर्व धर्मविधि, सर्व आचार-विचार, किंबहुना आपलें सर्व जीवित चाललें आहे. त्यामुळें अशा सर्वथैव महत्त्वाच्या आधारभूत ग्रंथाचें संरक्षण करणें, त्याचा अर्थ समजून घेणें, त्याचा विचार करणें, व त्याप्रमाणें शक्य तेवढें वागणें हें आपलें कर्तव्य आहे."

"वेदार्थयत्न" या मासिकाचा पहिला अंक प्रसिद्ध झाल्यावर तो वाचून अनेक मोठ्या युरोपीअन व नेटिव्ह पंडितांनीं त्यासंबंधानें आपले अनुकूल व गौरवपर अभिप्राय प्रसिद्ध केले. त्यांत प्रसिद्ध मॉनिअर विल्यम्स, डॉ. कील्हॉर्न व डॉ. बुल्हर हे युरोपीअन पंडित व "इंग्लिशमन" पत्र यांचे अभिप्राय फारच गौरवपर होते. त्याचप्रमाणें हिंदी पंडितांपैकीं कृष्णशास्त्री चिपळूणकर, बाळशास्त्री रानडे व गंगाधर शास्त्री दातार यांचे व "नेटिव्ह ओपिनियन" व "बंगाली" या पत्रांचे अनुकूल अभिप्राय प्रसिद्ध झाले होते.

याप्रमाणें ऋग्वेद संहितेचें भाषांतर हप्त्याहप्त्यानें प्रसिद्ध होतां होतां सन १८७८ च्या डिसेंबरच्या अंकांत पहिला अष्टक संपला. सबब पंडितांनीं या अंकांत कांहीं गोष्टींसंबंधानें खुलासा करून लोकांमध्यें आपल्या या प्राचीन ग्रंथाबद्दल–ऋग्वेदाबद्दल–अभिमान व आदर उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला आहे.

पहिल्या अष्टकांत एकशेंएकवीस सूक्तें आलेलीं असून तीं पंधरा ऋषींनीं रचलीं आहेत. त्यांपैकीं दोन ऋषि विश्वामित्र कुळांतले असून दोन कण्व-कुलांतले होते. तसेंच आंगिरस कुळांतले तीन ऋषि असून गोतम कुळांतले दोन होते. सर्व सूक्तकार ऋषींमध्यें हेच मुख्य होते.

वेदकाळांतल्या बहुतेक सर्व देवांचे पहिल्या अष्टकांत उल्लेख आलेले आहेत. त्यांचीं नांवें: अग्नि, वायु, इंद्र, मित्र, वरुण, दोघे अश्वि देव, मरुद् ( गण ), त्वष्टा, ब्रह्मणस्पति, सोम, ऋभुगण, सविता, द्यावापृथिवी, विष्णु, पूषा, भग, उषा, अर्यमा, रुद्र, सूर्य व अदिति.

वेदासारखा अत्यंत प्राचीन ग्रंथ अत्यंत प्राचीन संस्कृत भाषेंत लिहिलेला असतांहि त्याचे बहुतेक भाग समजण्यासारखे अद्यापि राहिले त्याबद्दलचें खरें श्रेय आपल्या वेदपाठक *ब्राह्मणांला आणि और्णवाभ, यास्क, दुर्ग,

*See in this connection what Prof. A. A. Macdonell, M.A., Ph.D. says in his "History of Sanskrit Literature" p. 8 Ed. 1900 :

"The Vedas are still learnt by heart as they were long before the invasion of Alexander and could even now be restored, from the lips of religious teachers, if every manuscript or printed copy of them were destroyed."

सायण इत्यादि आचार्यांना दिलें पाहिजे. या सर्वांचे आमचेवर—किंबहुना सर्व जगावर—मोठे उपकार झाले आहेत. पारशी लोकांचा धर्मग्रंथ "अवेस्ता" हा देखील वेदांसारखाच फार जुना आहे. परंतु त्याचा कांहीं भाग, अर्थाच्या व उच्चाराच्या दृष्टीनें, अद्यापि वादग्रस्त आहे! याचें मुख्य कारण एवढेंच कीं, वेदपठणाचा व वेदाभ्यासाचा जितका ब्राह्मणांनीं परिपाठ ठेवला आहे तितका पारशी लोकांनीं आपल्या धर्मग्रंथासंबंधानें ठेवला नाहीं!

वेदाच्या वेळीं संस्कृत भाषा ही अगदीं परिपक्व दशेला पोंचली होती. ती त्यावेळीं केवळ विद्वान् लोकांची भाषा नव्हती. ती समान्य जनतेची भाषा होती. त्यामुळें वेदांची भाषा ही कालिदासाच्या किंवा भवभूतीच्या भाषेसारखी अलंकारयुक्त अगर समासपूर्ण भाषा नसून ती अगदीं साधी, सुंदर व सहजोक्तिसंपन्न अशी आहे.

वेदांत वृत्तें पुष्कळ वापरण्यांत आलीं आहेत. पहिल्या अष्टकांत चोवीस वृत्तें आलीं आहेत. व सर्व ऋग्वेदसंहितेंत ७६ वृत्तें आलीं आहेत. म्हणजे वेदाची भाषा ही साधी व्यवहारांतली भाषा आहे. यासंबंधानें पंडित म्हणतातः—वेदांतील सूक्तांची कविता ही जरी रघुवंशासारखी मधुर नाहीं किंवा नैषधासारखी श्लेषाढ्य नाहीं, तरी ती साधी, सुंदर, सहजोक्तिसंपन्न आणि निष्कपट अर्थगौरवांनीं भरलेली अशी आहे. तींत जरी कालिदासाच्या सारख्या सुंदर उपमा नाहींत, तरी उषा (प्रातःकालच्या अरुणवर्णाचें तेज), वरुण (रात्रिरूप देव), सविता (सूर्यरूप देव), इत्यादि सृष्टपदार्थांचीं व तेजांचीं अत्युत्तम वर्णनें त्यांत भरलीं आहेत.

शंकररावांचा आपल्या आर्यसंस्कृतीबद्दलचा व आपल्या आर्यग्रंथांबद्दलचा अभिमान दांडगा असे. त्यामुळें त्यांना वाटत असलेली कळकळ त्यांनीं पुढील-प्रमाणें लोकांस केलेल्या विनंतीवरून चांगल्याच रीतीनें व्यक्त होते. ते म्हणतातः—

## शंकर पांडुरंग पंडित

"वेदार्थाचा अभ्यास सांप्रतकालीं पाश्चात्य देशांत जितका होत असतो, त्याच्यापेक्षां आपल्या या आर्य देशांत, या वेदांच्या जन्मभूमींत, किंबहुना या वेदाच्या माहेरघरीं अगदींच थोडा होत असतो; किंबहुना मुळींच होत नाहीं असें म्हटल्यासही चालेल.

माझा स्वतःचा या बाबतींतला अनुभव असा आहे कीं, वेदाच्या अभ्यासाचीं जीं साधनें आम्हां हिंदु लोकांस उपलब्ध आहेत व वेदांचा खरा अर्थ आम्हांस समजण्याचा जेवढा संभव आहे, त्या मानानें पाश्चात्य लोकांस उपलब्ध साधनें कमी व त्यांना वेदांचा अर्थ समजण्याचा संभव त्याहीपेक्षां कमी! यासंबंधानें, मी हें (भाषांतराचें) काम हातीं घेतल्यापासून जे जे पाश्चात्य पंडितांनीं लिहिलेले ग्रंथ पाहिले व त्यांच्याशीं आमच्या लोकांनींही लिहिलेले ग्रंथ ताडून पाहिले, त्यावरून माझ्या मनाची खात्री झाली आहे. याचें मुख्य कारण इतकेंच कीं, हिंदु लोक या देशांत जणूं काय वेदांच्या माहेरघरीं असल्यामुळें त्यांना वेदांतील कांहीं कांहीं ऋचा—ज्या पाश्चात्य लोकांस मोठ्या प्रयत्नाअंतीं देखील समजण्यास कठीण अशा—सहज समजण्यासारख्या असतात. कारण प्राचीन आर्य हिंदु व अर्वाचीन आर्य हिंदु यांच्या स्थितीमध्यें संस्कृतीच्या दृष्टीनें, मोठेंच अंतर पडलें आहे असें नाहीं, * आणि आम्हांमध्यें व पाश्चात्य लोकांमध्यें सर्वच दृष्टींनीं मोठें अंतर आहे. यास्तव पाश्चात्य विद्वान लोक जर आपल्या देशांत राहून उद्योगाच्या व चिकाटीच्या जोरावर वेदांचा अर्थ समजून घेण्याचा प्रयत्न करतात, मोठमोठे ग्रंथ लिहितात व त्या ग्रंथांचा आम्हांला उपयोग होतो,—याबद्दल आम्ही त्यांचे आभार मानले पाहिजेत—तर आम्ही आमच्या देशांत या वेदांच्या माहेरघरीं राहून, आमच्या आर्यसंस्कृतीच्या सहवासाच्या जोरावर जर परिश्रम केले तर वेदांचा अर्थ आम्हांस समजण्याचा जसा संभव आहे तसा पाश्चात्य लोकांस नाहीं हें इकडे नम्रपणें सांगितलें पाहिजे. यामुळें आमची आमच्या आर्यबंधूंना अशी विनंति आहे कीं, आम्हांस वेदांच्या अभ्यासाच्या बाबतींत जें हें भाग्य प्राप्त झालें आहे, तें आम्ही दूर लोटतां कामा नये.

---

* या संबंधांत लंडनचे प्रो. मॅक्डोनेल यांचे पुढील उद्गार अत्यंत मननीय आहेतः—

इतकेंच नव्हे तर त्याचा आम्ही पूर्ण फायदा घेऊन वेदांचा अभ्यास करणें व त्यांचा अर्थ समजून घेणें हें आमचें कर्तव्य आहे. व तसें केल्यापासून जो आनंद होईल व जी आमच्यामध्यें स्वाभिमानाची व देशाभिमानाची जागृति होईल त्याचा आपण जरूर उपयोग केला पाहिजे. ”

---

"Sanskrit is still spoken, as the tongue of the learned by thousands of Brahmans, as it was centuries before our era. Nor has it ceased to be used for literary purposes, for many books and journals written in the ancient language are still produced. The copying of Sanskrit manuscripts is still continued in hundreds of libraries in India, uninterrupted even by the introduction of printing during the present century. ........... A Vedic stanza of immemorial antiquity, addressed to the sun-god Savitri, is still recited in the daily worship of the Hindus. The God Vishnu, adored more than three thousand years ago, has countless votaries in India at the present day. ............ The wedding ceremony of the modern Hindu, to single out but one social custom, is essentially the same as it was long before the Christian era." ( Vide, Prof. Macdonell's " History of Sanskrit Literature ", page 8, Ed. 1900)

सारांशः विद्वान् लोकांची भाषा या नात्यानें हजारों ब्राह्मण लोक, खिस्ती शकापूर्वींप्रमाणेंच, आजमितीला संस्कृत बोलतात. त्या प्राचीन भाषेंत अद्यापि ग्रंथ-निष्पत्ति होत असते. छापखान्याची कला सुरू झाली असली तरी संस्कृत हस्त-लेखाच्या अद्यापि हातांनीं नकला केल्या जातात. शिकंदराच्या स्वारीच्या पूर्वीप्रमाणें अद्यापि हजारों ब्राह्मण वेद तोंडानें पाठ करीत असतात. गायत्री मंत्राचा जप हिंदु लोक पूर्वीप्रमाणें आज देखील नित्य संध्येच्या वेळीं करीत असतात. ज्या विष्णूची भक्ति तीन हजार वर्षांपूर्वी या देशांत करीत होते त्याच देवतेचे आजमितीला असंख्य भजक आहेत. लग्नविधि खिस्ती शकापूर्वी जसा प्रचारांत होता, तसाच तो आजतारखेलाही चालू आहे.

" वेदार्थयत्न " हें मासिकपुस्तक बरोबर सहा वर्षें चाललें. त्यांत ऋग्वेदांतील पुष्कळच सूक्तांचें भाषांतर आलें आहे. त्या सूक्तांतील विषयांसंबंधीं किंवा झालेल्या भाषांतरासंबंधीं इकडे विस्तार करतां येणें शक्य नाहीं. तरी मासल्याकरितां म्हणून वाचकांच्या माहितीसाठीं एक दोन ऋचा, त्यांचीं पाडलेलीं पदें, सरळ संस्कृतांत अन्वय व मराठींत अर्थ इतकीं येथें देणें इष्ट वाटतें.

पहिल्या मंडळांतील पहिल्या सूक्ताच्या ऋषीविषयींचा वगैरे असा उल्लेख आहेः–

ऋषिर्विश्वामित्रपुत्रो मधुच्छंदाः । अग्निर्देवता । गायत्रीछंदः ।

( याचा अर्थः विश्वामित्राचा पुत्र मधुच्छंद या ऋषीनें गायत्रीछंदांत अग्निदेवतेची स्तुति केली आहे. ) या सूक्ताचा नित्य ब्रह्मयज्ञांत व श्रावणीच्या वेळीं उत्सर्जन व उपाकर्म त्या होमांच्या वेळीं उपयोग करतात.

मं. १; सूक्त १ः ऋचा १ः

ॐ अग्निमीळे पुरोहितं यज्ञस्य देवमृत्विजम् ॥ होतारं रत्नधातमम् ॥ १ ।

पदेंः अग्निम् । ईळे । पुरोहितम् । यज्ञस्य । देवम् । ऋत्विजम् । होतारम् । रत्नऽधातमम् ।

अन्वयः पुरोहितम् यज्ञस्य देवम् ऋत्विजम् होतारम् रत्नऽधातमम् अग्निम् ईळे ( ईडे ).

अर्थः–पुरोहित, यज्ञाचा देदीप्यमान ऋत्विज, होता, ( आणि ) संपत्तीनें अतिशयेंकरून देणारा अग्नि याला मी स्तवितों.

मं. १; सूक्त २ः ऋचा १;

ऋषिर्विश्वामित्रपुत्रो मधुच्छंदाः ॥ देवता १–३ वायुः ।
४–६ इंद्रवायू । ७–९ मित्रावरुणौ । गायत्रीछंदः ।

( याचा अर्थः मधुच्छंद ऋषीनें गायत्रीछंदांत–पहिल्या तीन ऋचांत वायूची; दुसऱ्या तीन ऋचांत इंद्र व वायु यांची व पुढच्या तीन ऋचांत मित्र व वरुण यांची प्रार्थना केली आहे. )

वायवा याहि दर्शतेमे सोमा अरंकृताः ॥
तेषां पाहि श्रुधी हवं ॥ १ ॥

**पदें: वायो । इति । आ । याहि । दर्शत । इमे । सोमाः ।**
**अरंऽकृताः । तेषाम् । पाहि । श्रुधि । हवम् ।**

**अन्वयः हे दर्शनीय वायो आयाहि । इमे सोमा अलंकृताः । तान् पिब । हवम् ( च ) शृणु ।**

अर्थः हे सुंदर वायो, येथें ये; हे सोमरस तयार केले आहेत; ते पी ( आणि ) आमची प्रार्थना ऐक.

यांत वायूची प्रार्थना केली आहे.

**मं. १; अ. ३; सूक्त १०; ऋचा ३;**

**ऋषिर्विश्वामित्रपुत्रो मधुच्छंदाः । इंद्रो देवता । अनुष्टुप् छंदः ।**

( याचा अर्थः विश्वामित्र पुत्र मधुच्छंद या ऋषीनें अनुष्टुप् छंदांत इंद्राची प्रार्थना केली आहे. )

**युक्ष्वाहि केशिना हरी वृषणा कक्ष्यप्रा ।**
**अथान इंद्र सोमपा गिरामुपश्रुतिं चर ॥ ३ ॥**

**पदें. युक्ष्व । हि । केशिना । हरी । इति । वृषणा कक्ष्यऽप्रा । अथ । नः ।**
**इंद्र । सोमऽपाः । गिराम् । उपऽश्रुतिम् । चर ।**

अन्वयः–हे सोमपाः इंद्र केशिनौ वृषणौ कक्ष्यप्रौ हरी युंक्ष्व हि । अथ ( अनंतरम् ) अस्माकम् गिरामुपश्रुतिं चर ।

अर्थ—तूं ( तुझी ) अयाळी, जवान आणि पुष्ट पिंवळ्या रंगाची घोड्याची जोडी जोड. आणि मग हे सोम पिणाऱ्या इंद्रा, आमचीं स्तोत्रें ऐकण्यासाठीं ये. यांत इंद्राची प्रार्थना केली आहे. असो. याप्रमाणें या मासिकाचे ७२ अंक आहेत.

इतक्याच ऋचा पुरेत.

याप्रमाणें "वेदार्थ यत्न" या मासिक पुस्तकाचे बाहत्तर अंक बाहेर पडून तें लोकांच्या आश्रयाच्या अभावीं सन १८८२ एप्रिलपासून बंद करावें लागलें ! या बाहत्तर अंकांत ऋग्वेदसंहितेच्या आठ अष्टकांपैकीं निम्मा भाग आला आहे.

## प्रकरण दहावें

# अथर्ववेदसंहिता

ऋग्वेद संहितेचें मराठी वाचकांकरितां भाषांतर प्रसिद्ध करण्याचा उपक्रम करून शंकरराव पंडितांनीं केवढें मोठें काम केलें याचा मागील प्रकरणांत उल्लेख आलाच आहे. पंडितांनीं पुढें "अथर्ववेदा"ची एक शुद्ध आवृत्ति प्रसिद्ध करून त्याहीपेक्षां जास्त महत्त्वाची व चिरसंस्मरणीय कामगिरी केली आहे. अथर्ववेदा-संबंधाचें काम पंडित हे अहमदनगरला होते त्या मुदतींत सरकारतर्फे करीत होते. हातांत घेतलेलें काम बिनचूक रीतीनें शेवटास न्यावयाचें हें त्यांच्या स्वभावाचें एक मुख्य लक्षण असे. त्याप्रमाणें त्यांनीं हें अथर्ववेदासंबंधाचें काम केलें.

अथर्ववेदावरील भाष्य फार दुर्मिळ होतें. मोठमोठे युरोपीअन पंडितसुद्धां तें भाष्य मिळविण्याच्या कामीं प्रयत्न करून थकले! पण तें भाष्य ( चार भाग ) मोठ्या खटपटीनें शंकरराव पंडितांनीं म्हैसूर संस्थानांतील शृंगेरीच्या मठांतून व कुडलेहून ( Kudle ) मिळविलें व त्या भाष्यासह त्यांनीं आपली अथर्ववेदाची आवृत्ति प्रसिद्ध केली. त्याच्यापूर्वी युरोपियन पंडित रॉथ व व्हिटने यांनीं प्रसिद्ध केलेली एक अथर्ववेदाची आवृत्ति होती. पण त्यापेक्षां शंकरराव पंडि-तांनीं प्रसिद्ध केलेली सभाष्य अथर्ववेदाची आवृत्ति अधिक शुद्ध व अधिक महत्त्वाची आहे.

ही सभाष्य अथर्ववेदाची आवृत्ति पंडितांनीं चार भागांत प्रसिद्ध केली आहे. प्रत्येक भागाच्या मुखपृष्ठावर पुढीलप्रमाणें शब्द आहेतः–"अथर्ववेद संहिता सायणाचार्येण विरचितेन भाष्येणसहिता पंडितोपाभिधेन पांडुरंगसूनुना शंकरेण संशोधिता." हे सर्व भाग पंडितांनीं स्वतःच तयार केले होते. पण ते प्रसिद्ध करण्याचा योगायोग ते हयात होते तोंपर्यंत जुळून आला नाहीं. पंडित हे सन १८९४ मध्यें परलोकवासी झाल्यावर ते प्रसिद्ध करण्यांत आले. त्यांपैकीं पहिला व दुसरा असे दोन भाग सन १८९५ मध्यें प्रसिद्ध झाले; व तिसरा व चवथा हे दोन भाग सन १८९८ मध्यें प्रसिद्ध झाले. पहिल्या भागास पंडितांनीं प्रथमच एक

विस्तृत प्रस्तावना जोडून त्यांत त्यांनीं सर्व खुलासा केला आहे. शेवटच्या भागास एक छोटीशी प्रस्तावना–ही मात्र पंडितांची नव्हे, पण ती लिहिणाराचें नांव घालण्यांत आलेलें नाहीं–जोडण्यांत येऊन त्यांत शिवराम शास्त्री ताटके यांचें त्या कामीं महत्त्वाचें साहाय्य झालेलें असल्याबद्दल त्यांचे आभार मानण्यांत आले आहेत. या शास्त्रीबोवांचें कसकसें साहाय्य झालें याचें अखेर योग्य वर्णन करण्यास शंकरराव पंडित राहिले नाहींत, तरी याबद्दलचा प्रस्तावनेंत उल्लेख करणें जरूर आहे, असें लेखकानें म्हटलें आहे. शास्त्रीबोवांनीं अथर्व-वेदसंहितेचें मूळ व भाष्य यांचें शुद्ध स्वरूप ठरविण्याच्या कामीं फार फार महत्त्वाचें सहाय्य केलें होतें.

अथर्ववेदसंहितेचीं वीस कांडें आहेत. त्यांपैकीं पांच पांच कांडें पहिल्या व दुसऱ्या भागांत आलीं आहेत. तिसऱ्या भागांत सहा कांडें आलीं आहेत व उरलेलीं चार कांडें चवथ्या भागांत आलीं आहेत. ही आवृत्ति तयार करण्याकरितां पंडितांनीं गुजराथ, अहमदाबाद, लुनावाडा, जुनागड, भावनगर, माहुली, सांगली इत्यादि ठिकाणांहून व तसेंच एल्फिन्स्टन व डेक्कन या दोन कॉलेजांच्या संग्रहांतून असे सुमारे बारा हस्तलेख आणविले होते व ते ठिकठिकाणच्या अथर्ववेदीय वैदिक ब्राम्हणांच्या साहाय्यानें काळजीपूर्वक तपासून शुद्ध असे संहितापाठ व पदपाठ ठरवून मग त्यांनीं आपली आवृत्ति प्रसिद्ध केली.

सदर्हू कामीं पंडितांचा अनेक वैदिक ब्राह्मणांशीं संबंध आला होता. पण त्यांपैकीं त्यांनीं दोनतीन ब्राह्मणांचा आपल्या प्रस्तावनेंत प्रामुख्यानें उल्लेख केला आहे.

आधीं आमच्या मुंबई इलाख्यांत अथर्ववेदीय वैदिक ब्राह्मण फारच थोडे आहेत. लुनावाडा येथील रहिवासी वैदिक बापूजी जीवनराम हे उत्तम वेदपाठक असून त्यांना सर्व अथर्ववेदसंहिता तोंडपाठ येत होती. फक्त त्यांना त्या वेदाचें अठरावें कांड मात्र येत नव्हतें. त्या कांडांत मनुष्याच्या उत्तरक्रियेसंबंधीं विवरण असल्यामुळें तें अशुभकांड या समजुतीनें कोणी ब्राह्मण म्हणत नसतो; इतकेंच नव्हे तर तें कांड कोणी नुसतें ऐकण्यासही तयार नसतो. शंकरराव पंडि-

तांनीं सदर्हू वैदिक ब्राह्मणास—बापूजी यांस—मुंबई येथील राणीच्या बागेंत नेऊन तेथील एका अशोक वृक्षाच्या छायेखालीं बसवून त्यांच्याबरोबर अठरावें कांड वाचलें!

दुसरे वैदिक विद्वान् ब्राह्मण म्हणजे माहुलीचे केशव भट्ट बिन दाजी भट्ट हे होत. त्यांना देखील अठरावें कांड खेरीज करून सर्व अथर्ववेदसंहिता तोंडपाठ येत होती. सदर्हू वैदिक ब्राह्मणाची औंधच्या त्या वेळच्या पंतप्रतिनिधींनीं पंडितांजवळ शिफारस केली होती. त्या वैदिकांचें वय त्यावेळीं सुमारें पंचावन्न वर्षांचें असून ते एक वर्षभर शंकरराव पंडितांजवळ राहिले होते. अथर्ववेद-संहितेंतील पदपाठ ठरविण्याच्या कामीं त्यांचा पंडितांस बराच उपयोग झाला होता.

तिसरे वैदिक ब्राह्मण म्हणजे सांगलीचे वेंकु दाजी भट्ट हे होत. त्यांचें त्या-वेळीं सुमारें साठ वर्षांचें वय असून ते सांगलीच्या श्रीमंत धुंडिराज ऊर्फ तात्यासाहेब पटवर्धन यांचे आश्रित होते. त्यांना अथर्ववेदाचा केवळ पदपाठच माहीत होता असें नसून त्यांना त्या वेदाचे जटा, घन, क्रम इत्यादि प्रकारही माहीत होते. त्या ब्राम्हणानें अग्निहोत्रही ठेविलें होतें. वेंकु भटजींना अथर्ववेद-संहितेशिवाय कौशिक गृह्यसूत्रेंही येत होतीं, इतकेंच नव्हे तर त्यांत सांगितलेल्या मंत्रसामर्थ्याचे (charms) प्रयोगही ते करून दाखवीत असत! यामुळें सांग-लीस त्यांची फार प्रसिद्धि झाली असल्यानें त्यांच्याकडे तशा विषयाची गोडी असणारे (सांगलीचे) लोक नेहमीं धांव घेत असत. वेंकु भट्ट व माहुलीचे केशव भट्ट हे दोघेही हा ग्रंथ प्रसिद्ध होण्याच्या पूर्वींच वारले हें वाईट झालें असें पंडितांनीं प्रस्तावनेंत म्हटलें आहे. हा ग्रंथ सभाष्य प्रसिद्ध झालेला पाहण्याविषयीं ते फार उत्सुक झालेले होते. वेंकु भटजीचे अखेर डोळे गेले होते.

गुजराथेंतील अथर्ववेदीय वैदिक ब्राम्हणांमध्यें जसभाई जनमेजय व हिरालाल परीक्षित हे दोन फार उत्तम व निष्णात होते असें पंडितांनीं आपलें मत नमूद करून ठेवलें आहे.

महाराष्ट्रांत ऋग्वेदी लोकांचाच विशेष भरणा असल्यामुळें त्या वेदांतील एकाद्या सूक्ताची किंवा एकाद्या ऋचेची महाराष्ट्रीय मनुष्याला ऐकून तरी माहिती असण्याचा संभव आहे. अथर्ववेदासंबंधीं तसा प्रकार नाहीं. या शाखेंतील ब्राह्मणांची महाराष्ट्रांत आधीं वस्ती अगदीं कमी. त्यांतूनही अथर्ववेदसंहितेचा अभ्यास करणारे लोक त्याहीपेक्षां कमी. यामुळें त्या वेदासंबंधाची वाचकांस साधारण कल्पना व्हावी म्हणून अथर्ववेदसंहितेंतील मासल्याकरितां कांहीं थोडे मंत्र घेऊन त्यांचे भाष्याच्या आधारावर मराठी अर्थ देतों. व दुसऱ्या कांहीं भागांमध्यें काय विषय आले आहेत तें निर्दिष्ट करतों. अथर्ववेदांत ऋग्वेदांतलेच पुष्कळ मंत्र आले आहेत हें मागें सांगितलेंच आहे. त्याचप्रमाणें अथर्ववेदाचीं वीस कांडें आहेत हेंही मागें आलें आहे.

अथर्ववेदावरील भाष्यास आरंभ करतांना प्रत्येक कांडाच्या सुरवातीला सायणाचार्यांनीं पुढीलप्रमाणें नमन केलें आहेः—

वागीशाद्याः सुमनसः सर्वार्थानाम् उपक्रमे ॥
यं नत्वा कृतकृत्याः स्युस्तं नमामि गजाननम् ॥ १ ॥
यस्य निश्वसितं वेदा यो वेदेभ्योऽखिलं जगत्
निर्ममे तमहं वंदे विद्यातीर्थमहेश्वरम् ॥ २ ॥

अथर्ववेदाच्या पहिल्या कांडांत सहा अनुवाक् आहेत व प्रत्येक अनुवाकांत पुढीलप्रमाणें सूक्तसंख्या आहे.

प्रथम अनुवाकांत सहा सूक्तें आहेत;

| | | | | |
|---|---|---|---|---|
| द्वितीय | ,, | पांच | ,, | ,, |
| तृतीय | ,, | पांच | ,, | ,, |
| चतुर्थ | ,, | पांच | ,, | ,, |
| पंचम | ,, | सात | ,, | ,, |
| षष्ठ | ,, | सात | ,, | ,, |

याप्रमाणें चार कांडांवर सायणाचार्यांचें भाष्य आहे. पांचव्या कांडावर भाष्य आढळत नाहीं.

प्रथम कांडांतील पहिल्या अनुवाकाच्या चवथ्या व पांचव्या सूक्तांत सोम यागांत साहाय्य करण्याकरितां जलदेवतेची भक्तिपुरःसर अंतःकरणपूर्वक प्रार्थना करण्यांत आली आहे. चवथ्या सूक्तांतील पहिला मंत्र असा आहेः—

अम्बयो' यन्त्यध्वभिर्जामयो' अध्वरीयताम् ॥
पृञ्चतीर्मधुना पयः ॥ १ ॥

अन्वयः—अम्बयः=आपः; यन्ति=आगच्छन्ति; अध्वभिः=प्रसिद्धैः मार्गैः; जामयः=भगिन्यः; अध्वरीयताम्=सोमयागं आत्मनः इच्छताम् यजमानानाम्; पृञ्चतीः=संयोजयन्त्यः; मधुना=स्वकीयेन माधुर्यरसेन; पयः=सोमरसादिकं होमद्रव्यं पयोविकारभूतं आज्यं वा ॥ "अंबयः" व "आपः" हीं जलशब्दवाचक अनेकवचनें आहेत.

**मराठी भावार्थः**—सोमयाग करण्याची इच्छा करणाऱ्या यजमानाला बहिणीप्रमाणें असणारी जलदेवता आपल्या मधुररसाची ( दुधाची अगर तुपाची ) योजना करून यज्ञमंडपांत येते.

सदर्हू पांचव्या सूक्तांत फक्त चार मंत्र आहेत. ते नित्य संध्या करतांना व ब्रह्मयज्ञ करतांना ब्राह्मणांना उच्चारावे लागतात. ते मंत्र आतां देतोंः—

आपो हिष्ठा मयोभुवस्तान ऊर्जे दधातन ॥
महेरणाय चक्षसे ॥ १ ॥

ष्ठा=स्थ; मयोभुवः=सुखस्य भावयित्र्यः; ऊर्जे=बलकराय अन्नाय; दधातन=धत्त; महेरणाय चक्षसे=चिरकालजीवनाभिमतफलसाक्षात्काराय.

यो वः शिवतमो रसस्तस्य भाजयतेह नः
उशतीरिव मातरः ॥ २ ॥

वः=युष्माकम् ; शिवतमः=कल्याणतमः; यो रसः=सारभूतः अंशः; इह=अस्मिन् लोके; भाजयत=सेवयत; उशतीः=कामयमानाः ; मातरः इव.

तस्मा अरं' गमाम वो यस्य क्षयाय जिन्वथ ॥
आपो' जनयथा च नः ॥ ३ ॥

तस्मैः=अन्नप्राप्तये; अरम्=अलम्; गमाम=प्राप्नुयाम्; यस्य=अन्नस्य; क्षयाय=निवासाय; जिन्वथ=तर्पयथ; आपः (यूयं) नः (अस्मान्) जनयथ=पुत्रपौत्रादिरूपेण उत्पादयथ ॥

ईशाना वार्याणां क्षयंतीश्चर्षणीनाम् ॥
अपो याचामि भेषजम् ॥ ४ ॥

वार्याणाम्=धनानाम्; ईशानाः=ईश्वराः; चर्षणीनाम्=मनुष्याणाम्; क्षयंतीः=निवासयित्रीः; एवंभूताः आपः भेषजम्; याचामि=प्रार्थये.

वरील मंत्रांचा **मराठी भावार्थ** पुढीलप्रमाणें आहेः—

हे जलदेवते, तूं सुखदायकच आहेस. तरी तूं आम्हांला पौष्टिक अन्न देण्याकरितां तशीच राहा. हेतु इतकाच कीं, आम्हांस अखेरपर्यंत चिरसुख–ब्रह्मानंद–प्राप्त व्हावें.

हे देवते, तुझा जो अत्यंत हितकर रस असेल तो आम्हांस इकडे दे. कशा प्रकारें? तर पुत्रवत्सल आई आपल्या बालकाला पाजून जशी त्याचें पोषण करते त्याप्रमाणें.

हे देवी, जें अन्न तूं उत्पन्न करतेस तें तर आम्हांस पुरेसें मिळेलच. पण तें आम्हांस संततिदायकही होईल असें कर.

हे देवी, तूं धनाची मालकीण असल्यामुळें मनुष्यांना पोषक तर होशीलच. पण मी तुजजवळ औषधीचीही याचना करतों.

याप्रमाणें प्रथम अनुवाकांतील सबंध पांचवें सूक्त केवळ जलदेवतेच्या प्रार्थनेनें भरलें आहे. असो.

भाष्यकार प्रत्येक कांडाच्या शेवटीं पुढीलप्रमाणें—

वेदार्थस्य प्रकाशेन तमो हार्दं निवारयन् ॥
पुमर्थांश्चतुरो देयाद् विद्यातीर्थमहेश्वरः ॥

आचार्यांची प्रार्थना करून समाप्तिदर्शक असे उद्गार काढतातः—इति श्री–मद्राजाधिराज परमेश्वर वीर हरिहर महाराज धुरंधरेण सायणाचार्येण विरचिते अथर्वसंहिताभाष्ये प्रथमकांडः समाप्तः। "कांड" शब्द पुल्लिंगी व नपुंसकलिंगी असा दोन्ही लिंगी वापरण्यांत आलेला आढळतो.

आतां अठराव्या कांडांतील एका मंत्राचा अर्थ इकडे देतों. तो चवथ्या अनुवाकांतील नवव्या सूक्ताचा ८९ वा मंत्र आहे. तो हाः—

चंद्रमा अप्स्वं, न्तरा सुपर्णो धावते दिवि ॥
नवो हिरण्यनेमयः पदं विन्दन्ति विद्युतो वित्तं मे
अस्य रोदसी ॥ ९ ॥

**मराठी भावार्थः**–( विहिरींत पडलेला मनुष्य तेथूनच द्यावापृथ्वीरूपी देवतांची प्रार्थना करीत असतांना म्हणतो ) चंद्रमा हा आकाशांत अंतरिक्षांतून शीघ्र गतीनें चालतो. पण त्याच्या सोन्यासारख्या किरणांचा, ( या ) विहिरीचें तोंड झांकलेलें असल्यामुळें, मला लाभ होत नाहीं. सबब हे ( द्यावापृथ्वी अधिष्ठित ) देवतांनो, ही माझी प्रार्थना ऐका आणि मला या विहिरींतून बाहेर काढा.

या मंत्रांत सांगितलेल्या गोष्टीला थोडासा पूर्वेतिहास आहे. तो फार मनोरंजक आहे. त्यावरून प्राचीन काळीं देखील आतांच्या सारखेच कसे दुष्ट लोक होते व ते संधि साधून आपले व्यवहार कसे चालवीत असत हें स्पष्टपणें दिसून येतें. तो इतिहास शाट्यायन शाखीय लोकांच्या आधारानें सायणाचार्यांनीं आपल्या भाष्यांत दिला आहे. तो मुळांत असा आहेः—

एकतो द्वितस्त्रित इति पुरा त्रय ऋषयो बभूवुः। एते कदाचित् मरुभूमौ अरण्ये वर्तमानाः पिपासया संतप्तगात्राः संतः एकं कूपम् अविंदन्। तत्र त्रिताख्य एको जलपानाय कूपं प्राविशत्। प्रविश्यच स्वयं अपः पीत्वा इतरयोश्च कूपाद् उदकम् उद्धृत्य प्रादात्। तावुभौ तद् उदकम् पीत्वा तं त्रितम् कूपे पातयित्वा तदीयं धनं सर्व अपहृत्य कूपं च रथचक्रेण पिधाय प्रास्थिषाताम्। ततः कूपे पतितः स त्रितः कूपात् उत्तरीतुम् अशक्नुवन् सर्वे देवा माम् उद्धरन्तु इति मनसा सस्मार। अथ स त्रितः रात्रौ कूपस्य अन्तः चंद्रमसो रश्मीन् अपश्यन् अनया ऋचा परिदेवयत इति।

**मराठी भावार्थः**—पूर्वी एकत, द्वित व त्रित या नांवाचे तीन ऋषि होते. ते तिघेही एकदां एका निर्जन अरण्यांत फिरत असतांना तहानेनें अत्यंत

व्याकुळ झाल्यामुळें ते एका विहिरीजवळ येऊन पोहोंचले. त्यांपैकीं एक त्रित हा पाणी पिण्याकरितां त्या विहिरींत उतरला, व स्वतः पाणी पिऊन त्यानें आपल्या दोघां सोबत्यांना विहिरींतलें पाणी वर आणून पिण्यास दिलें. ते दोघे तें पाणी प्याले व त्या त्रिताला विहिरींत ढकलून देऊन त्यांनीं रथाच्या चाकानें विहिरीचें तोंड बंद केलें व त्रिताबरोबर असलेलें सर्व धन घेऊन ते चालते झाले! याप्रमाणें तो त्रित विहिरींत कोंडला गेल्यामुळें त्याला बाहेर येतां येईना. सबब त्यानें निरनिराळ्या देवतांनीं येऊन आपणांस बाहेर काढावें म्हणून त्यांचें स्मरण केलें! विहिरींत पडलेला असल्यामुळें रात्रीं बाहेर चांदणें पडलें असतांही आपणांस चंद्रप्रकाश मिळत नाहीं. एवढ्याच-करितां त्रितानें वरील मंत्रांच्याद्वारें देवाची प्रार्थना केली आहे.

जगांत सर्व देशांत व सर्व कालीं कांहीं लोक दुष्ट असतात व ते संधि मिळाली म्हणजे तिचा फायदा घेऊन आपला स्वार्थ साधीत असतात, हें तर वरील ऋचेवरून सिद्ध होतेंच, परंतु संकट प्राप्त झालें असतां मनुष्यानें परमे-श्वराची प्रार्थना करावी म्हणजे तो दयार्द्र अंतःकरणानें येऊन संकटनिवारण करतो ही भावना–हें भक्तीचें बीज–हिंदुस्थान देशांत किती प्राचीन काळा-पासून रुजलेलें आहे हेंही सहज सिद्ध होतें! प्राचीन काळीं शुनःशेप या ब्राह्मणानें संकटसमयीं सर्व देवतांचा धांवा केल्यामुळें त्याच्या संकटाचें निवारण झालें अशी कथा ऐतरेय ब्राह्मणांमध्यें आली आहे. अथर्ववेदसंहिता व ऐतरेय ब्राह्मण हे ग्रंथ फार प्राचीन आहेत, ह्याबद्दल वाद नाहीं. पण भक्तीची कल्पना ख्रिस्तीधर्मापासून हिंदुस्थानांत आली व बायबलवरून भगवद्गीता लिहिली गेली असले निराधार प्रलाप जे कांहीं ख्रिस्ती मिशनरी लोक किंवा इतर त्यांचेच अनुयायी अद्याप करतांना आढळतात, त्यांच्या अज्ञानाचें किंवा दुराग्रहाचें काय वर्णन करावें! अशा पूर्वग्रहदूषित मताच्या लेखकांनीं या विषयावरील डॉ. भांडारकरांचे व न्या. तेलंगांचे लेख लक्षपूर्वक वाचल्यास त्यांचे भ्रम व अज्ञान हीं दूर होतील!

आणखी एक दोन कांडांतील विषयांसंबंधानें चार शब्द लिहूं व मग हें प्रकरण पुरें करूं.

चवथ्या भागांतील सतराव्या कांडांत फक्त एकच अनुवाक आहे. त्यांत तीन सूक्तें आहेत. या संबंध अनुवाकाचा मुलांच्या मुंजीच्या वेळीं उच्चार करावयाचा असतो. स्वतः सायणाचार्य आपल्या भाष्यांत म्हणतातः–

**उपनयन कर्मणि आचार्यः ब्रह्मचारिणो नाभिप्रदेशं संस्पृश्य अमुं अनुवाकं जपेत्।**

इतकेंच नव्हे तर मुंज झालेल्या मुलानें आयुष्याची वृद्धि होण्याकरितां या अनुवाकानें नित्य त्रिकाल आदित्याची उपासना केली पाहिजे. भाष्यकाराचे असे शब्द आहेतः–

**उपनयन एव आयुरभिवृद्ध्यर्थम् अनेन अनुवाकेन माणवकः त्रिकालम् आदित्यं उपतिष्ठेत ।**

अठरावें कांड मनुष्याच्या उत्तरक्रियेसंबंधाचें आहे हें मागें एकवार सांगितलेंच आहे.

एकोणिसाव्या कांडाच्या पहिल्या अनुवाकांतील सहाव्या सूक्तांत यज्ञानुष्ठाता नारायणाख्यपुरुष यांचें वर्णन आहे. त्यांतील पहिली ऋचा ऋग्वेदांतील पुरुषसूक्ताच्या पहिल्या ऋचेचीच पुनरुक्ति आहे. ती अशीः–

**सहस्रबाहुः पुरुषः सहस्राक्षः सहस्रपात् ॥**

**सभूमिं विश्वतो वृत्वाऽत्यतिष्ठद् दशांगुलम् ॥ १ ॥**

याच्याशींच समानार्थक ऋग्वेदांत व उपनिषदांत पुढील मंत्र आहे—

**विश्वतश्चक्षुरुत विश्वतोमुखो विश्वतोबाहुरुत विश्वतः पात् ॥**

त्याचप्रमाणें समानार्थक असें भगवद्गीतेंतही वचन आहेः—

**विष्टभ्याहमिदं कृत्स्नं एकांशेन स्थितो जगत् ॥**

विसाव्या कांडांत शस्त्रांविषयीं विवेचन आहे. सायणाचार्य म्हणतातः—

**शांतिकं पौष्टिकं कर्मक्रमशः प्राक् प्रपंचितम् ॥**

**विंशेथ ब्रह्मवर्गाणाम् शस्त्रयाज्यादिवर्ण्यते ॥**

"इति शस्त्रकांडाभिधानं नाम विंशतितमम् कांडं समाप्तम् ॥" असे शेवटीं समाप्तिदर्शक शब्द आहेत.

असो. अथर्ववेदाविषयीं सामान्य वाचकांना फारशी कल्पना नसावी अशा समजुतीनें या प्रकरणांत थोडासा विस्तार केला आहे.

## प्रकरण अकरावें

# प्राकृत ग्रंथसंशोधन

शंकरराव पंडित यांनीं प्राकृत भाषेंतील कांहीं ग्रंथ शुद्ध करून व स्पष्टीकरणाच्या टिपा देऊन प्रसिद्ध केले आहेत. त्यांपैकीं "कुमारपाल चरित्र" हा एक ग्रंथ होय. त्यावर एक टीका उपलब्ध होती. त्यामुळें शंकररावांनीं तो ग्रंथ त्या टीकेसह प्रसिद्ध केला आहे. त्या ग्रंथाच्या मुखपृष्ठावर पुस्तकाचें नांव असें आहेः–प्राकृत द्व्याश्रयकाव्यम् आचार्य हेमचंद्रविरचितम् । पूर्णकलेशगणिविरचितया टीकयासहितम् ॥ Edited by S. P. Pandit–Published in 1900. म्हणजे हा ग्रंथ जरी पंडितांनींच तयार केला होता तरी तो त्यांच्या हयातींत प्रसिद्ध होऊं शकला नाहीं. ते परलोकवासी झाल्यावर सहा वर्षांनीं तो प्रसिद्ध करण्यांत आला.

ही आवृत्ति तयार करण्याकरितां पंडितांनीं चार हस्तलेख मिळविले होते व त्या कामीं त्यांना पंडित शिवरामशास्त्री ताटके यांचें साहाय्य झालेलें होतें. स्वतः कुमारपाल राजा व प्रस्तुत काव्याचा कर्ता हेमचंद्र हे दोघे जैन धर्माचे पुरस्कर्ते होते.

या चरित्राचे आठ सर्ग आहेत. त्यांपैकीं पहिल्या पांच सर्गांत व सहाव्या सर्गाच्या कांहीं भागांत अनहिलपूर–पट्टण–शहराचें वर्णन, तेथील राजाची संपत्ति, जिनाच्या देवळाचें वैभव वगैरे विषय आले आहेत. सहाव्या सर्गाच्या उत्तरभागांत कुमारपाल व कोंकणचा राजा मल्लिकार्जुन यांजमधील लढाईचें वर्णन आलेलें असून त्यांत मग त्या मल्लिकार्जुन राजाचा कसा पराभव झाला व तो कसा मारला गेला हें सांगितलें आहे. सातव्या सर्गांत व आठव्या सर्गांत कांहीं नीतिविषयक व धर्मविषयक विचार ग्रथित केले गेले आहेत. सातव्या सर्गांतील विचार हे कुमारपाल राजाच्या मुखांतून प्रकट झाले आहेत, व आठव्या सर्गांत त्या राजानें विनंति केल्यावरून सरस्वती देवीनें ते विचार उपदेशरूपानें त्याला सांगितले आहेत.

अनहिलपूरचा राजा भीमदेव याची एक चौला देवी नांवाची राणी होती.

ती जातीची क्षत्रिय नसून वेश्या होती. पण तिच्या दृढनिश्चयी स्वभावावरून व विश्वासूपणावरून राजानें तिचा स्वीकार केला होता. त्यांचा मुलगा हरिपाल. हरिपालचा मुलगा त्रिभुवनपाल. व त्याचा मुलगा कुमारपाल. हा कुमारपाल राजा सिद्धराज याच्या पाठीमागून गादीवर बसला.

कुमारपालचा हेमचंद्र हा गुरु होता. कोणत्याही प्रकारची हिंसा करूं नको हाच त्याचा मुख्य उपदेश होता. ( " Save all life from destruction " is the best religious instruction that a man can confer upon man ). " प्राणिहिंसा करूं नको. " यापेक्षां उत्तम धर्मशिक्षण कोणीही मनुष्य दुसऱ्यास देऊं शकणार नाहीं असें गुरु हेमचंद्र यांचें मत होतें.

कुमारपाल राजानें तीस वर्षें राज्य केलें. पण त्याला एका सतीच्या शापामुळें महारोग झाला होता. त्याच वेळीं हेमचंद्राच्या वयाला चवऱ्यायशीं वर्षें झाल्यामुळें त्याचा अंतकाल जवळ आला होता. त्यानें शेवटची पूजा केली व केवळ अनशन राहून तो यमाच्या बोलावण्याची वाट पहात बसला. हा सर्व प्रकार पाहून कुमारपाल राजाला वाईट वाटलें. तेव्हां हेमचंद्रानें राजास म्हटलें, "आतां तुझें सहा महिन्याचें आयुष्य उरलें आहे. तुला मुलगा नाहीं. सबब तुला जीं कांहीं धर्मकृत्यें करावयाचीं असतील, तीं तूं करून टाक. " त्यानंतर हेमचंद्राचा लागलाच अंत झाला. पुढें सहाच महिन्यांनीं राजा कुमारपाल हाही परलोकवासी झाला.

हें पुस्तक सन १९०० मध्यें प्रसिद्ध करण्यांत आलें तेव्हां शंकरराव पंडित हे हयात नव्हते हें वर सांगितलेंच आहे. अर्थात् पुस्तकास जोडलेली चार पानी प्रस्तावना ही दुसऱ्या कोणीतरी लिहिली असावी. लेखकाचें त्यावर नांव नाहीं. परंतु पुस्तकास जो सुमारें अठरा पृष्ठांचा उपोद्घात जोडण्यांत आला आहे तो मात्र पंडितांनीं लिहिलेला दिसतो. त्यांत प्रस्तुत काव्याचा सारांश व हेमचंद्र याची हकीकत हे विषय आले आहेत. हेमचंद्र याचें अगदीं त्रोटक चरित्र, डॉ. भाऊ दाजी यांच्या एका लेखाच्या आधारानें लिहिलेलें, आमच्या डॉ. भाऊ दाजी लाड यांच्या चरित्राच्या नवव्या प्रकरणांत ( पृ. ५५ ते ५७ ) आलें आहे तें जरूर तर वाचकांनीं अवश्य वाचावें.

शंकरराव पंडितांनीं दुसरें एक प्राकृत काव्य प्रसिद्ध केलें होतें. तें "गउडवहो" (गौडवध) हें होय. याची पहिली आवृत्ति सन १८८६ सालीं प्रसिद्ध झाली. दुसरी रा. उटगीकर यांनीं, पुण्याच्या भांडारकर-इन्स्टिट्यूटच्या आश्रयाखालीं, सन १९२७ मध्यें प्रसिद्ध केली.

हें प्राकृत काव्य शुद्ध करून प्रसिद्ध करण्याकरितां पंडितांनीं त्याचे चार हस्तलेख मिळविले होते. व त्यांच्या तपासणीचें काम, पंडितांच्या सरकारी व इतर प्रकारच्या कार्यबाहुल्यामुळें, दहा वर्षें चाललेलें होतें. या काव्याच्या प्रसिद्धीकरणाच्या कामीं डॉ. बुल्हर व चॅटफील्ड साहेब यांचें बरेंच साहाय्य झाल्याचें पंडितांनीं पुस्तकास जोडलेल्या आपल्या प्रस्तावनेंत आभारपूर्वक कबूल केलें आहे. तसेंच शुद्ध आवृत्ति तयार करतांना आपणांस पंडित शिवरामशास्त्री ताटके यांचें साहाय्य झाल्याचेंही शंकररावांनीं नमूद केलें आहे.

हें प्राकृत काव्य "वाक्पति" या नांवाच्या कवीनें केलें आहे. तो कवि कनोजचा राजा यशोवर्मा याचा आश्रित होता व त्यानें या काव्यांत आपल्या आश्रयदात्यांच्या वैभवाचें वर्णन केलें आहे. उत्तर बंगाल प्रांतास "गौड" म्हणतात. त्या भागांतील राजाचा यशोवर्मा यानें वध केल्याचें या कवितेंत वर्णन आहे. प्राकृत भाषेंत "रावणवहो" या नांवाचें एक काव्य आहे. त्यावरून "गौडवहो" हें नांव कवीस सुचलें असावें असें पंडित म्हणतात.

हें काव्य आर्यावृत्तांत लिहिलेलें असून त्याचे सर्ग, अध्याय अगर उच्छ्वास असे भाग मुळींच पाडलेले नाहींत. त्यामुळें हें काव्य म्हणजे कनोजचा राजा यशोवर्मा याच्या वैभवपूर्ण कारकीर्दीचें पद्यात्मक एकसूत्री लांबलचक ऐतिहासिक वर्णन आहे. एकंदर आर्या १२०९ आहेत.

राजा यशोवर्मा हा एकदां आपलें सैन्य घेऊन विजयसंचारार्थ निघाला तो शोण नदीच्या खोऱ्यांत आला. मग तो तिकडून विंध्याद्रिपर्वतावर गेला. प्रस्तुत काव्यांत तिकडील राजाच्या पराक्रमाचें बरेंच वर्णन आहे. पुढें मग हें प्रचंड सैन्य येत असलेलें पाहून गौड देशाचा राजा भिऊन पळून गेला! परंतु त्याचे सरदार वगैरे राजा यशोवर्मा याजबरोबर लढण्याकरितां आले. पण

राजानें त्यांचा पराभव केला व अखेर गौड देशाच्या राजाला मारलें! मग राजा यशोवर्मा हा वंग देशावर चालून गेला व तिकडील राजाचाही त्यानें पराभव केला. पुढें तिकडून राजा यशोवर्मा हा समुद्रकिनाऱ्यावरील प्रांतांत गेला व मग त्यानें पारसीक देशावर हल्ला करून तिकडील शत्रूंचाही पराभव केला. त्यानंतर त्या राजानें घाटमाथा, मारवाड, स्थानेश्वर, अयोध्या इत्यादि प्रांत जिंकले व मग तो कनोजला परत आला.

सदरहू यशोवर्मा राजाच्या आज्ञेवरूनच कवीनें हें काव्य रचलें. हा राजा सन ६९५ ते ७३२ च्या सुमारास झाला असला पाहिजे. सातव्या शतकांत प्रसिद्ध चिनी प्रवासी ह्युयेनसँग हा हिंदुस्थानांत आला होता, त्यानें आपल्या हकीकतींत कनोजचें वर्णन केलें आहे.

शंकरराव पंडितांनीं कोंकणी भाषेचें व्याकरण तयार केलें होतें असें आम्ही ऐकलें, पण तें आम्हांस पाहण्यास मिळालें नाहीं.

---

## प्रकरण १२ वें

# इतर कांहीं लेख

रावबहादूर पंडितांनीं कांहीं किरकोळ लेख लिहिलेले आम्हांस आढळले. त्यांविषयीं आतां थोडेंसें लिहितों.

पंडितांनीं सन १८७२ मध्यें—ते डेक्कन कॉलेजांत संस्कृतचे प्रोफेसर होते त्या मुदतींत—एक ताम्रपत्रलेखासंबंधीं लिहिलेला लेख "Indian Antiquary" (इंडियन अँटिक्वेरी व्हॉ. १) पृ. ८० कडे प्रसिद्ध झाला आहे. त्यांत पंडितांनीं ते कलादगी जिल्ह्यांत डेप्युटी कलेक्टराच्या जागीं असतांना त्यांना एका इसमाजवळ मिळालेल्या ताम्रपत्रलेखाचें भाषांतर केलें आहे. त्या ताम्रपत्रलेखाचा थोडासा पूर्वेतिहास असा आहे. पंडित म्हणतात कीं, तो ताम्रपत्र लेख सुमारें बारावर्षांपूर्वीं (१८६० च्या सुमारास) विजापूरपासून सुमारें बारा मैलांवर असलेल्या "तिडगुंडी" नांवाच्या खेडेगांवांत एका मांगाला, तो आपलें शेत नांगरीत

असतांना, मिळाला होता. तो लेख मग तो मांग ज्याला त्याला दाखवीत असे. त्याची कल्पना अशी होती कीं, तो जमिनींत एकाद्या गुप्त ठिकाणीं पुरून ठेवलेल्या सोन्याच्या नाण्यांच्या हांड्यासंबंधाचा असेल! पण तो लेख वाचून त्याविषयींचा उलगडा करणारा त्या मांगाला कोणीच मिळाला नाहीं. म्हणून त्यानें मग तो लेख कोल्हापूर, निपाणी वगैरे गांवांपर्यंत जाऊन पुष्कळ लोकांस दाखविला. पण त्याच्या कल्पनेप्रमाणें त्याला मुळींच यश आलें नाहीं. अखेर त्या मांगानें तो ताम्रपत्रलेख बागेवाडी तालुक्यांतील " मनगोळी " नांवाच्या गांवांतील एका मारवाड्याजवळ गहाण ठेवला. ह्या ताम्रपत्रलेखाची हकीकत जेव्हां पुढें रा. ब. पंडितांना समजली, तेव्हां तो लेख एकाकडून दुसऱ्याकडे याप्रमाणें जात जात पुष्कळांच्या हातांतून गेला होता असें समजलें. तो लेख आपल्या ताब्यांत घ्यावा असें पंडितांस वाटलें, पण त्यांना त्या कामीं फार त्रास पडले. जितक्या लोकांच्या हातून तो लेख गेला होता तितक्यांची चौकशी करून व ज्याचें जें काय देणें असेल तें देऊन तो ताम्रपत्रलेख शेवटीं पंडितांना आपल्या ताब्यांत घ्यावा लागला!

तो ताम्रपत्र लेख म्हणजे " वायवड " ( Vayvada ) नांवानें तिकडे प्रसिद्ध असलेल्या ग्रामसमूहाचें विक्रीतखत होतें. त्या ग्रामसमूहांतून फक्त " टक्कलिका " ( Takkalika ) हें गांव मात्र वगळलेलें होतें. तें विक्रीतखत अकराव्या शतकांतील ( १०८३ ) चालुक्य वंशीय मुंज राजानें " कण्ण सामंत " यास करून दिलें होतें. त्याचें पंडितांनीं संपूर्ण भाषांतर केलें आहे.

पंडित हे पुढें सन १८७५ मध्यें सुरत जिल्ह्यांत डेप्युटी कलेक्टरच्याही जागेवर होते. त्यावेळीं त्यांनीं लिहिलेला एक लेखही "इंडियन अँटिक्वेरी" व्हॉ. ४ मध्यें प्रसिद्ध झाला आहे. डॉ. बुल्हर यांनीं, ते हिंदुस्थानांत असतांना, जेसल्मीर येथील संस्कृत हस्तलेखांचें एक मोठें भांडार तपासलें होतें. त्याविषयीं बुल्हर साहेबांनीं एक पत्र लिहून तें " बर्लिन ॲकॅडेमी " च्या मासिक पुस्तकांत प्रसिद्ध केलें होतें. त्या पत्राचें हें पंडितांनीं इंग्रजींत केलेलें भाषांतर आहे.

भांडारामध्यें फार महत्त्वाचे लेख होते. छंदःशास्त्र, रघुवंश, नैषध, विक्रमांकचरित, गौडवधसार, चक्रपाणी काव्य; प्रबोधचंद्रोदय, मुद्राराक्षस,

वेणीसंहार व अनर्घ्यराघव हीं नाटकें; दंडीचा काव्यादर्श, मम्मटाचा काव्य-प्रकाश; जैन सूत्रें; नाट्यशास्त्र; शतपथ ब्राह्मणावरील भाष्य वगैरे महत्त्वाचे हस्तलेख त्या भांडारांत होते.

सन १८७७ सालीं पंडित हे कलादगी जिल्ह्यांत डेप्युटी कलेक्टर होते. त्या सालीं त्यांनीं लिहिलेलें ( मुद्देबिहाळ, ता. २३–३–७७ ) एक पत्र त्या सालच्या " इंडियन अँटिक्वेरी " व्हॉ. ६ मध्यें प्रसिद्ध झालें आहे. ह्यांत फक्त एकच मुद्दा आहे. मिस्टर नीलकंठ जनार्दन कीर्तने यांनीं त्याच्यापूर्वी लिहिलेल्या आपल्या एका लेखांत " वाक्पतिराज " यासंबंधानें उल्लेख केला होता. त्याविषयीं बरेंच विवेचन करून पंडित शेवटीं आपल्या पत्रांत म्हणतात कीं, भवभूति व वाक्पति-राज हे दोघेही समकालीन होते, इतकेंच नव्हे तर, ते राजा यशोवर्मा याचे आश्रित होते.

शंकरराव पंडित हे सन १८८२ मध्यें "ओरिएंटल ट्रान्स्लेटर टु धि गव्ह-र्मेंट ऑफ् बाँबे " या हुद्यावर होते. त्या सालीं त्यांनीं " The Drain of Indian Manuscript Treasures " ( हिंदुस्थानांतील जुन्या हस्तलेखांचा पश्चिम दिशेस चालत असलेला पाट ) या विषयावर एक विस्तृत लेख लिहून पुणें येथील सार्वजनिक सभेच्या मासिकाच्या ( १८८२ जुलै ) अंकांत प्रसिद्ध केला आहे. त्या लेखावर लेखकाचें नांव नाहीं. त्या त्रैमासिकांतील लेखांच्या लेखकांचीं नांवें सामान्यतः प्रसिद्ध होत नसत. फक्त मुखपृष्ठावर सभेच्या सेक्रेटरींचीं नांवें मात्र प्रसिद्ध होत असत. सदरील त्रैमासिक त्यावेळीं रा. ब. महादेव गोविंद रानडे यांच्या धोरणानें व त्यांच्याच प्रत्यक्ष हुकमती-खालीं चालत असे हें प्रसिद्धच आहे. पण सदरहू लेख, त्यांतील अंतः-प्रमाणांवरून पाहतां शंकरराव पंडितांच्या लेखणींतूनच उतरला होता हें उघड दिसतें. त्या लेखांत पंडितांनीं त्यावेळच्या कांहीं युरोपियन लोकांविरुद्ध मोठ्या जोराची व निर्भीडपणें तक्रार केली आहे. सन १८७८ सालापूर्वी मुंबई सरकारातर्फे देशांतील प्राचीन हस्तलेख मिळविण्याचें काम डॉ. बुल्हर व डॉ. कीलहॉर्न हे दोघे करीत असत. पुढें डॉ. बुल्हर हे स्वदेशीं निघून गेल्यावर तें काम डॉ. कीलहॉर्न व डॉ. भांडारकर यांजकडे सोंपविण्यांत आलें. नंतर डॉ. कीलहॉर्न यांनीं पेन्शन घेतल्यावर त्यांची जागा डॉ. पीटरसन यांनीं घेतली.

सदरहू युरोपीअन–विशेषतः जर्मन–प्रोफेसरांच्या काम करण्याच्या पद्धतीसंबंधानें सुमारें साठ वर्षांपूर्वी बराच बोभाटा झाला होता व त्यासंबंधांत त्या प्रोफेसर लोकांवर (डॉ. हॉउग, डॉ. बुल्हर, डॉ. कीलहॉर्न वगैरे लोकांवर) उघड रीतीनें कांही आरोपही करण्यांत आले होते. याविषयीं पंडितांनीं सदरहू आपल्या लेखांत असें स्पष्ट म्हटलें होतें कीं, तत्कालीन युरोपीअन प्रोफेसरांना सरकारनें आपल्या (प्राचीन हस्तलेख गोळा करणें या) कामाकरितां नेमलेले असतांना ते असंख्य हस्तलेख–सरकारच्या नांवाखालीं–स्वतःकरितां स्वस्त्यांत विकत घेऊन स्वदेशीं नेत असत! इतकेंच नव्हे, तर हा प्रकार त्याच्याही पूर्वी जवळ जवळ वीस वर्षें निर्वेधपणें सारखा चालू होता, असें सदरील लेखकानें स्पष्ट म्हटलें आहे. उदाहरणार्थ, डॉ. हॉउग (Dr. Haug) हे सन १८६४ सालीं इकडून पेन्शन घेऊन स्वदेशीं जातांना त्यांनीं पुष्कळच जुने हस्तलेख बरोबर नेले होते. पुढें ते कांहीं दिवसांनीं परलोकवासी झाले. पण त्यांच्या मरणोत्तर त्यांच्या विधवेपासून म्युनिच येथील लायब्ररीनें बरीच मोठी रक्कम देऊन तो हस्तलेखांचा मोठा संग्रह विकत घेतला! पंडितांनीं प्रस्तुत लेख लिहिला त्या वेळीं सदरहु प्रकारासंबंधीं वर्तमानपत्रांतून बरीच चर्चा चालली होती. त्यासंबंधीं डेक्कन कॉलेजचे त्यावेळचे मुख्य प्रिन्सिपॉल सेल्बी साहेब (F. G. S.) यांनीं टाइम्स ऑफ इंडियामध्यें एक पत्र प्रसिद्ध करून सदरहू युरोपीअन—जर्मन—प्रोफेसर लोकांची कमीपणाची बाजू जरा सांवरण्याचा यत्न केला होता. पण त्यांत त्यांना यश आलें नाहीं. पंडितांनीं आपल्या लेखांत खुद्द सेल्बी साहेबांच्याही कोटिक्रमांतील दोषाविष्करण चांगलें केलें होतें; व आपलें म्हणणें सप्रमाण सिद्ध केलें होतें. व खुद्द सरकारानें देखील या सर्व प्रकाराकडे जरूर लक्ष पुरवावें असें त्यांनीं सुचविलें होतें. सरकाराकरितां हस्त-लेख मिळविण्याचें काम करणाऱ्या कामगारांनीं स्वतःकरितां तसले हस्तलेख मिळवितां कामा नये असे सरकारानें सक्तीचे हुकूम सोडले पाहिजेत असें पंडि-तांनीं स्पष्ट सुचविलें होतें.

शंकरराव पंडितांची मुख्य तक्रार इकडील अस्सल जुने हस्तलेख परदेशीं नेण्याच्या विरुद्ध होती. त्यांच्या नकला करून घेऊन जाण्यास त्यांची मुळींच हरकत नव्हती. पंडितांचें म्हणणें एवढेंच होतें कीं, अस्सल हस्तलेख इकडेच

राहूं दिल्यास इकडील लोकांस संशोधन कार्य करण्यास साधन तरी होईल. तसे हस्तलेख परदेशीं जाऊं दिले म्हणजे त्यांना ह्या देश कायमचा मुकला असें सहजच झालें! वाङ्मयक्षेत्रांत संशोधन कार्य करणारी मंडळी इकडे परमेश्वर-कृपेनें तयार होतच होती. बाळशास्त्री जांभेकर व डॉ. भाऊदाजी यांनीं केलेली कामगिरी तर त्यावेळीं जगापुढें होतीच. डॉ. भांडारकर, ॲडव्होकेट काशीनाथपंत तेलंग व स्वत: शंकरराव पंडित हे त्या क्षेत्रांत सवडीप्रमाणें खपत होतेच. अशा स्थितींत इकडील अस्सल जुने हस्तलेख युरोपीअन पंडितांनीं—कोणत्याही रीतीनें असो—परदेशीं नेणें किंवा त्यांना ते तसे नेऊं देणें हें अत्यंत अन्यायाचें झालें असतें. इतकेंच नव्हे तर त्यापासून ह्या देशाचें कायमचें नुकसान झालें असतें.

संशोधनकार्यांत आमच्या लोकांस पाश्चात्य पंडितच मार्गदर्शक झाले आहेत याबद्दल वाद नाहीं. तरीहि कोणी बडे अधिकारी लोक स्वार्थप्रेरित होऊन कर्तव्यपराङ्मुख होऊं लागले म्हणजे त्यांची चूक निर्भीडपणें दाखवून त्यांना ताळ्यावर आणणारा कोणीतरी योग्य मनुष्य पुढें येणें जरूर असतें. त्याप्रमाणें शंकरराव पंडितांनीं आपल्या सदरील लेखानें त्यावेळीं बरेंच काम केलें, यांत शंका नाहीं.

पंडितांचा सदर्हू लेख बराच विस्तृत आहे. त्या सगळ्या लेखाचें येथें प्रयोजन नाहीं. त्यांतील मुख्य सारांश वर आलाच आहे. पण पंडितांनीं आपल्या लेखांत दुसऱ्या एकदोन आवांतर ( पोट ) मुद्द्यांचा उल्लेख करून त्यासंबंधानें आपले विचार निर्भीडपणानें जगापुढें ठेवले आहेत. त्याबद्दल वाचकांस थोडीशी माहिती करून द्यावी हें इष्ट वाटतें. जे कांहीं युरोपीअन लोक इकडील जुने हस्तलेख पाश्चात्य देशांत नेत असत त्यांच्यातर्फे एकदोन कारणें त्यावेळीं पुढें आणलीं जात असत: एक तर अशा हस्तलेखांचा या देशांतल्यापेक्षां संशोधन दृष्टीनें जर्मनी, फ्रान्स वगैरे पाश्चात्य देशांतील यूनिव्हर्सिट्यांमधून व ग्रंथसंग्रहांमधून ( लायब्ऱ्यांमधून ) अधिक उपयोग होण्याचा संभव होता, व दुसरें असें कीं, संशोधनक्षेत्रांतून काम करण्यास लायक अशी सुशिक्षित मंडळी या देशांत त्यावेळपर्यंत पुरेशी पुढें आली नव्हती. पण हीं दोन्ही कारणें पंडितांना कबूल

नव्हतीं. यासंबंधांत पहिली लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे आमच्या सरकारनें मुळीं पाश्चात्य राष्ट्रांतल्या पद्धतीला अनुसरून, सुशिक्षित लोकांना संशोधन कार्यांत उत्तेजन देण्याच्या हेतूनें इकडील युनिव्हर्सिट्यांतून "फेलोशिप्स" वगैरे ठेवल्या नव्हत्या. तरी अशा सरकारी उत्तेजनाच्या अभावीं देखील आमची बरीच सुशिक्षित मंडळी संशोधनक्षेत्रांत काम करण्याकरितां पुढें येत होती. पंडितांच्या वेळेपूर्वीं वर म्हटल्याप्रमाणें कै. बाळशास्त्री जांभेकर व डॉ. भाऊ दाजी यांचीं नांवें संशोधनकार्यांत प्रसिद्धीस आलींच होतीं. डॉ. भांडारकर व ॲडव्होकेट तेलंग हे दोघे त्याच क्षेत्रांत तर काम करीत होतेच. स्वतः शंकरराव पंडित यांचेही त्याच दिशेनें उद्योग चालू होते. अर्थात् सुशिक्षित लोक संशोधनक्षेत्रांत काम करण्याकरितां अद्याप पुढें येत नव्हते या म्हणण्यांत जीव नव्हता. सबब मागें सांगितल्याप्रमाणें अस्सल हस्तलेख परदेशांत जाऊं देण्याचें बंद करून ते याच देशांत जतन करून ठेवण्याची व्यवस्था करण्यांत आल्यास इकडच्या विद्वान् व सुशिक्षित लोकांकडून त्यांसंबंधाचें संशोधनकार्य चालू राहील व आमचे जास्त जास्त लोक त्या क्षेत्रांत सामील होतील.

अशा हस्तलेखांचा इकडल्यापेक्षां पाश्चात्य देशांतील युनिव्हर्सिट्यांतून अगर ग्रंथसंग्रहालयांतून आणि तोही यूरोपस्थ पंडितांच्या करवीं जास्त उपयोग होण्याचा संभव होता या म्हणण्यांतही शंकरराव पंडितांच्या दृष्टीनें कांहीं अर्थ नव्हता. पंडितांचें असें स्पष्ट मत होतें कीं, संशोधनकार्यांत युरोपीअन पंडितांच्या मतांना, आमच्या इकडील संस्कृतज्ञ सुशिक्षित लोकांच्या मानानें भलतेंच महत्त्व देण्यांत येत असे. आणि त्याचें कारण फक्त आमची राजकीय दृष्टीनें पराधीनता ! पण संशोधनकार्य हा शास्त्रीय विषय या संबंधांत राजकीय दृष्टि काय उपयोगी ? सबब हिंदुस्थान देशांतील प्राचीन वाङ्मयाच्या संशोधनक्षेत्रांत इकडील विद्वान् लोकांच्याच मतांना अधिक महत्त्व देणें योग्य आहे. इतकेंच नव्हे तर तसें त्यांना महत्त्व दिल्याशिवाय व त्यांच्या साहाय्याशिवाय संशोधनकार्य यशस्वी रीतीनें पार पडणें शक्य नाहीं. या संबंधांतले शंकरराव पंडितांचेच मूळ शब्द इकडे देणें इष्ट दिसतें. ते असेः—

"And in spite of the respect which one cannot but feel for scholars like Colebrooke, Goldstücker, Max Muller and

Lassen; in spite of the respect which is plainly due to the perseverance, the energy, the industry, the patience and the ability which European scholars have brought to bear on the study of our ancient language and literature; in spite of these, we emphatically declare it to be our belief that native scholarship is, and for many years to come must remain of very great, we would say indispensable, service in all Oriental investigations. By the very necessity of the case, the ablest foreigner is often at fault where a native student of even mediocre attainments is perfectly at home .......... And we are bound to state that in our judgment it ( this truth ) is imperfectly recognized in Oriental investigations only because of our present political condition. It seems to be assumed by the governing and hence influential classes in this country that no European should be placed in a position of subordination to a native; that a very ordinary European should be allowed privileges which a native of much higher status should not even be heard to claim; that even the European's religion must never be spoken of except as being in every respect superior to that of the Native. By parity of reason, or rather we ought to say as another consequence of the same bias of political caste feeling, it appears to be supposed that even in questions regarding our languages and literatures, the opinion of a European Missionary, or a so called Professor of Oriental Languages should be allowed greater weight than that of almost any Native scholar. This is all, as we have said, due to the abnormal political conditions of Anglo-Indian life. But apart from these conditions, which ought to have no effect on purely scientific questions, there can, we apprehend, be no doubt whatever that the labours and opinions of Native scholars ought, as a rule, to command respect and attention in all Oriental investigations. We have known Professors

of Oriental Languages, who could not talk the vernacular of the peons in their Colleges so as to be quite intelligible to those peons. And the vernacular, which the Missionaries not only talk but write habitually, is known pretty notoriously to have become almost a byword of reproach among the people. We say, therefore, that any course of policy, which blocks up what we may call the native channels of information—whatever wider and more numerous foreign channels it may open up—must, in our judgment, be regarded as prejudicial, in a greater or less degree, to the real, as contrasted with the merely speculative, advance of Oriental research."

उतारा बराच लांब झाला, पण तो सबंध इकडे देण्याचा हेतु इतकाच कीं, शंकरराव पंडित हे आपल्या विषयासंबंधांत युरोपीअन लोकांशीं कसे स्वतंत्र बाण्यानें वागत असत व ते त्या बड्या लोकांच्या चुका कसे निर्भीडपणानें दाखवीत असत हें वाचकांस समजावें. विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, शंकररावांनीं तो लेख बरोबर पन्नास वर्षांपूर्वी लिहिला होता. हल्लीं युरोपीअन लोकांची–मग ते अधिकारी असोत वा नसोत–पूर्वींची मर्यादा म्हणा, इज्जत ( prestige )म्हणा किंवा वजन म्हणा, पूर्वीसारखें राहिलें नाहीं. प्रस्तुत कालीं कोणीही साधारण मनुष्य–मग तो वृत्तपत्राचा संपादक असो किंवा नसो–कोणत्याही गोऱ्या मनुष्याविषयीं स्वतंत्र बाण्यानें लिहूं अगर बोलूं शकतो. तसा प्रकार अर्धशतकापूर्वी नव्हता. त्यावेळीं युरोपीअन लोक व विशेषेंकरून सरकारी अधिकारी लोक—त्यांच्या राजकीय वर्चस्म्या मुळें—हरएक दृष्टींनें आपणांस श्रेष्ठ समजत असत. ब्राह्मण लोक हिंदुस्थान देशांत आपणांस श्रेष्ठ जातीचे समजून इतर जातीच्या लोकांस वाईट रीतीनें वागवीत असतात, असा युरोपीअन लोकांचा आमच्यावर नेहमींचा आरोप असतो तसा तो पन्नास वर्षांपूर्वीही होता. पण तेच युरोपीअन अधिकारी लोक केवळ ते इकडचे सत्ताधारी म्हणून—आपणांस सर्व बाबतींत श्रेष्ठ समजत असत व हिंदी लोकांस बहुतेक सर्व बाबतींत कमी प्रतीचे समजत असत. सरकारी नोकरीचा संबंध आला तर श्रेष्ठ–

कनिष्ठाचा प्रश्न क्षणभर क्षम्य तरी ठरेल. पण इतर बाबतींत–उदाहरणार्थ, धर्माच्या अगर वाङ्मयाच्या बाबतींत—श्रेष्ठकनिष्ठपणा तो कसला? धर्मदृष्टीनें अगर वाङ्मयदृष्टीनें जें सत्य असेल तेंच प्रतिपादन करावयाचें—मग तो कोणीही असो––हाच खरा मार्ग. पण त्याच मार्गाचें, साहेबलोकांचा संबंध आल्यास, अवलंबन करण्यास त्या काळांत आमचे लोक फार थोडे तयार होत असत. याच दृष्टीनें पंडितांच्या सदरील लेखाचें विशेष महत्त्व होतें.

पंडितांनीं आपल्या लेखांत कोलब्रुक, गोल्डस्टकर, मॅक्स् मुल्लर व लॉसेन यांच्यासारख्या पाश्चात्य विद्वान् लोकांनीं आमच्या प्राचीन वाङ्मयासंबंधानें केलेल्या परिश्रमांबद्दल व बहुमोल कामगिरीबद्दल आदरपूर्वक उल्लेख केलाच आहे. पण ते पाश्चात्य पंडित कांहीं झालें तरी भिन्न धर्मीय व तसेच ते भिन्न संस्कृतींत वाढलेले असल्यामुळें त्यांच्या हातून या देशांतील वाङ्मयाचें संशोधन करीत असतांना—इकडील संस्कृतीचें किंवा परंपरेचें पूर्णपणें आकलन न झाल्यामुळें—-चुका होण्याचा नेहमीं संभव असतो. फार काय, पण एकाद्या पहिल्यानंबरच्या युरोपीअन विद्वान् मनुष्याला इकडील वाङ्मयविषयक एकादी गोष्ट परिश्रम करूनही जी समजणार नाहीं ती इकडील एकाद्या साधारण बुद्धीच्या संस्कृतज्ञ मनुष्यास सहज समजूं शकेल. पण ही उघड गोष्ट इकडील कांहीं बऱ्या ( युरोपीअन ) अधिकारी लोकांच्या लक्षांत येत नाहीं. त्यामुळें बऱ्याच वेळां युरोपीअन पंडितांच्या मतांना—संशोधन क्षेत्रांत—महत्त्व देण्यांत येत असे, व इकडील पंडितांच्या मताकडे—केवळ ते जितराष्ट्रांपैकीं म्हणून—दुर्लक्ष करण्यांत येत असे. पण सुदैवानें डॉ. भाऊ दाजी, डॉ. भांडारकर, न्यायमूर्ति तेलंग व स्वतः रा. ब. पंडित यांनीं आपल्या विद्वत्वपूर्ण लेखांनीं युरोपीअन संस्कृतज्ञ लोकांच्या बऱ्याच भ्रामक समजुती निरस्त केल्यामुळें—डॉ. भांडारकरांचा " वैष्णव व शैवपंथ " हा ग्रंथ प्रसिद्ध होऊन नुकतींच बावीस वर्षें झालीं आहेत !—वरील सारखा अन्यायमूलक प्रकार हल्लीं जवळजवळ बंद झाला आहे. सारांश इतकाच कीं, युरोपीअन लोकांनीं इकडील जुने हस्तलेख परदेशांत नेऊन इकडील विद्वान् लोकांना संशोधन कार्याला जरूर लागणारीं साधनें कमी करूं नयेत, एवढेंच पंडितांचें म्हणणें होतें. तशा हस्तलेखांच्या नकला करून घेऊन जाण्याला त्यांची मुळींच हरकत नव्हती.

पंडितांनीं आपल्या सदर्हू लेखांत आणखी एका मुद्द्याचा उल्लेख केला आहे. त्यासंबंधाचा देखील एखादा उतारा इकडे देणें जरूर होतें. पण तसें करून आम्ही आतां आणखी जागा अडवीत नाहीं. थोडक्यांत पंडितांच्या म्हणण्याचा मतलब इकडे देतों.

जुने हस्तलेख छापून प्रसिद्ध करण्यासारखें जबाबदारीचें काम अंगावर घेण्यास तयार अशी इकडील विद्वान् मंडळी फारशी त्यावेळीं पुढें येत नव्हती, हें खरें आहे. याचीं कारणें अनेक होतीं. पण एका महत्त्वाच्या कारणासंबंधानें दोन शब्द इकडे लिहिणें इष्ट आहे. हें कारण म्हणजे अशा वाङ्मयात्मक ग्रंथप्रकाशनाच्या कामीं आमच्या सरकारनें चालविलेला पंक्तिप्रपंच! अशा कामीं उत्तेजन देण्यास साधन व्हावें म्हणून आमचें सरकार दरसाल कांहीं रक्कम निराळी काढून ठेवीत असतें. पण त्या रकमेचा उपयोग त्यावेळीं—पन्नास वर्षांपूर्वी—बहुतेक युरोपीअन लोकांना उत्तेजन देण्याकडे होत असे. पंडितांनीं याबद्दलचीं कांहीं उदाहरणें दिलीं आहेत. त्यांपैकीं एक, काशी येथील दोन अत्यंत विद्वान् अशा जुन्या शास्त्रीबोवांच्या देखरेखीखालीं त्यावेळीं पतंजलीच्या महाभाष्याची एक संपूर्ण आवृत्ति प्रसिद्ध करण्यांत आली होती. पण त्या कामीं आमच्या सरकारकडून चांगलेंसें उत्तेजन मिळालें नाहीं. पण त्याच ग्रंथाची त्याच सुमारास दुसरी एक आवृत्ति खुद्द सेक्रेटरी ऑफ स्टेटच्या आश्रयाखालीं प्रसिद्ध करण्यांत आली! पण हा पंक्तिप्रपंच एवढ्यानेंच थांबला नाहीं. तर सदर्हू दोन आवृत्त्या लोकांना उपलब्ध असतांना त्याच ग्रंथाची पुन्हां तिसरी एक आवृत्ति डॉ. कीलहॉर्न साहेब यांच्या संपादकत्वाखालीं प्रसिद्ध करण्यास आमच्या मुंबई सरकारानें मंजुरी दिली होती! सरकाराजवळ त्यावेळीं पैसे जास्त होते काय? किंवा त्यांना त्यांच्या आश्रयाला पात्र असा दुसरा ग्रंथ मिळाला नाहीं म्हणून त्यांनीं महाभाष्याच्या दोन आवृत्त्या छापून पूर्वीच तयार असतांना फिरून आणखी एक तिसरी आवृत्ति छापण्यास मंजुरी दिली? दुसरें उदाहरणः "इंडिअन अँटिक्वेरी" या मासिकाच्या द्वारें मिस्टर बर्जेस हे इकडील महत्त्वाचे ताम्रपत्रलेख व शिलालेख प्रसिद्ध करीत असत. इतिहासाच्या कामीं या लेखांचें महत्त्व विशेष असतें यांत शंका नाहीं. त्या बर्जेस साहेबांस सेक्रेटरी ऑफ् स्टेट हे दरसाल एक मोठी रक्कम मंजूर

करतात; पण त्याच सुमारास महाराष्ट्रांत चालू असलेल्या "काव्येतिहास संग्रहा" सारख्या ऐतिहासिक दृष्टीनें उपयुक्त अशा मासिकाला सरकारकडून उत्तेजन मिळत नाहीं ! "इंडियन अँटिक्वेरी" तून जसे शिलालेख व ताम्रपत्रलेख प्रसिद्ध होत असत, त्याचप्रमाणें "काव्येतिहास संग्रहां" तून मराठ्यांच्या इतिहासाला उपयोगी अशा बखरी प्रकाशित होत असत. बखरींपेक्षां शिलालेख अधिक महत्त्वाचे, किंवा चालुक्य, वल्लभी, गुप्त इत्यादि वंशांच्या इतिहासापेक्षां मराठे, भोंसले, शिंदे, होळकर यांच्या वंशांचा इतिहास कमी महत्त्वाचा असें तर आमच्या सरकारला वाटलें नाहीं ना ? "इंडियन अँटिक्वेरी"ला, इतिहासाचें साधन या दृष्टीनें, सरकारी आश्रय मिळाला याबद्दल कांहीं वाटण्याचें कारण नाहीं. पण वरील पंक्तिप्रपंचाचा अर्थ इतकाच निघतो कीं, युरोपीअन लोकांनीं चालविलेल्या कामास–त्यांच्या खटपटीमुळें–आमच्या सरकारचा आश्रय पटकन् मिळतो व इकडील हिंदीलोकांनीं चालविलेल्या ह्याच जातीच्या कामाकडे सरकारचें लक्षसुद्धां जात नाहीं !

शंकरराव पंडितांनीं आपल्या वरील लेखाच्या द्वारें कांहीं बऱ्या लोकांच्या चुका, प्रमाणें व उदाहरणें देऊन, चव्हाट्यावर आणल्या तें फार चांगलें झालें. अशाप्रकारचा ( जुने लेख इकडून परदेशांत नेण्याबाबतचा ) बोभाटा त्यानंतर मात्र कोठें ऐकूं आला नाहीं. उलट हंगेरीहून डॉ. बुल्हर यांनीं इकडील कांहीं हस्तलेखांच्या–अस्सल न मागवितां–नकला आपणांकरितां मिळविण्यासाठीं डॉ. भांडारकरांना पत्रद्वारें विनंति केल्याचे गुरुवर्यांच्या पत्रव्यवहारांत आम्हांस दाखले मिळाले आहेत.

प्रकरण तेरावें

## लोकजागृतीचे यत्न

शंकरराव पंडित हे आतांपर्यंत सांगितलेलें लेखनकार्य करूनच थांबत नसत. ते संभाषणरूपानें व व्याख्यानरूपानें लोकजागृतीचें कार्यहि करीत असत.

त्यांचा वैदिककालापासूनच्या संस्कृत वाङ्मयाशीं व आपल्या मध्यमकालीन ज्ञानेश्वरादि कविश्रेष्ठांच्या वाङ्मयाशीं उत्तम परिचय व जबरदस्त व्यासंग असे. त्यामुळें त्यांना आपल्या प्राचीन आर्यसंस्कृतीचा अत्यंत अभिमान वाटत असे. व आपण सर्वांनीं आपल्या पूज्य पूर्वजांबद्दल अभिमान बाळगला पाहिजे असें त्यांचें म्हणणें असे. असा खरा प्रकार असे तरी हा त्यांचा आपल्या आर्यसंस्कृती-बद्दलचा अभिमान अंधश्रद्धामूलक अगर दुराग्रहमूलक नव्हता. त्यांना आपल्या देशाच्या प्रस्तुत अवनतस्थितीविषयीं अति वाईट वाटत असून आपण इंग्लंड देशासारख्या पुढें गेलेल्या राष्ट्रापासून शिकण्यासारख्या ज्या गोष्टी असतील त्या शिकून आपली सुधारणा जरूर करून घेतली पाहिजे असें त्यांचें मत व उपदेश असे. सन १८७४ मध्यें शंकरराव हे लंडन येथील प्राच्यभाषाविशारदांच्या परिषदेकरितां मुंबईसरकारतर्फें एक प्रतिनिधि म्हणून गेले होते याचा उल्लेख व त्यांनीं त्या परिषदेंत वाचलेल्या निबंधाचा सारांश या गोष्टी मागील एका प्रकरणांत आल्याच आहेत. पण पंडित तिकडे एवढेंच करून थांबले नाहींत. त्यांनीं इंग्लंडमधील परिस्थितीचें नीट अवलोकन करून व तिकडील लोकांच्या स्थितीशीं इकडील लोकस्थितीची तुलना करून आपलें चुकतें कुठें याविषयीं त्यांनीं आपलें मत निश्चित केलें व त्याप्रमाणें ते मग इकडे आल्यावर लोकांस उपदेश करूं लागले. अशा त्यांच्या भाषणाचें व उपदेशाचें फार महत्त्व असे. वस्तुतः नोकरीच्या निमित्तानें पंडितांचें कलादगी, सुरत, खेडा, खानदेश, अहमदनगर इत्यादि जिल्ह्यांमधून बरेंच फिरणें झालें होतें. त्या त्या ठिकाणीं त्यांच्या ज्ञानाचा व अनुभवाचा, संभाषणें अगर व्याख्यानें यांच्याद्वारें, लोकांस लाभ झाला असलाच पाहिजे. पंडितांसारखा महाविद्वान् व देशाभिमानी गृहस्थ एकाद्या मोठ्या गांवीं गेल्यावर, व तिकडे त्याचें कांहीं दिवस वास्तव्य झाल्यावर, लोकांस चार उपदेशाच्या कळकळीनें गोष्टी सांगून त्यांच्या ठिकाणीं कांहींतरी जागृति उत्पन्न केल्याशिवाय राहील हें संभवनीयच दिसत नाहीं. पण दुःखाची गोष्ट एवढीच कीं, त्या त्या ठिकाणीं पंडितांनीं केलेल्या भाषणांचा अगर उपदेशांचा सारांश टिपून घेऊन तो एकाद्या, ज्ञानप्रकाश किंवा इंदुप्रकाश यांसारख्या, पत्रांतून प्रसिद्ध करण्याचें कोणीं मनांत आणलें नाहीं. निदान तसा उल्लेख केलेला आमच्या तपासांत आम्हांस आढळून आला नाहीं. फक्त

अहमदनगर येथील पेन्शनरगृहस्थ रा. रा. त्र्यंबक गंगाधर धनेश्वर हे मात्र एक अपवाद दिसतात. या सद्गृस्थांनीं रा. ब. शंकर पांडुरंग पंडित यांचें एक त्रोटक चरित्र लिहून तें मुंबई येथील मनोरंजन मासिकाच्या ( ऑगस्ट सन १९१४ ) एका अंकांत प्रसिद्ध केलें आहे. शंकररावांच्या आयुष्यांतील मुख्य मुख्य गोष्टींचा तर त्यांत उल्लेख आलाच आहे, पण त्यांत पंडितांनीं अहमदनगर येथें असतांना वाङ्मयदृष्टीनें अगर सामाजिक दृष्टीनें जी बहुमोल कामगिरी केल्याचें व त्या योगानें लोकांत जागृति, किंबहुना नवजीवन, उत्पन्न केल्याचें वर्णन आलें आहे, त्याचें आम्हांस जास्त महत्त्व वाटतें. रा. धनेश्वरांच्या लेखानें शंकररावांच्या अहमदनगर येथील सार्वजनिक जीवितक्रमाचें तर वाचकांपुढें चित्र उभें राहतेंच, पण त्या योगानें पंडितांनीं इतर मोठ्या गांवीं असतांना देखील काय काम केलें असेल याची सहज कल्पना होऊं शकते.

शंकरराव हे सन १८८७ च्या अखेरीस दोन वर्षांच्या रजेवरून परत आल्यानंतर त्यांची मागें एकवार सांगितल्याप्रमाणें अहमदनगर येथें हुजूर डेप्युटी कलेक्टराच्या जागीं नेमणूक झाली होती. ते तेथें त्यांची सन १८९० सालीं काठेवाडांतील पोरबंदर संस्थानांत ॲडमिनिस्ट्रेटरच्या जागेवर नेमणूक होईपर्यंत होते. म्हणजे त्यांचें नगर येथें दोन वर्षांपेक्षां अधिक मुदतपर्यंत वास्तव्य होतें. तेवढ्या मुदतींतील पंडितांच्या बहुतेक सर्व चळवळीचें रा. धनेश्वर यांच्या लेखांत थोडक्यांत वर्णन आलें आहे.

शंकरराव नगरला असतांना तिकडील कांहीं मंडळींनीं एक व्याख्यानमाला सुरू केली होती. व ती पंडितांचीं व्याख्यानें श्रवण करण्यास मिळावीं म्हणूनच सुरू करण्यांत आली होती. अर्थात् मालेंत बहुतेक पंडितांचींच व्याख्यानें होत असत. एकदां ही माला चालू असतांना रा. ब. महादेव गोविंद रानडे–हे त्यावेळीं फिरतीवर होते–हे नगरला आले होते. त्यावेळीं नगर येथील डिबेटिंग क्लबच्या अध्यक्षांनीं जाऊन रानडे साहेबांना एखादें व्याख्यान देण्याविषयीं विनंति केली. त्याबरोबर रानड्यांनीं एकदम पंडितांविषयीं असे उद्गार काढले: “ अहो, प्रत्यक्ष गंगा तुम्हांला दैवयोगानें लाधली असतां तुम्ही

गंगेला जाऊन मिळणाऱ्या ओहोळाकडे कशाला येतां ?" इतका रानड्यांना पंडितांच्या विद्वत्तेविषयीं अभिमान व आदर वाटत असे !

आपल्या वेदग्रंथांविषयीं पंडितांची भारी पूज्यबुद्धि असे. व त्या विषयाचें त्यांचें ज्ञानही अगाध असे. ते नेहमीं म्हणत असत कीं, आमच्या लोकांस पूर्वी छापण्याची कला माहीत नव्हती, अशावेळीं ब्राह्मणवर्गानें हजारों वर्षें आमच्या वेदांचें जतन करून जगावर मोठे उपकार केले आहेत. जुने वैदिक व शास्त्री यांच्याविषयीं पंडितांना फार आदर वाटत असे. एकदां कांहीं कारणानें आमचे वडील रा. ब. पंडितांना भेटले असतांना त्यांनीं त्यांचेकडून ऋग्वेदसंहितेचा कांहीं भाग म्हणून घेतला होता व तो ऐकून ते फार संतुष्ट झाल्याचें वडिलांनीं आम्हांस सांगितल्याचें स्मरतें. पंडितांजवळ नेहमीं एकादा दुसरा शास्त्री हा असेच. एकदां एका शास्त्रीबोवांना प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें पंडितांची नोकरी सोडून जावें लागलें. पण पंडितांनीं त्यांचा अखेरपर्यंत परामर्ष घेतल्याचें धनेश्वर सांगतात.

पंडितांच्या व्याख्यानास नगरला नेहमीं लोकांची गर्दी होत असे. ते एरवीं बोलतांना जरा घाईनें बोलत असत; पण व्याख्यानास उभे राहिले म्हणजे त्यांचें भाषण अस्खलित, स्पष्ट व लोकांस सहज समजेल, असें असे. अशा वेळीं त्यांच्या तेजस्वी स्वभावाचें त्यांच्या चेहऱ्यावर प्रतिबिंब उमटलेलें दिसत असे.

नगरला एकदां पंडितांचीं "आमचे वेद" या विषयावर व्याख्यानें झालीं. त्यावरून त्यांची अगाध विद्वत्ता लोकांच्या निदर्शनास आली; व त्यांना आपल्या त्या पवित्र ग्रंथाविषयीं किती पूज्यबुद्धि व अभिमान वाटत असे हें स्पष्ट रीतीनें दिसून आलें. प्राचीन ब्राह्मणवर्गाला दोष दिलेला पंडितांना बिलकुल खपत नसे. ब्राह्मणांच्या अंगीं कोणतेही व कितीही दोष असले तरी त्यांच्या एका कृतीनें त्या सर्वांवर विरजण पडतें, एवढेंच नव्हे, तर त्या कृतीला वंदनीय स्वरूप प्राप्त होऊन जगानें त्यांच्यापुढें कृतज्ञताबुद्धिपूर्वक मान वांकविली पाहिजे असें शंकररावांचें म्हणणें असे ! वेद म्हणजे जगांतील अत्यंत प्राचीन ग्रंथ. ते संभाळण्याचें अत्यंत दुर्घट काम ज्यांनीं केलें त्यांनीं जगाला उपकृत केलें नाहीं असें कोणता कृतज्ञ मनुष्य म्हणेल ? छापण्याची अगर

लिहिण्याची कला प्रचलित नव्हती अशा वेळीं ऱ्हस्व-दीर्घ, काना, मात्रा * यांत देखील चूक होऊं नये म्हणून वेदग्रंथांचे पद, जटा, घन, क्रम असे निरनिराळे प्रकार करून वेदग्रंथ पिढ्यानुपिढ्या मुखोद्गत करून जिवंत राखले, त्या ब्राह्मणवर्गानें जगाला कायमचे ऋणी करून जिवंत ठेवलें आहे असे आवेशयुक्त उद्गार शंकररावांनीं काढले होते. व हे उद्गार त्यांनीं केवळ जातीच्या अभिमानानें काढले नसून ते शुद्ध व श्रद्धायुक्त अंतःकरणानें काढले होते !

दुसऱ्या एका प्रसंगीं पंडितांनीं " यज्ञोपवीता " च्या मूळ हेतूविषयीं विवेचन केलें होतें व तें अत्यंत बोधप्रद होतें. प्राचीन काळीं यज्ञ करणें हें एक पवित्र व आवश्यक कर्तव्यकर्म म्हणून आर्य लोकांकडून मानलें जात असे. आणि यज्ञयागाच्यावेळीं हें " यज्ञोपवीत " धारण करावयाचें असल्यामुळें तें कर्तव्याची मनुष्याच्या ठिकाणीं जाणीव उत्पन्न करण्याचें एक साधन अगर चिन्ह म्हणून गणलें जात असे. हल्लींच्या दिवसांत यज्ञ-याग जरी बंद पडले आहेत तरी यज्ञोपवीताचें—तें केवळ ब्राह्मणत्वाचें अगर हिंदुत्वाचें चिन्ह असें न मानतां ती एक आपणांस आपल्या कर्तव्याचें स्मरण करून देणारी खूण आहे म्हणून-संरक्षण केलें तरी तें आपल्या हिताचेंच होईल. व त्या दृष्टीनेंच खरें पाहिल्यास यज्ञोपवीताचें महत्त्व आहे.

तिसऱ्या एका प्रसंगीं शंकरराव पंडितांनीं " इंग्लंडापासून आपण काय शिकलें पाहिजे ? " या विषयावर एक अत्यंत सुश्राव्य असें व्याख्यान दिलें होतें. त्यांत त्यांनीं आपला विलायतेंतील अनुभव सांगून म्हटलें कीं, इंग्रज लोक हे आमच्यापेक्षां पुष्कळच बाबतींत श्रेष्ठ आहेत. इंग्लंडाचा आधुनिक कालांत सर्व सुधारलेल्या राष्ट्रांत जो इतका उत्कर्ष झाला आहे त्याचें मुख्य कारण म्हणजे तिकडे झालेला मनस्वी शिक्षणप्रसार होय, असें पंडितांनीं सांगितलें. इंग्रज लोक हे आमच्यापेक्षां अधिक सुशिक्षित, आपल्या देशस्थितीविषयीं अधिक

* वेदपठन करणारे ब्राह्मण अद्यापि कसे धर्मबुद्धीनें व ईश्वरार्पण म्हणून वेद म्हणत असतात हें पुढील श्लोकावरून स्पष्ट होतें; हा श्लोक ते पठणाच्या शेवटीं म्हणतातः " यदक्षरपदभ्रष्टं मात्राहीनंच यद्भवेत् । तत्सर्वं क्षम्यताम् देव प्रसीद परमेश्वर ॥ "

माहितगार, देशाच्या कारभारांत अधिक लक्ष घालणारे व साधारणतः अधिक सत्यप्रिय व अधिक प्रामाणिक असतात असें शंकररावांनीं सांगितलें. इंग्रज लोकांच्या प्रामाणिकपणाचें पंडितांनीं एकच उदाहरण सांगितलें. इन्कम टॅक्स ऑफिसरांच्या नजरचुकीनें कराची आकारणी कमी झाली असल्यास ती चूक अधिकाऱ्यांच्या नजरेस आणून आपलें खरें उत्पन्न अमुक आहे असें सांगणारे व कमी बसलेला कर आपण होऊन सरकारी तिजोरींत भरणारे असे इंग्लंडांत किती तरी लोक आहेत असें पंडित म्हणाले! असा मनुष्य आपल्या देशांत एकही मिळत नाहीं असा आपला—ते मुंबईस असिस्टंट लायसन्स कलेक्टरच्या जागीं असते वेळेचा—अनुभव त्यांनीं सांगितला!!

नगरला एकदां व्याख्यानमालेचा समारोप करतांना शंकररावांनीं "उत्तिष्ठत जाग्रत" या उपनिषदांतील वचनाचा अनुवाद करून लोकांस "तुम्ही आतां लवकर जागे व्हा" असा अत्यंत कळकळीचा उपदेश केला. या ठिकाणीं शंकर-रावांच्या भाषणपद्धतीविषयीं वगैरे जें रा. धनेश्वर यांनीं आपल्या लेखांत लिहिलें आहे त्याचा थोडासा उल्लेख करावा असें वाटतें, ते म्हणतात. "शंकररावांचा बांधा सडपातळ होता. काठी फार उंचही नाहीं, व फार ठेंगणीहि नाहीं अशी होती. पण त्यांच्या चेहेऱ्यावर विद्वत्तेचें व नैसर्गिक ओजस्वितेचें विलक्षण तेज चमकत असे. त्यांची मुद्रा दिसण्यांत उग्र नव्हती. पण पहाणाराला त्यांचा दरारा वाटे. त्यांच्या मानी आणि करारी स्वभावाचें तेज त्यांच्या चेहेऱ्यावर स्पष्ट उमटलेलें दिसे. त्यामुळें ते भाषण करीत असतांना—जरी ते मोठे वक्ते नव्हते अथवा त्यांचा आवाज जंगी नव्हता तरी—त्यांचा प्रत्येक शब्द जोरदार असे. भाषण करतांना शब्दप्रवाह सारखा आणि गंभीरपणानें त्यांच्या मुखांतून बाहेर पडे. त्यामुळें त्यांचें विचारपरिप्लुत वक्तृत्व श्रवण करून नव्या पिढीला स्फुरण चढे, व जुन्या पिढीला त्यांच्याबद्दल आदरबुद्धि वाटे." अशी पंडितांची भाषण करण्याची रीत असल्यामुळें वर सांगितलेल्या समारोपाच्या वेळच्या स्फूर्तिदायक भाषणानें श्रोत्यांच्या मनावर फारच उत्तम परिणाम झालेला दिसला. पंडित म्हणाले:—

"देशबांधवहो, तुम्ही घोर निद्रेंत घोरत आहां. आपल्या भोंवतीं काय चाललें आहे तें नीट डोळे उघडून पाहा. जे जे देश जगाबरोबर चालले नाहींत

ते ते लयास गेले. इतर राष्ट्रांबरोबर आपला टिकाव लागावा अशी जर आपली इच्छा असेल तर आपण मागें रेंगाळतां कामा नये. जगाचा इतिहास आपणांस काय शिकवीत आहे याकडे आपलें हजारों वर्षे दुर्लक्ष होत आलें आहे. ही आपल्या हातून मोठी चूक झाली आहे. तिचें परिमार्जन करणें हें आपलें सर्व सुशिक्षित लोकांचें मुख्य कर्तव्यकर्म आहे." असा स्फुरणयुक्त पंडितांनीं उपदेश केला. त्यावरून त्यांचा देशाभिमान व कळकळ हीं व्यक्त होतात. वरील भाषणांत सांठलेलें सत्य त्रिकालाबाधित आहे. तें जर आम्हीं डोळ्यांपुढें ठेवून वागलों तर किती बहार होईल? असो; या भाषणाचा सारांश व्याख्यानास हजर असलेल्या रा. रा. सीताराम गणेश देवधर यांनीं लिहिलेला त्यावेळच्या "सुधारकांत" प्रसिद्ध झाला होता, व त्याबद्दल पत्रकर्त्यांनें पंडितांचा मोठा गौरव केला होता.

एकंदरींत शंकरराव पंडित हे लोकांच्या बाबतींत आपलें मार्गदर्शकत्वाचें काम चोख रीतीनें बजावीत असत यांत शंका नाहीं.

---

प्रकरण चवदावें

## पुण्याचें फीमेल हायस्कूल

एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धांत हिंदुस्थानदेशांत ज्या एकदोन क्रांतिकारक गोष्टी घडल्या त्यांत आमच्या सरकारानें इकडे इंग्लिश शिक्षणपद्धत सुरू केली या गोष्टीचें महत्त्व विशेष आहे. वस्तुतः, कांहीं कांहीं गोष्टी आमच्या देशांत ब्रिटिश सत्तेच्या स्थापनेबरोबरच सुरू झाल्या होत्या व त्या योगानें आमच्या लोकांच्या दृष्टींतच हळूहळू फरक पडूं लागून त्याचा त्यांच्या आचार-विचारांवर देखील परिणाम होऊं लागला होता. देशांत पोस्ट–तारायंत्र हीं सुरू झालीं. युरोपखंडांत वाफेच्या शक्तीचा शोध लागल्यामुळें तेथल्या प्रमाणें इकडे आगगाड्या व आगबोटी सुरू झाल्या. या साधनांच्या योगानें आमच्या लोकांच्या प्रवासाची चांगली सोय झाली, हें खरें. परंतु त्या योगानें जे इतर

परिणाम होऊं लागले ते टाळतां येण्यासारखे नव्हते. उदाहरणार्थ, आगगाडींतून अगर आगबोटी वरून प्रवास करणाऱ्या लोकांकडून स्पर्शास्पर्शासंबंधाचे निर्बंध पूर्वीसारखे कसे पाळले जाणार ? तसेंच लांबच्या—काशी, रामेश्वर, जगन्नाथपुरी वगैरे क्षेत्रांपर्यंतच्या—प्रवासांत खाण्यापिण्याचे प्रसंग हे येणारच. त्यावेळीं सोंवळ्याओंवळ्याचे नियम पूर्वीसारखेच कसे पाळतां येणार ? रेल्वेच्या स्टेशनावर किंवा आगबोटीच्या बंदरावर सोडावॉटरचीं व इतर शीत पेयांचीं दुकानें आलीं. प्रवासी लोकांस उन्हाच्या वेळीं तहान ही लागणारच, व जवळच तयार मिळणारें एकादें शीत पेय घेण्याची त्यांना इच्छा होणारच. अशावेळीं अमक्याच्या हातचें पाणी घ्यावयाचें व तमक्याच्या हातचें घ्यावयाचें नाहीं अशा प्रकारचे नियम पाळतां येणार कसे ?

ही एक बाजू झाली. दुसऱ्या बाजूनें देखील असेच परिणाम दृग्गोचर होऊं लागले. उदाहरणार्थ, सरकारला लोकहिताच्या दृष्टीनें जरूर ते कायदे करण्याचा जो अधिकार असतो त्याचा उपयोग करून हिंदुस्थान सरकारनें इकडील सती, गुलामगिरी, बालहत्या इत्यादि धर्माच्या नांवाखालीं अमानुषपणाच्या ज्या चाली प्रचलित होत्या त्या कधींच बंद करून टाकल्या होत्या. त्याचप्रमाणें इकडे इंग्लिश-सरकारानें जीं नवीन न्यायकोर्टें स्थापन केलीं त्यांतील न्यायाधिशांनीं देखील कांहीं कांहीं अन्यायमूलक चालींना—विशेषेंकरून स्त्रियांच्या हक्कांसंबंधाच्या चालींना—इष्टप्रकारचें वळण देण्याची सुरवात केली होती. सारांश, याप्रमाणें बदललेल्या परिस्थितीमुळें कांहीं कांहीं बाबतींत लोकांच्या आचारविचारांवर, नकळतच जणूं, परिणाम होऊं लागला होता. म्हणजे देशांत ब्रिटिश सत्तेची स्थापना झाल्यापासून इकडे एक नवीन मन्वंतरच सुरू झालें असें म्हणण्यास मुळींच हरकत नाहीं.

याप्रमाणें नवीन मन्वंतरामुळें लोकांच्या आचारविचारांवर जो परिणाम होऊं लागला त्याशीं वस्तुतः पुढारी लोकांचा अगर सुजाण लोकांचा प्रत्यक्ष असा फारसा संबंध नव्हता. पण तसा संबंध पुढें पुढें साहजिकच येऊं लागला. इंग्लिश सत्ता स्थापन व्हावयाच्या पूर्वी आमच्या देशांत ठिकठिकाणीं लहान मोठीं हिंदुमुसल्मानांचीं राज्यें होतीं, व तीं कशीबशीं चाललीं होतीं. परंतु

इतर सुधारलेल्या देशांच्या मानानें आम्हीं राष्ट्रीय उन्नतीच्या दृष्टीनें अगदीं घोर निद्रेंत होतों. जगांत काय चाललें आहे, इतर राष्ट्रें उद्योगाची कास धरून कशीं उदयास येत आहेत, याविषयीं आम्ही जवळजवळ अंधेरांत होतों ! पण इकडे इंग्रजी शिक्षण सुरू झाल्यापासून हें सर्व बदललें. यामुळेंच या शिक्षण-पद्धतीला आम्ही वर क्रांतिकारक गोष्ट म्हटलें आहे. इंग्लिश शिक्षण मिळूं लागल्यापासून आम्हांस बऱ्याच नवीन गोष्टी समजूं लागल्या. पाश्चात्य राष्ट्रांचा आम्ही इतिहास वाचूं लागल्यापासून त्यांची उद्योगाच्या जोरावर अगदीं निकृष्ट अवस्थेमधून कसकशी भरभराट झाली हें आम्हांस समजूं लागून आम्हीही त्यांचेंच उदाहरण आपल्यापुढें ठेवून उद्योगास लागलों तर खचित आमच्या देशासही चांगले दिवस येतील असें आम्हांस वाटूं लागलें. अर्थात् आम्ही आपल्या घोर निद्रेंतून खडबडून जागे होऊं लागलों असेंही म्हणण्यास हरकत नाहीं.

सन १८५७ मध्यें मुंबईची युनिव्हर्सिटि स्थापन झाल्यावर त्या विद्यामंदिरांतून जी पहिली विद्वान् पदवीधर मंडळी बाहेर पडली त्यांचें साहजिकच आपल्या स्थितीचें सामाजिक दृष्टीनें नीट निरीक्षण करण्याकडे लक्ष लागलें. त्या वेळीं त्यांना आमची स्थिति हरएक बाबतींत अति असमाधानकारक होती असें स्पष्ट दिसून आलें. सामाजिक दृष्टीनें—विशेषेंकरून स्त्रियांची—स्थिति तर अत्यंत शोचनीय होती. समाजांत पुरुषांना जवळजवळ कोणतेंच बंधन नसे. आणि सगळींच बंधनें—बंधनांचें कुंपण देखील म्हणा—बायकांच्या भोंवतीं असत. मुलींचीं लग्नें लहान वयांत होत असत. पण दुर्दैवानें अशा एकाद्या मुलीला वैधव्य प्राप्त झालें तर—मग तिचें वय कितीही लहान असो ! —तिला पुन्हां विवाह करण्याची मुभा नसे. पुरुषांना मात्र एक बायको मेल्यावर दुसरी, ती मेल्यावर तिसरी किंवा लहर लागली तर एकाच वेळीं वाटतील तितक्या बायका करण्याची पूर्ण मोकळीक असे ! या कामांत पुरुषांना समाज आड येत नसे, धर्म आड येत नसे ! उलट बायकांच्या बाबतींत नवरा आधीं वारल्यास त्यांनीं सती जाण्याची चाल पूर्वी पुष्कळ ठिकाणीं जोरांत होती ! म्हणजे बायकांच्या जिण्याची किंमत शून्य समजली जात होती ! ! असा हा समाजांत उघड-उघड अन्यायाचा—निर्दयतेचा—प्रकार राजरोस चालू होता. त्याचप्रमाणें

देशांतील असंख्य जातींमध्यें एकमेकांशीं सहानुभूतीचे संबंध नसत. अस्पृश्य जातींना अति वाईट रीतीनें वागविण्यांत येत असे. असा प्रकार सर्व देशभर चालू होता. या स्थितींत सुधारणा होणें अत्यंत जरूर होतें. हीच स्थिती डॉ. भांडारकरांनीं आपल्या एका भाषणांत पुढीलप्रमाणें वर्णिली होती.

"नवीन शिक्षणपद्धतीनें तयार झालेल्या मंडळीच्या मनांत विचारजागृति होऊन ते आपल्या चालीरीतींकडे चिकित्सक दृष्टीनें पाहूं लागले तों त्यांना आढळून आलें कीं, देशांतील अर्धीअधिक लोकसंख्या—स्त्रिया व मागसलेले लोक—अज्ञानांधकारांत आहेत. दहाबारा वर्षांच्या बालिकांचीं पन्नास साठ वर्षांच्या जख्खड वृद्ध मनुष्यांशीं लग्नें लाविलीं जात आहेत. देशभर इतक्या जाती—व त्याही बहुतेक एका जातीचा दुसरीशीं छत्तिसाचा आंकडा असलेल्या अशा—पसरल्या आहेत कीं, चारचौघे मिळून एकजुटीनें एकादें काम पार पाडणें अशक्य होऊन बसलें आहे." यामुळें पहिल्या पिढींतील सुशिक्षित लोकांनीं ही वर सांगितलेली स्थिति सुधारण्याचे प्रयत्न प्रथम आरंभले.

सामाजिक सुधारणा करावयाची म्हणजे प्रथम स्त्रियांची स्थिति सुधारणें जरूर होतें. आणि स्त्रियांची स्थिति सुधारणें म्हणजे पहिल्यानें त्यांना शिक्षण देऊन त्यांचें अज्ञान घालविण्याचा प्रयत्न करणें हेंच होय. वस्तुतः या दिशेनें प्रयत्न करणें म्हणजे निदान हिंदुस्थान देशांत तरी कांहीं नवीन गोष्टीची सुरवात करणें नव्हे. आपल्या देशांत पूर्वी स्त्रियांना शिक्षण देण्याची वहिवाट होती. इतकेंच नव्हे तर, प्राचीन काळीं धर्मचर्चेसाठीं म्हणून ज्या परिषदा भरविल्या जात असल्याचे आमच्या ग्रंथांत दाखले मिळतात त्यांत स्त्रियादेखील भाग घेत असत. म्हणजे प्राचीन काळीं आमच्या स्त्रिया सुसंस्कृत मनाच्या असत व त्यामुळें त्यावेळचें आमचें सर्व सामाजिक वातावरणच उन्नत स्वरूपाचें असे. पण पुढें देशांत अनेक क्रांत्या झाल्या. व त्या योगानें आमच्या स्त्रीवर्गासंबंधानें समाजांत अनुदार कल्पना उद्भूत झाल्या. त्यांतही देशांत मुसलमानी अंमल सुरू झाल्यावेळेपासून तर जास्तच भर पडली. याचा परिणाम असा झाला आहे कीं, ज्या हिंदुसमाजांत, उदाहरणार्थ, प्राचीनकाळीं पडद्याची चाल असल्याचें आमच्या वाङ्मयांत एकही उदाहरण मिळणार नाहीं, त्यांत आज फक्त महाराष्ट्र अगर दक्षिण

हिंदुस्थान खेरीजकरून, पडद्याची पद्धत सर्वत्र बहुतेक जारींत चालू आहे. तात्पर्य, अशा स्थितींत सामाजिक सुधारणा घडवून आणणें म्हणजे प्रथम स्त्रियांचें अज्ञान घालविण्याचे प्रयत्न करणें हेंच होय. ही गोष्ट आमच्या पहिल्या सुशिक्षित मंडळीच्या लक्षांत आली आणि त्यांनीं त्या दिशेनें आपल्या उद्योगास आरंभ केला. दुसरी लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे वरील प्रकारची जागृति गेल्या शतकाच्या सुमारें मध्यास त्यावेळच्या मुंबईतील विद्यार्थिवर्गामध्यें प्रथम दृग्गोचर झाली, व त्यांनीं कांहीं प्रोफेसर लोकांच्या मदतीनें व सहानुभूतीनें सन १८४८ सालीं मुंबईस "स्टूडंट्स् लिटररी व साएंटिफिक सोसायटी" ही संस्था स्थापन केली. या संस्थेचें मुंबईतील किंबहुना सर्व मुंबई इलाख्यांतील सार्वजनिक चळवळीच्या इतिहासांत फार मोठें महत्त्व आहे, व त्यांत त्यावेळचे, शेट दादाभाई, डॉ. भाऊ दाजी, मंडलीक, डॉ. भांडारकर, रानडे, तेलंग वगैरे सर्व पुढारी लोक सामील झालेले होते. सदहू संस्थेच्या आश्रयानें मुंबईस पहिली मुलींची शाळा स्थापन केली जाऊन सामाजिक सुधारणेचा "श्रीगणेशा" तर सुरू झालाच, पण पुढें पुढें तर तिच्या कार्याशीं, न्या. तेलंग, सर फरोजशहा, सर दिनशा वाच्छा यांचा संबंध आल्यापासून विस्तार होऊन तिच्या आश्रयानें वाङ्मयात्मक, राजकीय वगैरे चळवळी देखील सुरू झाल्या. सन १८४८ मध्यें मुंबईस जी पहिली मुलींची शाळा स्थापन करण्यांत आली त्यांत सुधारणेच्छु लोकांचा कोणता मूळ हेतु होता, याविषयीं डॉ. भांडारकरांच्याच एका भाषणांतून लहानसा उतारा देणें इष्ट-दिसतें.

"In the year 1848 was established the first Girls' school in Bombay by the members of the "Students' Literary and Scientific Society." ..............................and the object of the social reformers was to endeavour to elevate the condition and the degraded position of women."

सारांश, याप्रमाणें सदहू पहिल्या सुशिक्षित मंडळींचा स्त्रीवर्गाची स्थिति सुधारणें हा जरी हेतु होता तरी त्यांच्या कामांत कांहीं लोकांचा विरोध होताच. तथापि या मंडळींनीं आपलें काम नेटानें पुढें चालविलें व परमेश्वरकृपेनें त्यांत त्यांना यश येऊं लागलें.

## पुण्याचें फीमेल हायस्कूल

याप्रमाणें मुंबईस मुलींची शाळा स्थापन झाल्यावर व तिचे सुपरिणाम लोकांच्या नजरेस आल्यावर इतर ठिकाणाची सुधारणेच्छु मंडळी साहजिकच जागी होऊं लागली, व ती मग त्याच दिशेनें प्रयत्नास लागली. सन १८७९ मध्यें रा. ब. शंकर पांडुरंग पंडित यांची मुंबई सरकारचे मुख्य दुभाषी– "Oriental Translator to the Government of Bombay" या हुद्दयावर नेमणूक झाली. त्या निमित्तानें मग मुंबईसरकारबरोबर त्यांचें वर्षांतून पांच सहा महिने पुण्यास राहणें होऊं लागलें. शंकररावांचें जरी नोकरीच्या कारणानें मुंबईपासून लांबलांबच्या ठिकाणीं वास्तव्य होत असे तरी त्यांचे बंधु रा. घनश्यामपंत पंडित हे "स्टूडंट्स् लिटररी अँड साएंटिफिक् सोसायटी" त काम करीत होतेच. त्यामुळें मुंबईच्या शाळेची स्थिति शंकररावांना बहुतेक माहीत होतीच. अर्थात् त्याच शाळेच्या धर्तीवर पुण्यास एकादी इंग्रजी शाळा स्थापन करावी असे विचार त्यांच्या मनांत येऊं लागले. याच दिशेनें विचार करणारी रानडे, भांडारकर, भट, भिडे वगैरे दुसरी मंडळी पुण्यास होतीच. अर्थात् या सर्व मंडळीमध्यें सदहू विषयासंबंधानें वरचेवर चर्चा होऊं लागली. सुदैवानें त्यांना पुढें थोड्याच दिवसांनीं एक उत्तम साहाय्यकर्ता लाभला. व त्याच्या उत्तेजनानें व मदतीनें मंडळीच्या उद्योगास मग लवकरच यश येण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. हा साहाय्यकर्ता म्हणजे प. वा. सर विल्यम वेडर्बर्न हे होत. हे त्यावेळीं पुण्यासच होते. व त्यांच्याशीं आमच्या वरील मंडळींनीं बराच खल केल्यावर पुण्यास एक मुलींची इंग्रजी शाळा स्थापन करण्याचा बेत मुक्रर झाला. मुलींना मराठी शिकविण्याची व्यवस्था पूर्वीच झाली होती. पण त्यांच्या बुद्धीचा विकास होऊन त्यांना उपयुक्त ज्ञान प्राप्त करून घेण्याकरितां इंग्लिश शिक्षणाची जरूर होती. सबब वरील मंडळींनीं पुण्यास एक 'Maharashtra Female Education Society नांवाची संस्था स्थापन करून तिच्या आश्रयानें एक मुलींची इंग्रजी शाळा 'High School for Indian Girls" काढण्याचा संकल्प केला. या सर्व कामांत रा. ब. पंडितांनींच पुढाकार घेतला होता. सदहू संस्थेनें आरंभिलेला कार्यभार उचलण्याकरितां जी कमिटी नेमली होती तिचे रा. ब. पंडित हे सेक्रेटरी होते. याप्रमाणें सर्व तयारी होतांच सन १८८४ च्या जुलै तारीख १४ रोजीं पुण्यांतील रहिवाशी

लोकांची एक जाहीर सभा भरविण्यांत येऊन पुण्यास मुलींची इंग्रजी शाळा स्थापन करण्याचें नक्की ठरलें. सभेचें अध्यक्षस्थान सदर्हू सर विल्यम वेडर्बर्न यांनीं मंडित केलें होतें. या सर्व कामास स्वतः वेडर्बर्न साहेबांनीं मोठ्या उदार मनानें दहा हजार रुपयांची देणगी दिली होती. व मुंबईचे गव्हर्नर साहेब सर जेम्स फर्ग्युसन व हिंदुस्थानचे व्हाइसरॉय लॉर्ड रिपन यांनीं प्रत्येकीं एक एक हजार रुपये अशी वर्गणी दिली होती. सभेचें काम उत्तम प्रकारें पार पडलें. व त्या योगानें मुलींच्या इंग्लिश शाळेची योजना सर्वांस पसंत पडली हें सिद्ध झालें. या कामास पुण्यांतील कांहीं जुन्या मंडळींचा विरोध नव्हता असें नव्हे. पण एकंदरींत सर्व समंजस जनता अनुकूल होती हें स्पष्ट दिसत होतें. त्याच प्रमाणें सदरील शाळेस गुजराथेंतील व महाराष्ट्रांतील बऱ्याच संस्थानिकांची मदत मिळाली व सुमारें लाख दीड लाख रुपयेपर्यंत फंड गोळा झाला. त्यांत स्वतः रा. ब. शंकर पांडुरंग पंडित यांनीं तीन हजार रुपये वर्गणी घातली! याप्रमाणें सभेचें काम झाल्यावर लोकांचें एक डेप्युटेशन त्या वेळचे गव्हर्नर साहेब सर जेम्स फर्ग्युसन यांची भेट घेण्याकरितां गेलें व त्या मार्गानें त्यांनीं सरकारची सहानुभूति संपादन केली. व सन १८८४ च्या सप्तंबर महिन्यांत पुण्यास मुलींची इंग्रजी शाळा "Female High School" स्थापन करण्यांत आली. शाळा हुजूरपागेंत उघडण्यांत येऊन तिचें आजपर्यंत काम उत्तम रीतीनें चाललें आहे.

पुढच्याच सालीं म्हणजे सन १८८५ मध्यें सदर्हू शाळेंतील वार्षिक परीक्षांत पास झालेल्या मुलींना बक्षिसें वांटण्याचा समारंभ झाला. त्यावेळीं जी एक क्षुल्लक गोष्ट घडली, तिला कित्येक उपद्यापी मंडळींकडून भलतेंच स्वरूप देण्यांत येऊन त्याबद्दलचे शंकरराव पंडितांवर शिंतोडे उडविण्याची खटपट झाली. परतु त्यांत परमेश्वरकृपेनें त्या मंडळीच्या अपेक्षेप्रमाणें त्यांस यश न येतां तो सर्व खटाटोप फसला! आतां त्या गोष्टीचें विशेष महत्त्व राहिलें नाहीं; परंतु त्यावेळीं जी मूठभर आमची सुशिक्षित व कर्तबगार मंडळी होती ती कांहीं बड्या लोकांच्या डोळ्यांत कशी सलत असे व त्यामुळें ते बडे लोक त्यांच्या प्रत्येक लहान मोठ्या कृतीकडे कसे डोळ्यांत तेल घालून वक्र दृष्टीनें पाहात असत, हेंच त्या सर्व प्रकरणावरून विचार करण्यासारखें आहे.

त्या प्रसंगीं जो खरा प्रकार घडला तो असा होताः सदहू बक्षिससमारंभ ता. २९ सप्टेंबर सन १८८५ रोजीं झाला. त्यावेळीं मुलींना बक्षिसें वांटण्याचें काम बडोद्याचे श्रीमंत सयाजीराव गायकवाड महाराज यांनीं करण्याचें कबूल केलें होतें. समारंभाच्या कार्यक्रमाविषयीं कमिटींत पूर्वीच पुष्कळच चर्चा होऊन तो ठरविण्यांत आला होता. व त्याप्रमाणें सर्व समारंभ निर्वेधपणें पार पडला असता. परंतु त्यावेळचे शिक्षणखात्याचे मुख्य अधिकारी मिस्टर लीवॉर्नर साहेब यांनीं निष्कारण मध्यें पडून सर्व कामाचा बिघाड केला. तो असा. समारंभाचे दिवशीं सकाळीं लीवॉर्नर साहेबांनीं कमिटीच्या कचेरींत येऊन असें सुचविलें कीं, समारंभाच्या कार्यक्रमपत्रिकेंतील राष्ट्रगीत म्हणतांना सभेंतील एकूणएक मंडळींनीं इंग्लिश पद्धतीप्रमाणें उभें राहिलें पाहिजे. साहेब-बहादुरांना त्याच वेळीं कळविण्यांत आलें कीं, हिंदी लोकांना (त्यावेळच्या) इंग्लिश पद्धतीची माहिती नाहीं व कार्यक्रमांत असलेलें राष्ट्रगीताचें गाणें मराठींत निराळ्या चालीवर म्हटलें जाणार असल्यामुळें तें केव्हां म्हटलें जाणार हें युरोपीअन लोकांस समजणार नाहीं. अर्थात् त्यामुळें कांहीं लोक उभे राहतील व कांहीं उभे राहणार नाहींत आणि या योगानें समारंभांत थोडासा घोटाळा होईल. असला प्रकार घडूं नये म्हणून कार्यक्रमांतून तें राष्ट्रगीत गाळूनच टाकावें असेंही कमिटीनें आयत्या वेळींही सुचविलें; परंतु समारंभ चालला असतांना लीवॉर्नर साहेबांनीं सगळा कार्यक्रम पुरा झाला पाहिजे असें निक्षून सांगितलें, त्याअर्थी इंग्रजी गीत ज्या मुलींना येत होतें अशा मुलींनीं तें म्हटलें व कार्यक्रम पुरा केला. सभेंतील मंडळींनीं, गीतगान चालू असतांना उभें राहण्याच्या संबंधानें कमिटींतील सभासदांनीं अटकळ केल्याप्रमाणेंच एकंदरींत प्रकार झाला. म्हणजे कांहीं लोक उभे राहिले, कांहीं राहिले नाहींत!

परंतु प्रकरण एवढ्यावरच थांबलें नाहीं. मुंबईच्या "टाइम्स ऑफ इंडियानें"—किंवा त्याच्या पाठीमागें दुसरा कोणी सूत्रें हालविणारा होता तें देव जाणें!—आपल्या ता. ३-१०-८५ च्या अंकांत एक कडक लेख लिहून या प्रकरणाला राईचा पर्वत करून अत्यंत कटु स्वरूप आणलें! समारंभास मुंबईच्या गव्हर्नरच्या कार्यकारी कौन्सिलचे त्या वेळचे सभासद मिस्टर पील व मिस्टर मेल्व्हिल, "डायरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन" या नात्यानें मिस्टर लीवॉर्नर, मिस्टर

कर्केहॅम, प्रिन्सिपाल वर्डस्वर्थ वगैरे युरोपीअन गृहस्थ हजर होते. या गोष्टीचा उल्लेख करून—किंबहुना या बड्या अंमलदारांना उद्देशूनच—" टाइम्स "नें आपला लेख लिहिला होता. त्याचा तात्पर्यार्थ असा होताः—" समारंभाचा कार्यक्रम छापून तयार होता व त्यांत राष्ट्रगीत समाविष्ट करण्यांत आलें होतें. परंतु त्याच्या प्रती सभेंत वाटण्यांत येत असतांनाच कोणी पुण्याच्या ब्राह्मणानें तें गीत मुद्दाम खोडून टाकलें व तें कार्यक्रमांतून गाळलें. लीवॉर्नर साहेबांनीं त्याबद्दल तिकडच्या तिकडेच निषेध केला आणि तें गीत सभेंत म्हटलें पाहिजे असें चालकांस बजावून सांगितलें. तेव्हांच चालकांनीं आपला हेका सोडला, त्यापूर्वी सोडला नाहीं. इतकेंच नाहीं, तर लीवॉर्नर साहेबांनीं गाण्याच्या पेटीजवळ जाऊन " राष्ट्रगीत म्हटलें पाहिजे " असें पुन्हां बजावून सांगितलें, तेव्हांच तें म्हणण्यांत आलें. दोघे सरकारी मुख्य अधिकारी–पील व मेल्व्हिल—सभेंत हजर असतांना राष्ट्रगीत कार्यक्रमांतून गाळण्यांत आलें ही गोष्ट दृष्टीआड करून चालावयाचें नाहीं.

हा लेख टाइम्समध्यें प्रसिद्ध होतांच रा. ब. शंकर पांडुरंग पंडित, रा. ब. नारायणभाई दांडेकर यांचें–कमिटीचे सेक्रेटरी या नात्यानें लिहिलेलें–उत्तर त्याच पत्राच्या ता. ५–१०–८५ च्या अंकांत प्रसिद्ध झालें. त्यांत त्यांनीं प्रथमच असभ्यपणाचा व अराजनिष्ठेचा आक्षेप अगदीं निराधार व खोटा आहे असें दर्शविलें होतें. व पुढें त्यांनीं सांगितलें कीं, कार्यक्रमांत राष्ट्रगीत जें प्रथम घालण्यांत आलें होतें तें कमिटीनेंच आपण होऊन घातलें होतें. लीवॉर्नर साहेबांनीं त्यांत ढवळाढवळ करण्याचें मनांत न आणतां ते स्वस्थ बसले असते तर सर्व कार्यक्रम मूळ ठरल्याप्रमाणें सुसूत्रपणें पार पडला असता. त्यांनीं, राष्ट्रगीत म्हटलें जात असतांना सर्वांनीं उभें राहिलें पाहिजे अशी जरा सक्तीची सूचना केल्यामुळेंच पुढील सर्व घोंटाळा झाला! या सर्व प्रकाराविषयीं मुंबईच्या " नेटिव्ह ओपिनियन " पत्रानें त्याच वेळीं (१-११-८५) रोजीं मत दिलें तेंच बरोबर होतें. तें मत असें:–" परवां (पुण्यास उद्भवलेल्या) न्याशनल अँथेम प्रकरणांत तर साहेबांनीं (लीवॉर्नर यांनीं) आपल्या गडबड्या स्वभावाचें चीज करून घेतलें!" पण सेक्रेटरींनीं केलेला हा खुलासा अधिकारी मंडळीला पटला नाहीं! त्यांना आलेल्या संधीचा फायदा घेऊन कोणाचा तरी बळी घ्यावयाचा होता व त्याप्रमाणें

त्यांनीं केलें. या संबंधाचा विस्तार पुढें आलाच आहे, पण या प्रकरणाचा सर्व बाजूंनीं विचार करून त्यावेळच्या (ता. २६-१०-८५) इंदुप्रकाशानें जो निष्कर्ष काढला तो मात्र अगदीं बरोबर होता. तो असा :

१. कांहीं बड्या अधिकारी मंडळींना पुण्याच्या लोकांवर अराजनिष्ठेचें खापर फोडावयाचें होतें हें उघड दिसतच होतें. त्यांना ही आयती संधि मिळाली !

२. आपल्या मनाप्रमाणें कांहीं करावयाचें असलें म्हणजे राईचा पर्वत कसा करावा हें इंग्लिश लोकांस चांगलेंच कळतें ! तसेंच त्यांनीं या प्रसंगीं केलें आहे.

३. आमचें म्हणणें कितीही खरें असलें तरी तें खरें नव्हे ! राज्यकर्त्यांना वाटतें तेंच खरें !

४. आम्हांस अन्नपाण्याची गरज असली तर खरें–खोटें, बरें–वाईट, मान–अपमान या सर्व गोष्टी गुंडाळून ठेवून राज्यकर्ते म्हणतील तें खरें असें म्हणण्यास आम्ही तयार झालें पाहिजे !

५. सार्वजनिक कामें करणें तीं बेताबातानें हात राखून केलीं पाहिजेत. अति करूं नये, असे दिवस आले आहेत. काळमाहात्म्य आहे ! दुसरें काय ?

सदहू प्रकरणाचा अधिकारी मंडळीमध्यें बराच खल होऊन थोड्याच दिवसांनीं मग रा. शंकरराव पंडित यांना त्यांच्या "ओरिएंटल ट्रान्स्लेटर" च्या जागेवरून–सस्पेंड –दूर करण्यांत आलें. ही बातमी प्रसिद्ध होतांच सर्वांनाच अत्यंत वाईट वाटलें. अशा प्रकारच्या लोकमताचें इंदुप्रकाशांत (ता. २६-१०-८५) चांगलेंच प्रतिबिंब उमटलेलें होतें. त्यांत * असें म्हटलें होतें कीं, खरें पाहिल्यास घडलेली

---

*Altogether the incident was too trifling for Government to take any notice of. That it should terminate so harmfully to an officer of such tried ability and distinguished services as Mr. S. P. Pandit, is highly deplorable. Let us hope, Government will still see their way to reconsider their decision.

हकीकत ही मुंबई सरकारनें त्यांत हात घालण्याइतकी महत्त्वाची मुळींच नाहीं. त्यांतूनही त्याचा अखेर परिणाम रा. ब. पंडितांसारख्या अत्यंत हुशार, विद्वान् व कर्तबगार कामगाराचें नुकसान करण्यांत व्हावा हें अत्यंत शोचनीय होय. अद्यापि सरकार आपल्या धोरणाचा फिरून विचार करील अशी आम्हांस आशा आहे.''

सदरील प्रकारामुळें मुंबईंत लोकांमध्यें मोठी खळबळ उडून गेली व पुढारी लोकांचें एक डेप्युटेशन गव्हर्नर साहेब लॉर्ड रे यांची भेट घेण्याकरितां गेलें. त्यांत रा. ब. रानडे, नामदार तेलंग वगैरे मंडळी होती. या खटपटीचा तावडतोब कांहीं उपयोग झाला नाहीं. पण रा. ब. पंडितांची मुंबईच्या हायकोर्टांतील—अपेलेट बाजूस—डेप्युटी रजिस्ट्रारच्या जागीं बदली करण्यांत आली; परंतु पंडित त्या जागेवर रुजू झाले नाहींत. त्यांनीं सन १८८५ डिसेंबरपासून दोन वर्षांची रजा घेतली.

शंकरराव पंडित हे स्वभावानें फार मानी गृहस्थ होते. ते आपलें काम चोख रीतीनें करीत असत व सहसा कोणाच्या वाटेस जात नसत. त्यामुळें वरील प्रकारें त्यांची स्वतःची कोणतीही चूक नसतां त्यांची निष्कारण मानहानि झाली ही गोष्ट त्यांच्या मनास फारच लागून राहिली. सबब त्यांचे जिवलग मित्र रा. ब. महादेव गोविंद रानडे यांनीं पंडितांना आपल्या बरोबर चार सहा महिने फिरावयास नेलें होतें. रानड्यांची त्यावेळीं सरकारकडून "फायनॅन्स कमिटी"त नेमणूक झाली होती. त्यामुळें त्यांना सर्व हिंदुस्थानदेशभर फिरावयाचें होतें. अर्थात् पंडितांना बरोबर घेतल्यास त्यांच्या मनास जरा बरें वाटेल व कदाचित् कमिटीबरोबर आपलें सिमल्यास जाणें झाल्यास पंडितांची त्यावेळचे व्हाइसरॉय लॉर्ड डफरिन यांच्याशीं मुलाखत घडून येईल व बऱ्याच गोष्टींचा खुलासा होईल असें रानड्यांस वाटलें व त्यांनीं पंडितांना बरोबर घेतलें. त्याप्रमाणें रानड्यांबरोबर पंडितांचें सिमल्यास जाणें झाल्याबरोबर त्यांना व्हाइसरॉय साहेबांची गांठ घेण्याची संधि मिळाली व तिचा उपयोग करून त्यांनीं राष्ट्रगीताच्या बाबी-संबंधानें आपल्यादृष्टीनें बराच खुलासा केला. हा प्रकार घडल्यामुळें पंडितांच्या मनाची अस्वस्थता जरा कमी झाली असें स्पष्ट दिसून आलें. सन १८८७ च्या

डिसेंबरमध्यें शंकरराव पंडित हे रजेवरून परत आल्यावर त्यांची अहमदनगरला हुजूर डेप्युटी कलेक्टराच्या जागीं नेमणूक झाल्याप्रमाणें ते नगरला जाऊन आपल्या कामावर रुजू झाले. ते तेथें सुमारें तीन वर्षे होते. सन १८९० मध्यें लॉर्ड रे यांची मुदत संपल्यामुळें ते विलायतेस निघून जाण्याच्यापूर्वी त्यांनीं पंडितांना काठेवाडांतील पोरबंदर संस्थानच्या ॲडमिनिस्ट्रेटरच्या जागीं नेमलें व मग ते इंग्लंडला गेले. सारांश, पुण्याचें फीमेल हायस्कूल स्थापन करण्याच्या कामीं शंकरराव पंडितांनीं अतिश्रम घेतले होते. परंतु पुढच्याच सालीं ( १८८५ मध्यें ) एका क्षुल्लक कारणावरून त्यांच्यावर कांहीं बड्या लोकांचा रोष होऊन त्यापासून पंडितांना फार त्रास झाला. तथापि रा. ब. रानडे, सर रेमंड वेस्ट व नामदार तेलंग यांच्यासारख्या पंडितांच्या मित्रांच्या साहाय्यानें त्यांच्याविषयींच्या कांहीं बड्या लोकांच्या मनांत उत्पन्न झालेल्या संशयाचें निरसन झालें व त्यासंबंधानें उठलेलें वादळ शांत झालें !

हुजूरपागेंतील मुलींची शाळा स्थापन करण्याच्या कामीं रा. ब. पंडितांचा इतका प्रत्यक्ष संबंध असूनही त्यासंबंधाचें स्मरण ताजें राखण्याचें त्या शाळेंत कांहींएक साधन नसावें हें आश्चर्य आहे ! एकदां हिंगण्याच्या प्रसिद्ध श्री. पार्वतीबाई आठवले या हुजूर पागेंतील मुलींची शाळा पाहण्याकरितां गेल्या होत्या. व नंतर थोड्याच दिवसांनीं पुण्याच्या कन्याशाळेंत एक व्याख्यान देत असतांना त्यांनीं हुजूरपागेंतील शाळेंत दिसून आलेल्या कांहीं गोष्टींचा सहज उल्लेख केला. त्यांत त्यांनीं म्हटलें कीं, ज्या शाळेच्या स्थापनेच्यावेळीं रा. ब. शंकर पांडुरंग पंडित यांनीं इतके श्रम घेतले होते त्या शाळेंत त्यांचें एकादें चित्र किंवा तसबीर नसावी हें आश्चर्यकारक होय ! यासंबंधांत मुंबईस सुमारें पांच वर्षांपूर्वी घडलेल्या एका गोष्टीचा उल्लेख केल्यास अप्रस्तुत होईल असें वाटत नाहीं. मुंबईच्या रॉयल एशियाटिक सोसायटीचे संस्थापक सर जेम्स मॅकिंटॉश यांचें एक चित्र त्या सोसायटीच्या वाचनालयांत प्रमुख ठिकाणीं लटकविण्याचें सभासदांनीं सन १९२९ सालीं ठरविलें. त्याचवेळीं डॉ. भाऊ दाजी व पंडित भगवानलाल इंद्रजी या दोन विद्वान् सभासदांच्या तसबिरीहि लावण्याचें ठरलें. व त्या विद्वानांच्या चहात्यांकडून शक्य तर त्यासाठीं वर्गणी मिळवावी असा विचार झाला. कांहीं गुजराथी मंडळींनीं पंडित भगवानलाल

इंद्रजी यांचें चित्र सोसायटीला नजर करण्याचें ठरविलें. तसेंच मुंबईचे प्रसिद्ध प्रो. गर्जेंद्रगडकर व प्रो. वेलणकर यांनीं डॉ. भाऊ दाजी यांच्या एकाद्या चित्राकरितां वर्गणीच्या रूपानें खटपट चालविली. ही गोष्ट मुंबईचे प्रसिद्ध दानशूर गृहस्थ कै. श्रीमंत शांताराम नारायण दाभोळकर यांना समजतांच त्यांनीं सदर्हू प्रोफेसरद्वय यांचे श्रम वांचवून व स्वतः रुपये ८०० खर्चून डॉ. भाऊ दाजी यांचें एक सुंदर चित्र तयार करविलें व तें त्यांनीं सदरील सोसायटीस देणगी म्हणून दिलें ! असा एकादा दानशूर अभिमानी गृहस्थ किंवा वरील दोन प्रोफेसरांसारखे कळकळीचे गृहस्थ पुण्यास निघून हुजूरपागेंतील मुलींच्या शाळेंतील उणीव भरून काढतील काय ?

---

## प्रकरण पंधरावें

# सामाजिक सुधारणा

रा. ब. पंडित हे खरेखुरे समाजसुधारक असून त्यांचे विचार या बाबतींत फार पुढें गेलेले होते. त्यांच्या वेळीं म्हणजे सुमारें पन्नाससाठ वर्षांपूर्वी सामाजिक सुधारणेसंबंधाचे मुख्य प्रश्न कोणते होते, याविषयींचें मागील प्रकरणांत थोडें दिग्दर्शन झालेलेंच आहे. त्या सर्वांचा “ स्त्रीवर्गाची स्थिति सुधारणें ” व “ जातिभेदांतलें शल्य काढून टाकण्याचा यत्न करणें ” या दोन गोष्टींत अन्तर्भाव होतो. त्यांपैकीं पहिल्यांत स्त्रियांचें अज्ञान दूर करणें, बालविवाहाची रूढी; पुनर्विवाहाची बंदी; सतीची चाल इत्यादि बाबींचा समावेश होतो. व दुसऱ्यांत जातीजातींतील अंतर कमी करण्याचे यत्न करणें व अस्पृश्य जातींचा उद्धार करण्याची खटपट करणें या बाबी मोडतात. तिसरा परदेशगमनासंबंधाचा प्रश्न होता. त्याचें आतां महत्त्व राहिलें नाहीं. पण पन्नासवर्षांपूर्वी त्या प्रश्नाचें फार महत्त्व होतें. वरीलपैकीं, वस्तुतः पुष्कळच बाबींचें प्रस्तुत काळांत महत्त्व कमी झालें आहे याचें मुख्य कारण हें कीं, त्या सुधारणा, आतां बहुतेक अमलांत आल्या आहेत. स्त्रीशिक्षणाचा पुष्कळ प्रसार झाला आहे–अद्याप होत आहे; त्यामुळें बालविवाहाचा प्रश्न आपोआपच सुटत

आहे. हल्लीं उच्च वर्णीय जातींत लहान वयांत लग्नें बहुतेक होतच नाहींत. विधवाविवाहाचें पाऊल पुढेंच पडत आहे. स्त्रीशिक्षणाच्या प्रसारामुळें अलीकडे दुसरे मार्ग विधवावर्गाला मोकळे झाले आहेत व आज शेंकडों विधवा मास्तरणी, नर्सेस, डॉक्टरणी होऊन चांगल्या मानानें रहात आहेत. सतीची चाल तर कायद्यानेंच सरकारनें बंद केली आहे. सारांश, देशांत आणि त्यांतूनही महाराष्ट्रांत सामाजिक दृष्टीनें गेल्या पन्नास वर्षांत मोठी क्रांति झाली आहे.

मागसलेल्या म्हणून मानलेल्या जाती देखील अलीकडे आपल्यामध्यें अनेक प्रकारच्या सुधारणा घडवून आणण्याचा आपणच प्रयत्न करीत आहेत हें फार स्तुत्य आहे; व त्यांच्यामध्यें शिक्षणाचा बराच प्रसार झाल्यामुळें त्यांपैकीं आतां पुष्कळ लोक शिकून वकील, बॅरिस्टर, डॉक्टर वगैरे प्रतिष्ठित प्रकारचे धंदे करीत आहेत. तात्पर्य, हल्लींच्या स्थितींत व अर्धशतकापूर्वींच्या स्थितींत वास्तविक जमीनअस्मानाचें अंतर पडलें आहे. अर्थात्, त्यावेळीं सामाजिक दृष्टीनें देशांतील स्थिति किती बिकट होती, व ती सुधारण्याच्या उद्योगास लागणाऱ्या माणसांच्या मार्गांत किती अडचणी होत्या, व इतकेंही असून त्या वेळच्या समाजसुधारकांनीं किती धैर्यानें त्या अडचणींशीं टक्कर देऊन आपलें सुधारणेचें काम फत्ते केलें, याबद्दलची कल्पना हल्लींच्या लोकांस होणार नाहीं. त्या वेळच्या सामाजिक स्थितीचें सोपपत्तिक विवेचन डॉ. भांडारकरांनीं आपल्या "Social History of India" (हिंदुस्थानचा सामाजिक इतिहास) या निबंधांत फार सुंदर रीतीनें केलें आहे. त्याचप्रमाणें तें सर नारायण चंदावरकरांच्या "Forces at work" (चालू असलेलीं कारणें) या मथळ्याखालील लेखमालेंत (Times of India, 1886) आलेलें आहे. त्याचा आज इकडे विस्तार करण्याचें प्रयोजन नाहीं. परंतु सामाजिक दृष्टीनें आमच्या देशास इतकी अवनत दशा कां प्राप्त झाली याबद्दलचें डॉ. भांडारकरांनीं ठरविलेलें निदान व ती स्थिति सुधारण्याचे उपाय याविषयींचें त्यांनीं आपल्या पूर्वोक्त निबंधांत केलेलें विवरण खरोखर विचार करण्यासारखें आहे. त्यांत डॉ. भांडारकर शेवटीं विषयाचा समारोप करतांना म्हणतात कीं, हिंदुस्थान देशाला जो अनुभव आला तोच पाश्चात्य राष्ट्रांसहि कमीअधिक प्रमाणानें आला होता असें इतिहासावरून स्पष्ट दिसतें. उदाहरणार्थ,

कांहीं कांहीं पाश्चात्य देशांत देखील जातिभेदाचें बीज होतें. रोम शहरांतील बडेलोक व सामान्य लोक (Patricians and Plebians) यांच्यामध्यें पूर्वी शरीरसंबंध होत नसत. तसेंच ग्रीक किंवा जर्मन लोकांचे संबंध रशियन लोकांशीं घडून येत नसत. पण हे सर्व भेदाभेद पुढें त्या राष्ट्रांत राष्ट्रीयभावना (National feeling) उत्पन्न झाल्यामुळें आपोआप बुजून गेले ! फार लांब कशाला, आमच्या अगदीं शेजारचें राष्ट्र जपान, याचेंच उदाहरण घ्या. त्या देशांत गेल्या ५०–६० वर्षांत अश्रुतपूर्व क्रांति झाली आहे; याचें मुख्य कारण म्हणजे त्या देशांत उत्पन्न झालेली राष्ट्रीय भावना. आमचें कमनशीब असें कीं, अशा प्रकारची राष्ट्रीयभावना आमच्या देशांत–त्याच्या विस्ताराच्या मानानें मोठ्या प्रमाणावर –आजवर कधींच उत्पन्न झाली नाहीं. त्यामुळें हा भेदाभेदाचा मोठा वृक्ष वाढून त्यानें आपली गर्द छाया आज सर्व देशावर पाडली आहे ! याचा परिणाम असा झाला आहे कीं, आमच्या लोकांत सरसहा राष्ट्रीय भावनेची वाढ होणेंच जवळजवळ अशक्य झालें आहे ! आणि प्रेम, परस्परविश्वास, सहानुभूति वगैरे आपल्यामधील सात्त्विक भावनांच्या व्यापाराचें क्षेत्र अगदीं आकुंचित झालें आहे. या सार्‍याचा एकंदरींत परिणाम काय झाला आहे हें गुरुवर्य भांडारकरांनीं आपल्या वरील निबंधांत उपसंहार रूपानें मोठ्या कळकळीनें सांगितलें आहे. त्यांतून अगदीं थोडीं वाक्यें इकडे देतों:–

“ राष्ट्रीय दृष्टीनें जे आम्ही कैक शतकांपूर्वी उतरंडीला लागलों ते खालीं खालीं येऊन आम्ही प्रस्तुतच्या अवनत स्थितीप्रत पोहोंचलों आहोंत ! या सर्व गोष्टींचा आपण काळजीपूर्वक विचार करूं लागलों कीं, मनापुढें असा सहज प्रश्न उभा राहतो कीं, असा वर्षेंचीं वर्षें एकसारखा वाढतच जाणारा, सर्व दृष्टींनीं आमच्या राष्ट्राचा र्‍हास कां व्हावा ? या प्रश्नाचें उत्तर एवढेंच कीं, आमचें राष्ट्र शतकेंच्या शतकें जणूं एका अत्यंत जड ( जुलुमाच्या ) जोखडाखालीं सांपडलें गेल्यामुळें त्याचें सर्व नैतिक सामर्थ्य नष्ट झालें आहे,......... मध्यंतरीं गेल्या हजार दीड हजार वर्षांत देशांत निरनिराळे धर्मपंथ उत्पन्न झाले हें खरें. पण त्या धर्मस्थापकांनीं जातिभेदांतील दोष काढून टाकण्याचे दुर्दैवानें प्रयत्न केलेले दिसत नाहींत ! त्यामुळें लोकांच्या धर्मबुद्धीचा विकास झाला तरी सामाजिक दृष्टीनें आम्ही होतों तेथेंच राहिलों आहोंत ! आतां

प्रस्तुत: आम्ही सुदैवानें एका सुधारलेल्या राज्यांत असल्यामुळें देशांत हरएक दृष्टीनें नवीन मन्वंतर सुरू झालें आहे व त्यायोगें लोकांत विचारजागृति सुरू झाली आहे. या गोष्टी खऱ्या असल्या तरी आम्ही अद्यापि पुरे जागे झालों आहों असें म्हणतां येत नाहीं. आमची सदसद्विवेकशक्ति अजून पूर्ण जागृत झाली नाहीं व समाजांतील अन्यायमूलक गोष्टी आम्ही अद्याप झुगारून देण्यास तयार झालों नाहीं ! फार काय, पण सत्य, न्याय, या तत्त्वांच्या भक्कम पायावर आम्ही राष्ट्र या नात्यानें ताठ व वर मान करून उभें राहण्यास अद्याप समर्थ झालों असें प्रामाणिकपणें म्हणतां येणार नाहीं. तें कांहींहि असो, पण एक गोष्ट स्पष्ट आहे: आम्ही हा सामाजिक दृष्टीनें चालू असलेला अवनत स्थितीचा–अधोगतीचा–प्रवाह थांबविल्याशिवाय आमचें राष्ट्र वर डोकें काढील हें शक्य नाहीं ! ”

लोकमान्य टिळक हे सामाजिक बाबतींत डॉ. भांडारकरांचे प्रतिपक्षी होते ही गोष्ट प्रसिद्ध आहे. पण त्यांनीं एका प्रसंगीं प्रकट केलेले देशाच्या सामाजिक तसेच राजकीय स्थितीसंबंधींचे विचार व वर नमूद झालेले डॉ. भांडारकरांचे विचार यांत विलक्षण प्रकारचें साम्य दिसून येतें. टिळकांनीं सन १८९५ मध्यें मे ता. १८ च्या केसरींत “ चीन व जपान ” या लेखांत पुढील प्रमाणें उद्गार काढले आहेत:—

“ हिंदुस्थान देशांतील लोकांस जपाननें जो धडा घालून दिला आहे त्याचें महत्त्व लहानसान नाहीं. चिनी लोकांसारखेच हिंदुस्थानांतील लोकही हुशार व समजूतदार आहेत; पण त्यांसही चिनी लोकांसारखी निद्रेची फार आवड आहे ! हिंदुस्थानांतील लोकांचाही आळस इतका आहे कीं, तोंडावर पडलेलें जांभूळ देखील दुसऱ्यानें आंत ढकलावें लागतें ! चिनी लोकांस जपाननें जसें हल्लीं हालवून जागें केलें आहे तसेंच आम्हांसही एका शतकापूर्वी दुसऱ्यांनीं हालवून जागें केलें आहे. परंतु आम्ही अद्यापपर्यंत पूर्ण जागे झालों किंवा नाहीं याची शंकाच आहे. ……… सामाजिक, राजकीय व औद्योगिक अशा पुष्कळ गोष्टी आपणांस करावयाच्या आहेत, त्या आम्ही जपानचा किता वळविल्यास आमच्या हातून होतील; अन्य उपायांनीं होणार नाहींत. ह्या कालांत जीवनकलह मोठ्या निकरानें चालला आहे. त्या कलहांत आम्ही सावध रीतीनें

गुंतलों नाहीं, व *समोंवतालच्या वस्तुस्थितीस अनुसरून वागलों* नाहीं तर आमचा शेवटीं ऱ्हासच होणार आहे. धर्मसंबंधीं अथवा सामाजिक दुराग्रहास आम्ही बळकट धरून बसलों, व आम्हांस हितकर असणाऱ्या ज्ञानाचा आमच्या मनांमध्यें आग्रहानें प्रवेश होऊं दिला नाहीं तर आम्हांस उन्नतावस्था कधींही येणार नाहीं. जपानी लोकांसारखा आम्ही दुराग्रह सोडला, सावधपणानें वागलों व जेथें सांपडेल तेथें ज्ञानामृतपान केलें तर आमचे सर्व दोष नष्ट होऊन एकजुटीनें वागण्याची, अधिकारास मानण्याची, व मनास इष्ट आळा घालण्याची, साहस व उद्योग करण्याची पात्रता आमच्या अंगीं सहजच येणार आहे. युरोपीअन राष्ट्रें ज्या मार्गानें आजपर्यंत चालत आलीं आहेत, त्या मार्गाचें इष्ट असेल तेथें अवलंबन केल्यास आमचा तरणोपाय आहे, असें प्रत्यक्ष नाहीं तरी परंपरेनें जपानी लोकांनीं आम्हांस दाखविलें आहे. तेव्हां चिनी लोकांचें आम्ही अनुकरण केलें तर आमच्यावर एकादा दुर्धर प्रसंग येऊन आम्हांसही प्रखर तडाखा खावयाची पाळी येणारी आहे."

भांडारकर व टिळक या दोन गृहस्थांनीं निरनिराळ्या वेळीं व्यक्त केलेले विचार यांचें आम्हीं मनांत जरूर मनन केलें पाहिजे व त्याप्रमाणें आम्ही गेल्या चाळीस—१८९५ पासून—वागत आलों कीं काय हेंहि पाहिलें पाहिजे.

रा. ब. शंकरराव पंडित हे कट्टे व कर्ते सुधारक होते, हें मागें सांगितलेंच आहे. सुधारकमंडळीमध्यें त्यांचें स्थान कोठें होतें हें पुढील उताऱ्यांवरून स्पष्ट दिसून येईल. हे उतारे नगरचे रा. धनेश्वर यांच्या लेखांतून घेत आहों :—

"पोहणाऱ्या माणसाला ज्याप्रमाणें जलौघाला न जुमानतां स्वबलावर तीरावर जावें लागतें, त्याप्रमाणें सुधारकाला जनरूढीची परवा न करतां उद्दिष्ट साधावयाचें असतें. अशा रीतीचें उद्दिष्ट डोळ्यांपुढें ठेवून समाजसुधारणेचें कार्य करणाऱ्यांपैकीं शंकरराव एक प्रमुख होते. ज्या जनरूढीमुळें समाजाचा ऱ्हास झाला आहे आणि होत आहे, त्यांचें उच्चाटन मोठ्या शौर्यानें केलें पाहिजे, अशा मताचे रा. ब. पंडित होते. जिच्या योगानें आपल्या प्रगतीला अडथळा होत असेल ती रूढि दुष्ट आणि घातक समजावी व तिच्या उच्छेदाला लागावें हेंच खऱ्या सुधारकाचें कर्तव्य आहे." "एकदां एकत्र लग्नसराईत पंचावन्न वर्षांच्या एका वृद्ध गृहस्थाचें

लग्न एका बारा वर्षांच्या कुमारिकेशीं होणार आहे ही फार निंद्य गोष्ट आहे, ही बातमी सांगण्यासाठीं कांहीं सुधारणाप्रिय तरुण मंडळी त्यांजकडे (पंडितांकडे) गेली असतां त्यांनीं जे उद्गार काढले त्यांवरून शंकरराव हे कोणत्या प्रतीचे सुधारक होते हें दिसून येतें. ते म्हणाले, "असा बालावृद्ध विवाह होणें खरोखरच अनिष्ट आहे असें जर तुम्हांला वाटत असेल तर तो न होईल अशी तुम्ही पराकाष्ठा करा! हा केवळ अन्याय होत आहे अशी जर तुमच्या मनाची बालंबाल खात्री असेल, तर तो न होऊं देणें आपलें पवित्र कर्तव्य आहे, अशी भावना मनांत बाळगून परिणामाकडे लक्ष न देतां त्याचा प्रतिकार करा! तुमची दांडगाईची कृति कायद्यानें दोषार्ह आणि शिक्षेला पात्र ठरेल ह्या भीतीनें कर्तव्य पराङ्मुख होऊं नका! प्रसंगविशेषीं तुरुंगांत जाण्याची पाळी आली, तरी फिकीर नाहीं, परंतु सदसद्विवेकबुद्धीनें न्याय्य ठरविलेलें कार्य करण्याला कसर करूं नका."

शंकरराव पंडितांना सामाजिक सुधारणेविषयीं वाटत असलेली आस्था वरील सारख्या त्यांनीं वेळोवेळ काढलेल्या उद्गारांतच केवळ व्यक्त झालेली आढळते असें नसून त्यांचें वर्तनही या उद्गारांना अनुरूप असेंच असे. स्त्रियांना शिक्षण देऊन त्यांचा दर्जा सामाजिक दृष्टीनें वाढविण्याच्या कामीं त्यांनीं केवढी खटपट केली होती हें मागील प्रकरणांत पुण्याच्या फीमेल हायस्कूलविषयींच्या दिलेल्या हकीकतीवरून स्पष्ट झालेंच आहे. त्याचप्रमाणें ते अहमदनगरला असलेल्या मुदतींत जी व्याख्यानमाला सुरू करण्यांत आली होती त्यांत "व्याख्यात्या" या नात्यानें स्त्रियांचाही समावेश व्हावा अशी, त्या वेळच्या दृष्टीनें नवीनच, प्रथम सूचना पुढें आली, त्यावेळीं शंकररावांचें त्या गोष्टीला मनापासून पाठबळ होतें. स्वतः त्यांच्या कुटुंबांतील बायकांच्या शिक्षणाकडेही पंडितांचें पूर्ण लक्ष असे. त्यामुळें त्यांच्या कुटुंबांतील सर्वच स्त्रिया सुशिक्षित आहेत. त्याचप्रमाणें त्यांच्या कुटुंबांतील बहुतेक सर्वच मुलांचीं व मुलींचीं लग्नें बालपणीं न होतां मोठेपणींच झालेलीं आहेत. शंकरराव यांचें पहिलें कुटुंब जेव्हां निवर्तलें तेव्हां एकाद्या कुलीन अशा गतभर्तृका विधवेशीं विवाह करण्याची त्यांची फार इच्छा होती. व त्याप्रमाणें त्यांनीं सहा महिने पर्यंत वर्तमानपत्रांतून जाहिरात देखील दिली होती. परंतु पुनर्विवाहाला तयार अशी कोणीच

विधवा त्यावेळीं पुढें आली नाहीं. सबब त्यांनीं सोलापूर येथील हायस्कूलचे त्या वेळचे हेडमास्तर रा. रा. रामचंद्र गणेश नाईक यांच्या मुलीशीं विवाह केला. आपल्या मताप्रमाणें शंकररावांना पुनर्विवाह जरी करतां आला नाहीं तरी त्यांनीं एका सुशिक्षित व प्रौढ वयाच्या मुलीशीं विवाह केला हें त्यांतल्या त्यांत चांगलेंच झालें. ही गोष्ट सन १८७८ सालीं घडली.

सन १८७४ सालीं शंकरराव हे प्राच्यभाषापरिषदेकरितां विलायतेस गेले होते. तिकडून परत आल्यावर त्यांनीं त्यावेळच्या साधारण वहिवाटीप्रमाणें प्रायश्चित्त घेतलें नाहीं हें वाचकांना न सांगतांही कळण्यासारखें आहे ! त्याचप्रमाणें त्यांचे धाकटे बंधु सीतारामपंत हेही विलायतेस जाऊन बॅरिस्टर होऊन आले होते. त्यांनींही समुद्र पर्यटण करून आल्याबद्दल प्रायश्चित्त घेतलें नाहीं. म्हणजे शंकरराव पंडितांच्यावेळीं सामाजिक सुधारणेच्या ज्या मुख्य बाबी स्त्रीशिक्षण, बालविवाह, विधवाविवाह व परदेश गमन, त्यांसंबंधानें त्यांनीं बहुमोल कामगिरी केली होती, इतकेंच नव्हे तर त्या सुधारणा त्यांनीं स्वतःच्या कुटुंबाच्या बाबतींत अमलांतही आणल्या होत्या.

दुसरी एक महत्त्वाची गोष्ट इकडे सांगितली पाहिजे. त्यावरून शंकरराव हे किती उदारमनस्क होते व ते आपल्यास पटलेल्या सुधारणेच्या बाबतींत किती अंतःकरणपूर्वक झटत असत हें चांगलेंच निदर्शनास येतें. त्यावेळीं अहमदनगरला एक महारांची शाळा होती. पंडित हे नगरला हुजूर डेप्युटि कलेक्टर होते त्या मुदतींत ते वरचेवर त्या महारांच्या शाळेंत जाऊन तेथील मुलांना शिकवीत असत. शाळेंत जाऊन शिकविणें हें पंडितांचें काम नसतांना त्यांच्यासारख्या बड्या हुद्देदार गृहस्थांनीं आपण होऊन शाळेंत—आणि तेंही महारांच्या शाळेंत—सवडीप्रमाणें वरचेवर जाऊन तेथील मुलांस शिकविण्यांत कांहीं काळ घालवावा, यावरून त्या मागसलेल्या लोकांच्या उन्नतीविषयीं शंकररावांना वाटत असलेली कळकळ तर व्यक्त होतेच, पण तो सर्व प्रकार पाहून लोकांनाही आश्चर्य व आदर वाटावा यांत नवल नाहीं. लौकिक दृष्टीनें मोठ्या हुद्द्यावर असणारा माणूस, क्षणभर आपला हुद्दा बाजूस ठेवून, मनाचा खरा थोरपणा व्यक्त करून महारांसारख्या हलक्या म्हणून मानलेल्या लोकांच्या उन्नतीकरितां जातीनें जाऊन इतकीं खपणारीं माणसें आपल्याकडे

फार थोडीं सांपडतील ! " त्या महारांच्या शाळेचे हेडमास्तर त्यांच्या ( पंडितांच्या ) कळकळीविषयीं मोठ्या भक्तीनें उद्गार काढीत असत " असें रा. धनेश्वर आपल्या लेखांत म्हणतात.

नगरला असतांना पंडितांनीं आणखी एक महत्त्वाची कामगिरी केली. ती म्हणजे त्या शहरांत दरवर्षी होणाऱ्या शिमग्यांतील बीभत्स प्रकाराला पूर्ण आळा घालून तो बंद केला ही होय. याबद्दलची मुंबईस हल्लीं हल्लींच–म्हणजे सुमारें वीस वर्षांपूर्वी सर नारायण चंदावरकर यांच्या पुरस्कर्तृत्वाखालीं–चळवळ सुरू झाली आहे. पण त्याच्याही पंचवीस वर्षांपूर्वी रा. ब. पंडितांनीं नगरास असतांना तिकडे तशी चळवळ सुरू केली होती. एका वर्षी शंकररावांनीं अहमदनगर शहरांतील निरनिराळ्या पेठांत जाऊन लोकांच्या गांठी घेऊन व तसेंच तिकडील शाळांतील शिक्षकांना भेटून शिमग्यांतील बीभत्स प्रकाराविरुद्ध त्यांचीं मनें वळविलीं. हुजूर डेप्युटी कलेक्टरसारखे मोठे गृहस्थ स्वतः एकाद्या साधारण माणसाप्रमाणें घरोघर फिरून लोकांस उपदेश करूं लागल्यावर त्यांचीं मनें वश व्हावीं व त्या उपदेशाचा त्यांवर उत्तम परिणाम व्हावा यांत मुळींच आश्चर्य नाहीं. अर्थात् पंडितांच्या प्रयत्नांस यश आलें. त्यांनीं मग मुलांना बीभत्स प्रकारापासून परावृत्त करण्याकरितां एक " शिमगा प्रदर्शन " भरविलें ! या सर्व उपक्रमाचा असा सुपरिणाम झाला कीं, नगरचें उदाहरण पाहून इतर ठिकाणचे लोक देखील त्याचें अनुकरण करूं लागले असें रा. धनेश्वर सांगतात.

एकंदरींत पन्नास वर्षांपूर्वी आमच्या देशापुढें सामाजिक सुधारणेचे कोणते प्रश्न होते व ते प्रश्न सोडविण्याच्या कामांत रा. ब. पंडित हे कसे अंतःकरणपूर्वक व धैर्यानें झटत असत हें वरील विवेचनावरून स्पष्ट झालेंच आहे. वस्तुतः समाजसुधारकांच्या प्रयत्नामुळें पन्नास वर्षांपूर्वीच्या स्थितींत व हल्लींच्या स्थितींत जरी जमीनअस्मानाचें अंतर पडलें आहे, तरी बारकाईनें विचार केल्यास आमचे लोक–डॉ. भांडारकर व लो. टिळक या दोघांनीं म्हटल्याप्रमाणें--अद्यापि पूर्णपणें जागे झाले आहेत असें म्हणतां येत नाहीं. उदाहरणार्थ, अस्पृश्यतानिवारणाचाच प्रश्न घ्या. या प्रश्नाचें खरें महत्त्व जनतेच्या हल्लीं हल्लींच कोठें नजरेस येत चाललें आहे. आणि याचें मुख्य कारण देशाची राजकीय परिस्थिति ! खरें पाहिल्यास ज्याअर्थी त्या अस्पृश्य वर्गांशीं आमचें आजपर्यंतचें वर्तन

अन्यायाचें होतें त्याअर्थी आम्हीं आतां तरी त्यांच्याशीं बंधुत्वाच्या नात्यानें वागलें पाहिजे ही उदार भावना फार थोड्या लोकांच्या ठिकाणीं असते. नोकरशाहीचे लोक आपल्या मतलबाकरितां त्या वर्गांना पुढें करीत असतात म्हणून व त्या वर्गांना आम्ही जवळ न केल्यास त्यांना मुसलमान किंवा ख्रिस्ती लोक आपल्या गोटांत ओढण्यास तयार असतात म्हणून आम्ही आतांशा कोठें त्यांची अस्पृश्यता घालविण्याच्या खटपटीस लागलों आहोंत. शिवाय आपली स्थिति सुधारण्याबद्दलची खुद्द त्या वर्गांतील लोकांमध्येंच अलीकडे जागृति उत्पन्न झाली आहे. त्यामुळें वरिष्ठ जातींच्या हिंदूंना प्रस्तुत तो प्रश्न हातीं घेणें भागच पडलें आहे. वास्तविक तो प्रश्न अद्याप कायमचा सुटला आहे असें नाहीं. कारण वाटेंत पूर्वग्रह, दुराग्रह व कित्येक ठिकाणीं अज्ञानमूलक समजुती या अडचणी आहेत, व त्या दूर होण्यास कांहीं दिवस लागणारच. तथापि सर्व समंजस लोकांस सदहू प्रश्नाचें महत्त्व पटत चाललें आहे व त्यामुळें तो आतां थोड्या दिवसांत पूर्णपणें सुटण्याचीं चिन्हें स्पष्ट दिसत आहेत याबद्दल शंका नाहीं.

दुसरा प्रश्न स्त्रियांच्या दर्जासंबंधाचा. खरें पाहिल्यास स्त्रीवर्गाविषयीं अलीकडेच कांहीं सुशिक्षित लोकांच्या ठिकाणीं उदार भावना उत्पन्न झाल्या आहेत ही गोष्ट खरी, तरी देखील कित्येकांच्या तद्विषयक अनुदार कल्पना अद्यापि कायम असून ते स्त्रियांच्या पाठीमागचीं बंधनें कमी करण्यास तयार नसतात ! सतीची चाल किंवा कांहीं प्रांतांतील कन्यावधाची चाल असल्या अमानुषपणाच्या चाली हल्लीं कायद्याच्या सक्तीमुळें प्रचारांत नाहींत हें खरें आहे; परंतु एक बायको मेली तर दुसरी, ती मेली तर तिसरी, किंवा एक बायको हयात असतांनाही दुसरी केलेले, अथवा एकाच वेळीं दोन पेक्षां अधिक बायका असलेले असे कित्येक सुशिक्षित लोक देखील अद्याप दृष्टीस पडतात हें कांहीं खोटें नाहीं. कांहीं ठिकाणीं तर एका पुरुषाच्या डझनांनीं मोजतां येतील इतक्या लग्नाच्या बायका असतात हें प्रसिद्ध आहे ! असा खरा प्रकार असूनही एकादी आठ किंवा दहा वर्षांची मुलगी दैववशात् विधवा झाली तर तिला मात्र दुसरा विवाह करूं देण्यास आम्ही तयार नसतों ! या प्रकारांतला उघड उघड दिसून येणारा अन्याय न समजण्या इतके आम्ही सुशिक्षित लोक अगदीं विचारशून्य झालों आहों असें नव्हे.

पण धर्माची म्हणा, समाजाची म्हणा, किंवा रूढीची म्हणा मनावर जी शत-केंची शतकें पकड बसली आहे ती सैल करण्याची आमची तयारी नाहीं किंवा तशी आमच्यांत शक्ति नाहीं! काय आश्चर्य पाहा, वैदिककालीं व उपनिषत्कालीं स्त्रियांचा फारच उच्च दर्जा होता, इतकेंच नव्हे तर कित्येक स्त्रिया चांगल्या विदुषी व ब्रह्मवादिनी होत्या. बौद्धकाळीं देखील स्त्रियांची स्थिति चांगली असून कित्येक स्त्रियांनीं बौद्धधर्मावर ग्रंथ लिहिले आहेत. फक्त बौद्धधर्माचा ऱ्हास होऊन पुढें जेव्हां हिंदुधर्माचें पुनरुज्जीवन झालें तेव्हां मग स्मृत्यादि ग्रंथ, पुराणें, उप-पुराणें वगैरे झालीं आणि तेव्हांपासून स्त्रियांचा सामाजिक दर्जा कमी झाला; व तीच स्थिति अद्याप चालू आहे! एवढी मोठी स्त्रियांच्या बाबतींत क्रांति–अप-क्रांति म्हणा हवीतर!–होण्याचें कारण म्हणजे एकदां पेशवाईंतील प्रसिद्ध रामशास्त्री प्रभुणे यांनीं सांगितल्याप्रमाणें आमचीं धर्मशास्त्रें जेव्हां रचिलीं गेलीं तेव्हां त्या शास्त्रकारांमध्यें एखादी स्त्री नव्हती! अर्थात् स्त्रियांच्या सोयीगैरसोयींकडे स्मृतिकारांचें तेवढें लक्ष पोंचलें नाहीं आणि पुरुषांच्या सुखसोयींची मात्र पूर्ण तरतूद करण्यांत आली! तें कसेंही असलें तरी, स्त्रियांच्या बाबतींत आम्ही आपला दृष्टिकोन बदलून अधिक उदार भावनेनें वागून त्यांचें जीवित सुखमय करण्या-करितां झटण्याची खचित वेळ आली आहे.

आणखी एका गोष्टीचा उल्लेख करून हें प्रकरण संपवूं. हल्लीं बदललेल्या परि-स्थितीमुळें देशांत ठिकठिकाणीं राजकीय किंवा सामाजिक परिषदा भरत असतात. त्या त्या प्रसंगीं अनेक जातींचे लोक कांहीं दिवस ऐकमेकांशीं मोकळेपणानें वागत असतात व एके ठिकाणीं जेवणखाण करीत असतात. पण तेच लोक परिषदांचें काम आटपून परत फिरल्यावर आपापल्या गांवीं त्याच उदार भावनेनें एकमे-कांशीं अगर अन्य जातींच्या लोकांशीं वागतात काय? दुसरें उदाहरण, हल्लीं अभ्यासाच्या अगर व्यापारधंद्याच्या निमित्तानें आमच्या देशांतील बरेच लोक इतर देशांत–उदाहरणार्थ इंग्लंडांत–जाऊन कित्येक वर्षें राहात असतात. तिकडे ते राजकीय, सामाजिक वगैरे अनेक संस्था स्थापन करीत असतात. व तशा प्रकारचीं सार्वजनिक कामें करीत असतांना त्यांना खाण्याजेवण्याचे अनेक प्रसंग येत असतात. त्या त्या प्रसंगीं ते लोक आपले सर्व–जातींसंबंधीं अगर धर्मासंबंधीं–भेदभाव एका बाजूस ठेवून एकमेकांशीं अगदीं मोकळेपणानें

वागत असतात, हें प्रसिद्ध आहे. पण तेच लोक परत हिंदुस्थानांत आल्यावर एकमेकांशीं अगर अन्य जातींच्या लोकांशीं इंग्लंडांतल्याप्रमाणेंच उदार-भावनेनें वागतात काय ? तिसरें उदाहरण, हल्लीं मोठमोठ्या शहरांमधून पूर्वी-सारखे जातिनिर्बंध पाळले जात नसतात हें सर्वविश्रुत आहे. मुंबईपुण्या-सारख्या ठिकाणीं तर खाणावळींतून व क्लबांतून जातपात कोणीच पाळीत नाहींत. मुकटा नेसून कोणी खरोखरीच जेवीत असले तर ते अगदींच थोडे असतील; ते अपवादादाखल समजण्यास हरकत नाहीं. पण शहरांच्या ठिकाणीं अशा मोकळेपणानें वागणारे लोक आपल्या गांवीं परत गेल्यावर एकमेकांशीं, भिन्नजातीय लोक एकाच गांवचे असल्यास, तशाच उदार भावनेनें वागतात काय ? या सर्व प्रश्नांचीं नकारार्थीच उत्तरें द्यावीं लागतील असें आमच्या अल्प अनुभवावरून तरी आम्हांस वाटतें. असाच इतर पुष्कळ लोकांचाही अनुभव असल्यास असा प्रश्न सहज उत्पन्न होतो कीं, वरील सर्व प्रकार म्हणजे शिंगें मोडून वासरांत शिरण्यासारखा नव्हे काय ? जेवण्याखाण्यास आम्ही विशेष महत्त्व देतों अगर मनुष्याचे सर्व व्यवहार केवळ जेवण्याखाण्यावरच चालतात असें आम्हीं मानतों असें नव्हे. पण प्रस्तुतकाळीं देशांतील असंख्य जातींच्या व भिन्न संस्कृतींच्या लोकांमध्यें परस्परविश्वास, परस्परप्रेम उत्पन्न करण्याकरितां जे उद्योग चालू आहेत त्यांत क्षुल्लक बाबींना भलतेंच महत्त्व देण्यांत येऊन, बिघाड होऊं देऊं नये, इतकेंच आमचें म्हणणें आहे. मुख्य गोष्टी म्हणजे आमच्या ठिकाणीं खरी राष्ट्रीय दृष्टि उत्पन्न झाली पाहिजे. ही उत्पन्न झाली म्हणजे अर्थात् ब्राह्मण–ब्राह्मणेतर, हिंदु–मुसलमान, दक्षिणी–गुजराथी मराठी–कानडी या भेदमूलक कल्पनांचें महत्त्व कमी होतें व बंधुत्वाचें नातें दृढावतें. या कामीं आम्हां हिंदवासी लोकांना प्रस्तुत इंग्लिश लोकांच्यासारखें दुसरें उदाहरण मिळणार नाहीं ! सन १९१४ सालीं युरोपांतील महायुद्धाच्या वेळीं इंग्लंडमधील कॉन्सर्व्हेटिव्ह–लिबरल, रॅडिकल–लेबर, इंग्लिशमन–स्कॉच –आयरिश असे सर्व पक्षाचे लोक आपल्या देशावरील सर्वांनाच बाधणारें संकट निवारण करण्याकरितां कसे, आपापसांतील तंटे बाजूस ठेवून, एक झाले हें तर सर्वांना माहीत आहेच. त्याहीपेक्षां अलीकडचें उदाहरण म्हणजे चार वर्षांपूर्वी राष्ट्रा-वरील आर्थिक आपत्ति टाळण्याकरितां मजूरपक्षांतील लोक–त्यांतही रामसे

मॅकडोनाल्ड माजी मुख्य प्रधानासारखा मुत्सद्दी कांहीं थोड्या लिबरल मंडळींना घेऊन–कॉन्सर्व्हेटिव्ह पक्षाला मिळाले व अखेर एक राष्ट्रीय मंत्रिमंडळ बनविण्यांत आलें, हें होय. सदर्हू निरनिराळ्या पक्षांच्या मूलभूत तत्त्वांसंबंधीं, किंवा तीं राष्ट्रीय मंत्रिमंडळ रचतांना कितपत पाळण्यांत आलीं यासंबंधीं इकडे चर्चा नको. मुख्य संस्मरणीय गोष्ट म्हणजे देशकार्याकरितां सर्व पक्ष एक झाले हीच होय. आणि त्यांतूनही मिस्टर रामसे मॅकडोनाल्ड यांनीं–सदरील महत्कार्याकरितां–आपल्या म्हटलेल्या मजूर पक्षाची इतराजी–यापुढें मजूर पक्षाचे मुख्य प्रधान होण्याची यांना आशाच नाहीं असें म्हणतात !—पत्करण्यास तयार व्हावें आणि मिस्टर बाल्ड्विन यांनीं, पूर्वी मुख्य प्रधानपद उपभोगिलें असून, व या खेपेस पार्लमेंटमध्यें अश्रुतपूर्व संख्याबल अनुकूल असतांनाही तिकडे दुर्लक्ष करून मुख्य प्रधानाच्या हाताखालीं दुय्यम स्थान पत्करण्यास तयार व्हावें या दोन गोष्टींचें काय वर्णन करावें ! हा इंग्लंडांतला प्रकार पाहिला आणि त्याबरोबरच आमच्या देशांत—मुसलमान लोकांनीं आपले चवदा मुद्दे धरून बसावें, शीखांनीं आपले सतरा मुद्दे पुढें आणावे, युरोपीअन लोकांनीं आपल्या व्यापारास बाध येतां कामा नये असा आग्रह धरावा, इतरांनीं अशाच आपल्या मागण्या पुढें कराव्या आणि हिंदूंनीं वरील सगळ्या कुंपणांतून आपला बचाव कसा करून घ्यावा या विवंचनेंत असावें, हा नित्य चाललेला प्रकार पाहिला म्हणजे खऱ्या राष्ट्रीय भावनेपासून आम्ही अद्याप किती दूर आहों हें स्वच्छ नजरेपुढें उभें राहातें आणि मन अत्यंत विषण्ण होतें ! डॉ. भांडारकरांच्या व लो. टिळकांच्या लेखांतून दोन उतारे वर दिलेच आहेत. त्यांत त्यांनीं "आमचे लोक अद्यापि पूर्ण जागे झाले नाहींत" अशा अर्थाचे जे निरनिराळ्या वेळीं उद्गार काढले होते ते आजमितीलाही कसे तंतोतंत लागू पडतात हें दाखविण्याकरितां हा इतका थोडासा विस्तार केला आहे.

---

## प्रकरण सोळावें

# प्रार्थनासमाज

मुंबईच्या प्रार्थनासमाजाशीं रा. ब. शंकरराव पंडित यांचा अत्यंत निकट संबंध होता व त्यांनीं समाजाची बहुमोल सेवा केली आहे. प्रार्थनासमाजासंबंधाची सर्व सविस्तर हकीकत आमच्या डॉ. भांडारकरांच्या चरित्रांत–प्रकरण अठरा यांत–दिली आहे. तिची इकडे पुनरुक्ति करण्याचें आम्हांस कारण दिसत नाहीं. पंडित हे जसे सामाजिक बाबतींत कट्टे सुधारक होते तसेच ते धर्माच्या बाबतींत निष्ठावंत सुधारक होते. त्यांचा चालू हिंदुधर्माच्या कर्मकांडावर मुळींच विश्वास नव्हता. त्यांनीं सन १८७८ मध्यें आपला द्वितीय विवाह केला तो त्यांनीं प्रार्थनासमाजाच्या त्यावेळीं तयार असलेल्या विवाहविधीप्रमाणें केला. त्याचप्रमाणें सन १८७९ सालीं प्रार्थनासमाजाच्या तत्त्वांप्रमाणें सोळा संस्कारांचें एक पुस्तक तयार करण्याकरितां जी एक कमिटी नेमण्यांत आली होती, त्यांत शंकरराव पंडित हे होते. सर्व बाबतींत धर्माचें अनुष्ठान राखलें पाहिजे असें ह्यांचें मत होतें.

सन १८६७ सालीं प्रार्थनासमाजाची स्थापना झाल्यादिवसापासून त्याच्या पद्धतींविषयीं किंवा मतांविषयीं पुष्कळ लोकांनीं आक्षेप घेतले आहेत, व त्यावेळीं समाजाच्या पुरस्कर्त्यांपैकीं कोणी तरी त्या आक्षेपांचें निरसन केलें आहे. हें टीकाकारांना उत्तरें देण्याचें काम न्या. मू. रानड्यांनीं तसेंच डॉ. भांडारकरांनीं व रा. ब. पंडितांनींहि केलें आहे. विशेषेंकरून रा. ब. देशमुख, रा. ब. नीळकंठ जनार्दन कीर्तने व केसरीकार ( कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर ) यांच्या धर्मसंबंधीं आक्षेपांस डॉ. भांडारकरांनीं दिलेलीं समर्पक उत्तरें त्यांच्या धर्मपर लेखांत नमूद आहेत. त्यांपैकीं शास्त्रीबोवांच्या एका विचित्र आक्षेपाचा इकडे उल्लेख करणें अप्रस्तुत होणार नाहीं. प्रार्थनासमाजांतील उपासनांना स्त्रीपुरुषांनीं एकत्र जमणें हें शास्त्रीबोवांना पसंत नव्हतें. प्रार्थनासमाजासंबंधीं हा आक्षेप घेणें म्हणजे त्या समाजास कोठून तरी नांवें ठेवण्याच्या प्रवृत्तीचेंच प्रदर्शन करणें होय. कारण तो आक्षेप घेतांना शास्त्रीबोवा हे स्वतः हिंदु असूनही आमच्या देवळांतून वेळोवेळ होणाऱ्या कथापुराणांना स्त्रीपुरुषांनीं एकत्र

जमण्याची प्राचीन काळापासून वहिवाट चालत आली आहे ही गोष्ट विसरले होते ! या व अशा दुसऱ्या आक्षेपांस डॉ. भांडारकरांनीं दिलेलीं उत्तरें वाचण्यासारखीं आहेत.

सन १८७९ सालीं प्रार्थनासमाजाच्या उत्सवाच्या प्रसंगीं शंकरराव पंडितांनीं उपक्रमोपासना चालविली. त्यावेळीं त्यांनीं कांहीं आक्षेपांस उत्तर दिलें. त्याचा थोडक्यांत सारांश असा; " कोणी म्हणतात, हिंदुस्थान देशांत भक्तीचे अनेक प्रकार आहेत. मग ही प्रार्थनासमाजाची अगर ब्राह्मसमाजाची नवीन व परदेशीय टूम कशास हवी ? याचें उत्तर इतकेंच कीं, हा प्रकार नवीनही नाहीं व परदेशीयही नाहीं ! सामाजिक उपासनेची पद्धत आमच्या देशांत प्राचीनकाळीं चालू होती हें वेदांतील अनेक वचनांवरून सिद्ध करून देतां येण्यासारखें आहे. कण्वकुलांतील व गौतमकुलांतील लोकांनीं आपल्या देवतेची एकत्र जमून उपासना केली याविषयीं वेदांत प्रमाण मिळतें. श्राद्धसमयीं कुटुंबांतील सर्व माणसांनीं एकत्र जमणें हाही एक सामाजिक उपासनेचाच प्रकार आहे. घरांतल्या देवाच्या मूर्ती तिकडेच ठेवून देवळांतील देवास एकत्र जाऊन त्याचें दर्शन घेणें हाही एक सामाजिक उपासनेचाच प्रकार आहे. पंढरपूरसारख्या क्षेत्राच्या ठिकाणीं यात्रा जमतात, तिकडे भजनें, कीर्तनें वगैरे चालू असतात; हाही तसाच प्रकार आहे. मग प्रार्थनासमाजानें अगर ब्राह्मसमाजानें खरें पाहिल्यास नवीन असें कांहींच केलें नसून पूर्वींच्याचेंच पुनरुज्जीवन केलें असें सिद्ध होत नाहीं काय ? पण एवढ्यानेंच आम्ही कृतकृत्य झालों असें मात्र समजतां कामा नये. आम्ही फक्त आठवड्यांतून एक वेळ जमून उपासना करीत असतों; पण एवढ्यानें कार्यभाग होण्याजोगा नाहीं. आम्ही पूर्वी त्रिकाल संध्या करीत होतों, तसें आतां झालें पाहिजे. म्हणजे आम्ही कोठेंही असलों तरी परमेश्वराची त्रिकाल उपासना झाली पाहिजे. तरच आमचें जीवन धर्ममय होण्यास मदत होईल."

याप्रमाणें पंडितांनीं अनेकदां प्रार्थनासमाजाविरुद्ध आलेल्या आक्षेपांचें निरसन करून समाजाची बहुमोल सेवा केली आहे. शंकररावांनीं सन १८८० सालीं ब्राह्मसमाजासंबंधीं केल्या गेलेल्या आक्षेपांच्या निरसनार्थ एक अत्यंत विस्तृत व सुश्राव्य व्याख्यान दिलें. व शेवटीं समारोप करतांना त्यांनीं पुढील अर्थाचे संस्मरणीय असे उद्गार काढले. " सर्व धर्मांविषयीं आम्हांस आदर आहे व सर्व

धर्मांचे ग्रंथ हे आमचेच होत असेंही आम्हांस साभिमानपूर्वक म्हणतां येतें. कारण सर्वांतील जें सत्य त्याचा आदरपूर्वक स्वीकार करावयास आम्ही सिद्ध असतों. तथापि आपल्या धर्मपुस्तकांत तीं प्रमेयें असलीं तर त्यांतूनच तीं आमच्या लोकांपुढें ठेविलीं असतां अधिक लवकर मनावर परिणाम करितात व त्यांचेविषयीं आपलेपणा उत्पन्न होतो. आणि आपल्या पुरातन धर्मग्रंथांनीं महत्कार्य केलेलें आहे; लक्षावधि जनांस धर्माची गोडी लावली आहे. यासाठीं सर्व धर्मग्रंथांचें आस्थापूर्वक अध्ययन करून त्यांतील सत्य ग्रहण करण्याची व आपल्या ग्रंथांतील तींच प्रमेयें लक्षांत घेऊन असा सार्वत्रिक धर्म लोकांपुढें आपल्या वळणास अनुकूल अशा रीतीनें ठेवणें हें आपलें कर्तव्य आहे."

शंकरराव यांचा उत्साह मोठा दांडगा असे. व त्यांच्या मनास निराशा ही कधींच शिवली नाहीं. प्रार्थनासमाजानें पहिल्या अकरा वर्षांत काय काय केलें याविषयीं बोलतांना त्यांनीं एकदां पुढील अर्थाचे उद्गार काढलेः—"शेंकडों आणि हजारों वर्षांपासून आपल्या हतभाग्य देशबांधवांना जरी धर्मसंबंधीं, जनव्यवहारसंबंधीं आणि राज्यसंबंधीं जें सत्य त्याचें यथार्थ दर्शन झालें होतें, तथापि आपल्या लोकांनीं त्या सत्यदर्शनापासून लाभ करून न घेतां ते अयोग्य मार्गी प्रवृत्त झाले. … …खरें काय आणि खोटें काय याविषयीं आम्हांस कधींच ज्ञान प्राप्त झालेलें नाहीं अशा रीतीनें आमची प्रवृत्ति झालेली आहे,…….या दहा वर्षांत आम्ही काय केलें या प्रश्नाचें उत्तर जरी समाधानकारक रीतीनें देतां येत नाहीं तरी तें कार्य करणें आपलें कर्तव्य आहे. तें सत्य आहे अशी जर आमच्या मनाची खात्री आहे तर त्याविषयीं आपण निराश होण्याचें कारण नाहीं. अशा प्रकारचीं कार्यें सिद्धीस जाणें म्हणजे जगाचा इतिहास पहातां, एका जन्माचें काम नाहीं. त्याला अनेक जन्म लागतात. परंतु आम्हीं जिवंत आहोंत तोंपर्यंत आम्ही कार्यसिद्धीकरितां झटलों तर आमचे पुत्रपौत्रादि तेंच काम पुढें चालवितील. पुत्रपौत्रादि आपली पुढची पिढी होते, हें आपलें दुसरें जन्मच समजलें पाहिजे. अशीं जन्मांतरें होऊन आपलें कार्य तडीस गेलें तर त्याला फार दिवस लागले असें म्हणतां येणार नाहीं…..जर कार्य खरें आणि ईश्वरास प्रिय आहे तर तें सिद्धीस नेण्यास ईश्वराला मोठमोठीं साधनें लागत नसतात. तो यःकश्चित् लोकनिंदित व दुर्बल अशा साधनांनींही तें सिद्धीस नेतो

ह्याविषयीं जगाच्या इतिहासांत पुष्कळ उदाहरणें सांपडतील..........तरी आम्ही निरुत्साह न होतां ईश्वरावर भार घालून उत्साहानें व आस्थेनें अप्रतिहत रीतीनें व्यासंग करीत राहिलें पाहिजे."

याप्रमाणें शंकरराव पंडितांचे अत्यंत उन्नत प्रकारचे विचार असल्यामुळें प्रार्थनासमाजाचें कार्य करीत असतांना ते कधीं स्वतः निरुत्साह होत नसत व बरोबरच्या लोकांना निरुत्साह होऊं देत नसत. त्यामुळें त्यांच्या हातून समाजाची झालेली सेवा बहुमोल आहे यांत शंका नाहीं. आणखी एक गोष्ट सांगण्याची राहिली. शंकररावांची प्रार्थनासमाजाच्या धर्मावर वर सांगितल्याप्रमाणें अत्यंत निष्ठा असे तरी ते इतरांच्या धर्मसमजुतींविषयीं सहिष्णु ( tolerant ) असत. त्यामुळें ते स्वतः समाजाचे आस्थेवाईक सभासद होते तरी ते आपल्या आप्त-मंडळींवर समाजाचे सभासद होण्याबद्दल सक्ति करीत नसत. त्यांच्या नातलगांचा परिवार मोठा असे व ते त्या सर्वांना मदत करीत असत. पण धर्माच्या बाबतींत त्यांनीं कधींच कोणावर सक्ति केली नाहीं. त्यामुळें त्यांच्या नातलगांपैकीं कांहीं थोडे प्रार्थनासमाजाचे सभासद झाले, बाकी कोणी झाले नाहींत.

हा भाग संपविण्यापूर्वी प्रार्थनासमाजाच्या हातून महाराष्ट्राची एकंदरींत जी अमूल्य सेवा झाली आहे, तिजविषयीं चार शब्द लिहावे हें योग्य दिसतें. आम्ही स्वतः त्या समाजाचे सभासद नसल्यामुळें—आम्ही फक्त त्याचे हितचिंतक आहों—पुढील ओळी लिहितांना आम्हांस पक्षपात करण्याचें कारण नाहीं. जें खरेंखुरें दृष्टीस पडतें तेंच लिहितों. प्रार्थनासमाज आज अडसष्ट वर्षे अस्तित्वांत आहे. त्याच्या मतांचा प्रसार त्याच्या अस्तित्वाच्या मानानें फार झाला नाहीं असें कित्येक लोक म्हणतात हें आम्हांस माहीत आहे. हल्लीं कित्येक वर्षांत समाजाचें संख्याबल म्हणण्यासारखें वाढलें नाहीं व त्यावरून वरील म्हण-ण्यात कांहीं तथ्य आहे असें सकृद्दर्शनीं वाटतें हें कबूल केलें पाहिजे. पण धर्मप्रसाराच्या कामीं ही—संख्याबल वाढण्यासंबंधाची—कसोटी उपयोगी नाहीं. धर्मासंबंधानें विचार करतांना जनतेच्या दृष्टींत फरक पडला आहे किंवा नाहीं; किंबहुना लोकांना—निदान सुशिक्षित लोकांना—धर्मसंबंधीं उदार दृष्टीनें विचार करण्याची संवय लागत चालली आहे किंवा नाहीं व त्याप्रमाणें त्यांचें वर्तन घडत आहे किंवा नाहीं, हेंच मुख्यतः बारीक नजरेनें पाहिलें पाहिजे, एवढी एक गोष्ट

लक्षांत ठेविली तर भांडारकर, रानडे, मोडक, पंडित यांच्या अनुयायांना, त्यांच्या शिकवणीपासून झालेल्या परिणामाबद्दल निराशेचे उद्गार काढण्याचें कारण आहे असें आम्हांस वाटत नाहीं. विचारशील लोक सामान्यतः धर्मसंबंधीं उदार दृष्टीनें विचार करीत आहेत. फार काय, पण खुद्द विष्णुशास्त्री चिपळूणकर—ज्यांनीं सुमारें पन्नास वर्षांपूर्वी प्रार्थनासमाजावर ( कोणत्याही हेतूनें असो ) आपलें टीकाशास्त्र उचललें होतें—हे देखील खरेखुरे एकेश्वरी मताचे ( म्हणजे प्रा. स. च्या मताचे ) होते असें त्यांच्या चरित्रांत स्पष्ट सांगितलेलें आहे. त्याच प्रमाणें आतां साधारणतः जुन्या कर्मकांडावरील लोकांचा विश्वास उडत चालल्याचें स्पष्ट दिसत आहे. प्रार्थनासमाजाच्या सभासदांच्या संख्येंत भर पडली नाहीं तरी समाजाच्या वार्षिक उत्सवाच्या वेळीं मंदिरांत उपासनांकरितां व कीर्तनाच्या प्रसंगीं लोकांची गर्दी होत असते. अर्थात् भांडारकर, रानडे यांच्या शिकवणीपासून लोकांच्या मनावर परिणाम झाला नाहीं असें कोणासही म्हणतां येणार नाहीं; व प्रार्थनासमाजाचें कार्य यशस्वी झालें नाहीं असें मुळींच सिद्ध होत नाहीं.

दुसरी गोष्ट, गेल्या सुमारें पन्नास वर्षांत देशांत सामाजिक सुधारणेबाबतची जी महत्त्वाची व जंगी चळवळ झाली व जिच्यायोगानें देशभर—विशेषेंकरून महाराष्ट्रांत—सामाजिक दृष्टीनें मोठी क्रांति झाली आहे, तिचे मुख्य प्रवर्तक प्रार्थनासमाजाचे अध्वर्यु हेच होते ही गोष्ट दृष्टिआड करून चालावयाचें नाहीं. चाळीस किंवा पन्नास वर्षांपूर्वी सामाजिक सुधारणेच्या बाबतींत लोकांकडून भांडारकर, रानडे यांना झालेला विरोध, व सोसावा लागलेला छळ, या गोष्टी जुन्या झाल्या असल्या तरी इतक्यांत विसरल्या जाणें शक्य नाहीं. इतर गोष्टी क्षणभर सोडल्या तरी सामाजिक दृष्टीनें स्त्रीवर्गाचा दर्जा वाढविणें व निकृष्ट जातीच्या लोकांची सुधारणा करणें या बाबतची हल्लींची चळवळ प्रथम इकडे भांडारकर, रानडे व त्यांचे साहाय्यक यांनींच सुरू केली. अर्थात् देशांत सामाजिक दृष्टीनें जी क्रांति झाली आहे तिजबद्दलचें श्रेय वरील महापुरुषांच्या श्रमालाच, म्हणजे परंपरया प्रार्थनासमाज या संस्थेलाच दिलें पाहिजे.

तिसरी गोष्ट, आमच्या मराठी वाङ्मयक्षेत्रांत ज्यांनीं संस्मरणीय कामगिरी केली आहे त्यांत प्रार्थनासमाजाचे कांहीं सभासद यांचें स्थान बरेंच उच्च आहे.

शंकरराव पंडित यांनीं तयार केलेली तुकारामाची गाथा, बृहद्दशम, वेदार्थयत्न इत्यादि ग्रंथांसंबंधीं मागें उल्लेख आलाच आहे. डॉ. भांडारकरांचीं मराठी साहित्य शास्त्रावरील व्याख्यानें, त्याचप्रमाणें त्यांचे धर्मपर लेख व व्याख्यानें हीं पुस्तकें प्रसिद्ध आहेत. या पुस्तकाची हल्लीं चवथी आवृत्ति प्रसिद्ध झाली आहे. न्या. रानडे यांचीं धर्मपर व्याख्यानें व प्रि. मोडक यांचीं धर्मपर व नीतिपर व्याख्यानें हींही पुस्तकें प्रसिद्ध आहेत. रामभाऊ माडगांवकर यांची तुकारामाची गाथा व तुकारामाचें चरित्र व ज्ञानदेवी हे ग्रंथ सर्वविश्रुत आहेत. तात्पर्य, वरीलप्रमाणें ज्या कांहीं सरस्वती-भक्तांनीं भागवतधर्मावर परिश्रम करून लोकांस मराठी भाषेच्या द्वारें भक्तिमार्ग सुलभ करून दिला आहे ते सर्व प्रार्थनासमाजाचे सभासद होते.

चवथी व सर्वांत मोठी–निदान महाराष्ट्रांत तरी अभूतपूर्व अशी–प्रार्थनासमाजाची कामगिरी म्हणजे पंढरपूर येथील बालहत्या प्रतिबंधक गृहासंबंधाची होय; अशा प्रकारची भूतदयामूलक संस्था महाराष्ट्रांत–किंबहुना सर्व हिंदुस्थान देशांत देखील–आधुनिक काळांत निघालेली अशी हीच पहिली आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. आम्ही पशुपक्ष्यादि प्राण्यांचें संरक्षण करण्याकरितां पांजरपोळादि संस्था काढतों, पण मनुष्यप्राण्यांचें संरक्षण करण्याकडे आमचें तितकें लक्ष नसतें. अशा प्रकारचीं उदाहरणें हिंदुस्थान देशाच्या इतिहासांत पाहावयाचीं असतील तर गौतमबुद्ध किंवा अशोक राजा यांच्या कालाकडे धांव घ्यावी लागेल असें वाटतें. अर्थात् त्या दिशेनें अलीकडच्या कालांत महत्त्वाची कामगिरी केल्याचें श्रेय प्रार्थनासमाजाचें आहे. सदहू पंढरपूर येथील संस्थेची आजवर सर्वच सुजाण–अजाण, सुशिक्षित–अशिक्षित, नव्या–जुन्या, लोकांनीं स्तुति केली आहे. प्रार्थनासमाज या संस्थेविषयीं कांहीं लोकांचे कितीही गैरसमज असोत, पण वरील संस्थेच्या द्वारें बालहत्याप्रतिबंधाच्या बाबतींत प्रार्थनासमाजानें केलेल्या व चालविलेल्या अत्यंत उपयुक्त कामगिरीसंबंधानें कोणीही समंजस मनुष्य धन्यतेचे उद्गार काढल्याशिवाय राहणार नाहीं.

असा खरा प्रकार आहे, तथापि प्रार्थनासमाजाविषयीं सामान्य लोकांना एकंदरींत आपलेपणा वाटत नाहीं हें सत्य आहे. पण त्याचा उपाय आमच्या मतें समाजाच्या आस्थेवाईक सभासदांच्या व हितचिंतकांच्या हातीं आहे. उपाय म्हणजे इतकाच कीं, समाजाच्या मंडळींनीं सामान्य लोकांत–विशेषेंकरून जुन्या

मताच्या लोकांत—अंतःकरणपूर्वक जास्त जास्त मिसळण्याचा व ते समाजांत येतील अशा प्रकारचा प्रयत्न करीत राहणें व मूर्तिपूजा प्रार्थनासमाजास मान्य नसली तरी तशी पूजा करणारे अगर तदनुरूप भजनपूजनादि प्रकार प्रामाणिकपणानें करणारे यांजविषयीं उदार दृष्टि—किंबहुना क्षम्यदृष्टि—ठेवणें हे दोन नियम पाळले तर प्रार्थनासमाजासंबंधाचे लोकांच्या मनांतील गैरसमज निघून जाण्यास बरीच मदत होईल. कोणत्याही बाबतींतले गैरसमज—विशेषेंकरून फार दिवस राहिलेले गैरसमज—दूर होण्यास बराच काल लागतो. परंतु मनःपूर्वक व प्रामाणिकपणानें सतत प्रयत्न करीत राहिल्यास ते गैरसमज निघून गेल्याशिवाय रहात नाहींत. यांत तत्त्वहानि मुळींच होत नाहीं; व याला समाजाच्या पूर्वपरंपरेचा आधार आहे. आम्ही सुमारें पंचवीस वर्षांपूर्वी रत्नागिरीस होतों. त्यावेळीं कांहीं मित्रांकडून आम्हांस कै. वामनराव मोडक रत्नागिरीस असल्या वेळची हकीकत समजली. रत्नागिरी जिल्हा म्हणजे कोंकणस्थ ब्राह्मणांचें—व विशेषेंकरून जुन्या मतांच्या ज्यांच्या मनावर पूर्ण पगडा बसलेला आहे अशा लोकांचें—आगर आहे हें सर्वविश्रुत आहे. वामनरावांची जेव्हां रत्नागिरीच्या हायस्कूलच्या हेडमास्तराच्या जागीं नेमणूक झाली तेव्हां ते प्रार्थनासमाजाचे एक मुख्य सभासद व विधवाविवाहाचे पुरस्कर्ते होते ही गोष्ट तिकडील लोकांस थोड्याच दिवसांनीं समजली. अर्थात् वामनरावांसंबंधानें लोकांचे, सामाजिक बाबतींत, प्रतिकूल ग्रह होणें व त्यांना लांब लांब ठेवण्याकडे लोकांची प्रवृत्ति होणें अगदीं साहजिक होतें. याबद्दल स्वतः वामनरावांना कांहीं एक वाटलें नाहीं. पण त्यांनीं आपल्या शुद्ध आणि सरळ वर्तनानें अल्पकाळांतच लोकांचे गैरसमज घालविले व तदनंतर पुढें वामनराव म्हणजे एक वंदनीय पुरुष होते अशी लोकांची भावना झाली! भगवद्गीतेवर त्यांनीं लिहिलेला “ गीतार्थसार ” हा विद्वत्वद्योतक निबंध ते रत्नागिरीस असलेल्या मुदतींतच लिहून त्यांनीं एका सभेंत वाचला होता.

न्या. रानडे किंवा डॉ. भांडारकर यांच्या वर्तनाचाही हाच नमुना; लोकांत मिसळण्याचा व लोकांस आपल्याजवळ शक्य तों ओढण्याचा त्यांचा परिपाठ असे. न्या. रानड्यांनीं पुण्यास एका व्याख्यानांत, पंढरीची यात्रा व त्या यात्रेसाठीं भक्तिपुरःसर जाणाऱ्या पालख्या आणि दिंड्या यांसंबंधानें, तसेंच विशेषेंकरून वारकरी पंथीय लोकांच्या भोळ्या भावासंबंधानें फार आदराचे व प्रेमळपणाचे उद्गार

काढले होते. त्याचप्रमाणें त्यांनीं कै. राजाराम शास्त्री भागवत यांच्या विनंती-वरून मुंबईस ठाकुरद्वारांतील मुरलीधराच्या देवळांत एकनाथ, ज्ञानेश्वर वगैरे साधुसंतांच्या अवतारकृत्यांसंबंधीं व्याख्यानें दिलीं होतीं. डॉ. भांडारकरांनीं एकदां साताऱ्यास रामाच्या उदात्त चरिताविषयीं Moral elevation of the character of Rama सुंदर व्याख्यान दिलें होतें. याप्रमाणें सदहू तीन अध्वर्यूंचें वर्तन होतें तरी प्रार्थनासमाजाविषयींचे लोकांचे गैरसमज त्यांच्या हयातींत पूर्णपणें दूर झाले होते असें म्हणतां येण्यासारखें नाहीं; तरी ते पुढारी आपल्या प्रयत्नांत कमी करीत नसत, यांत शंका नाहीं. जुन्या गोष्टींशीं असलेला संबंध कायम ठेव-ण्याच्या वरील पद्धतीचें सर नारायण चंदावरकर हे देखील अनुसरण करीत असत. चंदावरकरांनीं सन १९२१–२२मध्यें एका महाएकादशीसारख्या हरिदिनीं पुण्याच्या भांडारकराश्रमांत धर्मविषयक चर्चा करण्याची योजना केली होती व ती झाल्यावर शेवटीं त्यांनींच उपासना केली होती. डॉ. देवदत्तराव भांडारकर यांनीं तर चार वर्षांपूर्वी कलकत्त्यास कांहीं महाराष्ट्रीय मंडळींनीं केलेल्या गणे-शोत्सवांत एका सार्वजनिक गणपतीपुढें कीर्तन केलें असें वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झालें होतें. देवदत्तरावांनीं कीर्तनांत वक्रतुंड, एकदंत अशा गणपतीचें स्तवन केलें असेल असें आम्हांस वाटत नाहीं. “ द्यावा भूमी जनयन् देव एकः ” अशा अखिल ब्रह्मांडाच्या नायकाचेंच गुणसंकीर्तन त्यांनीं केलें असेल. मग तत्त्वहानि ती कसली ? लोकांचे प्रार्थनासमाजाविषयींचे गैरसमज घालविण्याचे मार्ग या दृष्टीनें वरील उदाहरणें दिलीं आहेत. त्याच मार्गाचें सभासदांनीं व हितचिंतकांनीं मनःपूर्वक अवलंबन करीत राहिल्यास सर्व गैरसमज दूर होण्यास उशीर लागणार नाहीं.

उदार धर्मप्रसाराला आमच्या मतें हल्लींचा काल अनुकूल आहे. हल्लींच्या सुशि-क्षित मंडळीचा–विशेषें करून तरुण मंडळीचा–जुन्या धर्मसमजुतींवरील विश्वास डळमळत चालल्याचें स्पष्ट दिसतें. अर्थात् धर्माच्या बाबतींतला पन्नास वर्षां-पूर्वीचा ( लोकांचा ) दुराग्रह आतां राहिला नाहीं. तथापि त्यांना धर्म नकोसा झाला नाहीं. कदाचित् हिंदुलोकांच्या बाबतींत तें शक्यही नाहीं. अशा स्थितींत तरुण मंडळीच्या पुढें आपल्या हिंदुधर्माचीं उदात्त तत्त्वें—गीता, उपनिषदें, साधुसंतांचे ग्रंथ यांच्या आधारानें–जर ठेवलीं तर तीं त्यांना पटल्या-

शिवाय राहणार नाहींत, हें आमच्या कोंकणांतील अल्पशा अनुभवावरून आम्ही सांगतों. पण त्यांत उदार भावना पाहिजे, क्षम्यदृष्टि पाहिजे, व जनतेमध्यें केवळ सद्धर्मप्रसार करण्याचाच हेतु पाहिजे. एवढें धोरण ठेवलें तर भांडारकर, रानडे, मोडक, पंडित यांनीं उपदेशिलेल्या धर्ममतांचा लोकांत जास्त प्रमाणावर प्रसार होण्यास फार दिवस लागणार नाहींत, अशी खात्री वाटते.

---

## प्रकरण सतरावें

# लक्षांत ठेवण्यासारख्या गोष्टी

शंकर पांडुरंग पंडित यांच्या चरित्रांत ज्या कांहीं विशेष लक्षांत ठेवण्यासारख्या गोष्टी आहेत त्यांचा या प्रकरणांत एके ठिकाणीं उल्लेख करावयाचा आहे. त्यांवरून त्यांच्या कारकीर्दींत जे कांहीं विशिष्ट प्रकारचे गुणदोष असतील ते वाचकांस सहज दिसून येतील.

१. मनुष्य अत्यंत गरीब स्थितींत असतां तो स्वपराक्रमानें, केवळ उद्योग व चिकाटी यांच्या जोरावर, उदयास येऊन देशाचें मोठें कार्य कसें करूं शकतो हें ज्यांना पहावयाचें असेल त्यांनीं शंकर पांडुरंग पंडित यांच्या चरित्राचें जरूर अवलोकन करावें. मनुष्य हा आपल्या नशिबाचा कारागीर आहे असें म्हणतात. तें वचन शंकरराव पंडितांना बरोबर लागू पडतें. मनुष्यास सत्कार्यीं महत्त्वाकांक्षेसारखी अंतःप्रेरक शक्ति असल्याशिवाय त्याच्या हातून स्वोन्नतीसारखें किंवा देशोन्नतीसारखें महत्कार्य होणार नाहीं. वयाच्या अठराव्या वर्षीं जो केवळ मांडी मोडून बसून खर्डेघांशीचें काम करणारा, एका लहान मुनसफ कचेरींतील कारकुनीची जागा—आणि तीहि पाऊण शतकापूर्वीच्या परिस्थितींतल्या पगाराची !—मिळविण्यापेक्षां ज्याची अधिक मोठी महत्त्वाकांक्षा नाहीं, पण जो पुढें एकदम घराबाहेर पडतो, वाटेल तेवढ्या अडचणी मोठ्या धैर्यानें सोसतो, झपाझप विद्यासंपादन करतो, अनेक भाषाकोविदत्व प्राप्त करून घेतो, मोठ्या हुद्द्यावर चढतो आणि अनेक लोकोपयोगी कामें करून आपल्या ज़न्माचें सार्थक्य करतो, किंबहुना जो आपल्या विद्येनें व इतर गुणांनीं आपल्या

कुलास, आपल्या जातीस आणि आपल्या देशास जगाच्या दृष्टीनें भूषण आणतो तो पुरुष खरोखरच धन्य म्हटला पाहिजे! सन १८९८ सालीं "तेलंग संप्रदाय" या विषयावरील अत्यंत संस्मरणीय अशा आपल्या भाषणांत न्या. रानडे यांनीं रा. ब. शंकरराव पंडित यांच्याविषयीं पुढील प्रमाणें उद्गार काढले आहेत:—

"Another loss we feel is that of my friend Mr. S. P. Pandit, whose cast of features indicated an unbending will, coupled with a tenacity of purpose and undaunted courage peculiarly his own. His was a life, though short, of great and continuous struggles and noble achievements on behalf of posterity." याचा तात्पर्यार्थ असा:-पंडितांसारख्या दृढनिश्चयी स्वभावाचा, हातीं घेतलेलें काम कधींही न सोडणारा व कसल्याही अडचणींनीं धैर्य खचूं न देणारा असा दुसरा पुरुष मिळणार नाहीं. त्यांचा सार्वजनिक जीवितक्रम अल्प काल टिकला होता तरी तो अविरत परिश्रमपूर्ण असल्यामुळें त्यांच्या हातून भावी पिढ्यांकरितां बहुमोल कामगिरी झालेली आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे, मुंबईच्या "नेटिव्ह ओपिनियन" पत्रानें एकदां ( २२–३–९४ ) म्हटल्याप्रमाणें शंकर पांडुरंग पंडितांनीं आपल्या परीक्षांचा, विद्वत्तेचा व मोटमोठ्या सरकारी नोकऱ्यांचा उपयोग स्वतः ऐषआराम भोगणें एवढ्यापुरताच न करतां त्या तीनही गोष्टींचा होईल तितका लोकांस उपयोग करून दिला ही पंडितांसंबंधानें विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे."

२. रा. ब. पंडितांना इतकें वैशिष्ट्य प्राप्त होण्याला मुख्य कारण म्हणजे त्यांच्या अंगीं सतत असणारा अत्यंत निरलसपणा. त्यांच्या वेळा बहुतेक बांधलेल्या असत. ते रोजनिशी ठेवीत असत असें वाटत नाहीं. पण एक गोष्ट मात्र सत्य आहे. त्यांची एक घटका देखील फुकट जात नसे. ते "ओरिएंटल ट्रान्स्लेटर"च्या जागेवर असतांना मुंबईंत राहात असत. त्यावेळची त्यांची दिनचर्या अशी होती. मुखमार्जनादि विधि व भोजन या नित्याच्या कामांत जो जरुरीपेक्षां जास्त वेळ जाई त्याचा ते वाचनाकडे उपयोग करीत असत. ते त्या वेळीं पर्शियन भाषा शिकत असल्यामुळें सकाळीं चहा किंवा अल्प उपहार झाल्यावर मुनशीजवळ पर्शियन शिकण्याकरितां बसत असत. त्यानंतरचा

स्नान, भोजन होईपर्यंतचा त्यांचा वेळ वाचन, लेखनांत जात असे. मग स्नान-भोजन झाल्यानंतर ते बगींत बसून कचेरींत जात असत. बगींतून जातांनाच "टाइम्स" वाचण्याचा त्यांचा परिपाठ असे; संध्याकाळीं ते कचेरींतून समुद्र-किनाऱ्यानेंच बहुधा पायीं चालत घरीं येत असत, व पाठीमागून गाडी येत असे. त्यांच्याबरोबर घरीं नेहमीं एकाददुसरा शास्त्री असेच. कचेरींतून आल्यावर शंकरराव त्या शास्त्रीबोवांबरोबर "वेदार्थयत्न" किंवा अशाच दुसऱ्या विषया-संबंधानें चर्चा करीत असत. हें झाल्यावर ते आपल्या मुलीला थोडा वेळ शिकवीत असत व नंतर भोजनाला जात असत. भोजनोत्तर पंडितांचें पुन्हां वाचनलेखन चालत असे. रात्रीच्यावेळीं ते बहुधा दुसऱ्याकडून वाचून घेऊन स्वतः ऐकत असत. अकरा वाजतां ते विश्रांति घेण्याकरितां जात असत. याच सुमारास त्यांचे धाकटे बंधु घनश्यामपंत व पुतणे बाबुराव हे त्यांच्या घरींच राहात असत व शाळेंत शिकण्याकरितां जात असत. त्यांना त्यांच्या अभ्यासांतील कांहीं शंका वगैरे विचारावयाच्या असल्यास तें काम शंकरराव स्नानाच्यावेळीं करीत असत. यांच्या स्नानाची वेळ झाली म्हणजे त्या दोघांनीं तयार असावें व "चलारे, तुम्हांस कांहीं विचारावयाचें असल्यास या" असें शंकररावांनीं स्नानगृहांत जातां जातां म्हटलें, म्हणजे यांनीं आपलीं पुस्तकें घेऊन शंका विचाराव्या; इकडे शंकररावांचें स्नान चाललें असतांना त्यांनीं त्या दोघांच्या प्रश्नांचीं उत्तरें देऊन त्यांचें शंकासमाधान करावें; असा क्रम कित्येक वर्षें चालला होता.

३. इतका कमालीचा निरलसपणा राखल्यापासून परिणामरूपानें शंकरराव पंडि-तांच्या हातून केवढी मोठी कामगिरी झाली आहे, हें पाहिलें म्हणजे मन आश्च-र्यानें थक्क होतें! याबद्दलचें सविस्तर विवेचन मागील कांहीं प्रकरणांतून येऊन गेलेलेंच आहे. त्याची इकडे पुनरुक्ति करण्याचें कारण नाहीं. पण पंडितांचे जे समकालीन विद्यार्थी होते व जे पुढें तसेच योग्यतेस चढले त्यांच्या अभ्यासक्रमाशीं शिक्षणाच्या बाबतींत पंडितांची जी प्रगति झाली होती ती ताडून पाहिली म्हणजे पंडितांच्या प्रगतीविषयीं कौतुक वाटतें. शंकरराव पंडित यांच्यावेळचे प्रसिद्ध पुढारी म्हणजे रामकृष्ण गोपाळ भांडारकर, महादेव गोविंद रानडे, वामन आबाजी मोडक व बाळ मंगेश वागळे हेच

होत. यांपैकीं प्रत्येक जणाचें–फक्त मोडक सोडून–इंग्लिश शिक्षण होऊन पंडितांच्या ते बरेंच पुढें गेले होते. फक्त मोडक मात्र घरच्या गरिबीमुळें प्रथम प्रथम दापोलीस फारच रखडले. त्यांना वयाचीं अठरा वर्षें होईपर्यंत मुळीं कोंकणांतून बाहेर पडण्यास संधिच मिळाली नाहीं. तदनंतर पुढें ते मुंबईस निघून आल्यावर त्यांचा नियमितपणें अभ्यासक्रम सुरू झाला. तरी त्यांची सन १८५९ सालीं भांडारकर, रानडे, वागळे यांच्या बरोबर मॅट्रिकची परीक्षा पास झालीच होती. त्याच्या पूर्वी एकवर्षपर्यंत–१८५८ पर्यंत–पंडितांना मुळीं इंग्रजीचा गंध नव्हता व तें शिक्षण कधीं काळीं मिळण्याची संधि येईल ही आशाही पण नव्हती. तरी यदृच्छेनें तशी संधि येतांच पंडितांनीं आलेल्या अडचणींना तोंड देऊन केवळ आपल्या बुद्धिमत्तेच्या व उद्योगाच्या जोरावर वरील सर्व मंडळी सन १८६२ सालीं बी. ए. च्या परीक्षेस बसतात तोंच त्यांना सन १८६१ मध्यें मॅट्रिक पास होऊन कॉलेजांत येऊन गांठलें ! म्हणजे पंडितांचा अभ्यासक्रम इतका शीघ्रगतीनें यशस्वी झाला कीं भांडारकर, रानडे, वागळे हे सन १८६५ मध्यें एम्. ए. होतात तों पंडित हे बी. ए. होऊन–कॉलेजांत फेलोही झाले होते ! यावरून पंडितांचा सर्व अभ्यासक्रम किती कौतुकास्पद होता हें स्पष्ट रीतीनें दिसून येतें.

४. पंडितांच्या उद्योगशील स्वभावापासून झालेला दुसरा एक परिणाम पहा. पंडितांची शाळेंतील व कॉलेजांतील दुसरी भाषा लॅटिन होती. पण ते मराठी कवितेचे खरे भोक्ते व वामन, मोरोपंत यांच्या कवितेचे खरेखुरे रसिक असे भक्त होते. त्यामुळें त्यांना संस्कृतची अडचण भासूं लागल्यावर त्यांनीं त्या भाषेचा अभ्यास केला. पंडितांचा संस्कृतचा अभ्यास इतका चोख झाला व त्यांचें त्या भाषेवर इतकें प्रभुत्व दिसून आलें कीं, ते त्यानंतर सहाच महिन्यांनीं भगवानदास पुरुषोत्तमदास स्कॉलरशिपच्या कठिण समजल्या जाणाऱ्या परीक्षेस बसले. व सन १८७१ सालीं ते डेक्कन कॉलेजांत संस्कृत भाषेचे प्रोफेसर झाले. त्याच्यापूर्वी सन १८६९ मध्यें त्यांनीं कालिदासाच्या विक्रमोर्वशीय व मालविकाग्निमित्र या दोन नाटकांच्या व रघुवंश काव्याचे पहिले सहा सर्ग यांच्या सटीप व सुधारून आवृत्त्या प्रसिद्ध केल्याच होत्या. हें तर झालेंच; पण पुढें सन १८७४ सालीं लंडन येथें भरलेल्या

Oriental Congress ला ( प्राच्यभाषाविशारद लोकांच्या परिषदेला ) मुंबई सरकारतर्फे पंडितांना प्रतिनिधि म्हणून पाठविण्यांत आलें, व त्यांनीं तिकडे कालिदासाच्या कालावर एक अत्यंत विस्तृत व विद्वत्त्वदर्शक निबंध वाचून तिकडे जमलेल्या सर्व विश्वपंडितांकडून मोठी वाहवा मिळविली ! कोणत्याहि भाषेचा लक्षपूर्वक अभ्यास करून तिजवर प्रभुत्व मिळविणें हें त्यांना हातचा मळ वाटत असे असें दिसतें. याचें दुसरें एक उदाहरण आम्हांस थोड्या दिवसांपूर्वी आम्ही बेळगांवास गेल्या वेळीं समजलें. ही माहिती आम्हांस बेळगांवचे प्रसिद्ध वयोवृद्ध व विद्वान् वकील रा. रा. रावजी गंगाधर खोत यांजकडून समजली. व ती हकिकत त्यांना त्यांचे मेहुणे रा. खोटलेकर (हे सन १८७१ सालीं कलादगीच्या हायस्कूलचे हेडमास्तर होते व ही हकीकत त्यांच्या समक्ष घडलेली होती) यांच्याकडून ती रा. खोत यांना समजली होती. रा. ब. पंडित हे सन १८७१ मध्यें कलादगी (हल्लींचा विजापूर) जिल्ह्यांत डिस्ट्रिक्ट डेप्युटी कलेक्टर होते, व तेथून त्यांची त्याच सालीं डेक्कन कॉलेजांतील संस्कृत प्रोफेसरच्या जागीं नेमणूक झाल्यामुळें ते आपलें सामानसुमान घेऊन पुण्यास जाण्याकरितां निघाले होते. त्याच सुमारास मिस्टर रसेल या नांवाचे एक युरोपीअन गृहस्थ दक्षिण भाग शाळाखात्याचे इन्स्पेक्टर असून ते त्याचवेळीं-पंडित निघाले त्यावेळीं-कलादगी येथील शाळा तपासण्याकरितां आले होते. रसेल साहेब व पंडित यां चीएके ठिकाणीं यदृच्छेनें गांठ पडली. त्यावेळीं रसेल साहेबांबरोबर वरील हेडमास्तर रा. खोटलेकर हे होते. पंडित हे तेथले डेप्युटी कलेक्टर असून ते एक संस्कृतज्ञ विद्वान् गृहस्थ होते, हें रसेल यांनीं पूर्वी ऐकलेलेंच होतें. वरील प्रमाणें दोघांची एके ठिकाणीं गांठ पडतांच सहज तुम्ही कोण, आम्ही कोण याची चौकशी झाली व पंडितांची पुण्यास बदली झाल्यामुळें ते तिकडे जाण्यास निघाले होते हें रसेल साहेबांस समजलें. भाषणाच्या ओघांत पंडितांची कॉलेजांतील दुसरी भाषा लॅटिन असून त्यांनीं मागाहून संस्कृतचा अभ्यास करून प्रोफेसर होण्याबद्दलची पात्रता आपल्या ठिकाणीं आणली होती ही गोष्ट रसेल साहेबांच्या लक्षांत आली, व त्याबद्दल त्यांना आश्चर्य वाटलें. स्वतः रसेल साहेबांना लॅटिन भाषा उत्तम प्रकारें अवगत होती, व सहज-किंवा आमच्या लोकांचा कमीपणा बाहेर काढण्याकरितां

तें परमेश्वर जाणें !–त्यांनीं उद्गार काढले कीं, इकडचे कांहीं लोक लॅटिन शिकले तरी त्यांना ती भाषा जुनी, मृत असल्यामुळें बोलतां यावयाची नाहीं; पण हें म्हणणें पंडितांना कबूल नव्हतें. त्यांनीं लागलेंच उत्तर दिलें कीं, भाषा चांगली येत असली तर हिंदीलोक देखील ती सहज चांगल्या रीतीनें बोलूं शकतील. त्याबरोबर रसेल साहेबांनीं पंडितांना लॅटिनमध्यें कांहीं प्रश्न विचारले व त्या प्रश्नांची लॅटिनमध्येंच उत्तरें पाहिजेत असें सुचविलें. पंडितांनीं त्या प्रश्नांचीं लॅटिनमध्यें इतकीं उत्तम व अस्खलित रीतीनें उत्तरें दिलीं कीं त्यांच्या त्या भाषेवरील प्रभुत्वाविषयीं रसेल साहेबांची पूर्ण खात्री झाली व त्यांनीं आपली समजूत चुकीची होती हें प्रांजलपणें कबूल केलें ! इतकेंच नव्हे तर त्यांनीं पुढें असे उद्गार काढले कीं, "तुम्ही खरोखर लॅटिन भाषेचेच प्रोफेसर होण्याच्या योग्यतेचे आहां; तशी तुमची नेमणूक न करतां सरकारानें तुम्हांला संस्कृतचे प्रोफेसर म्हणून नेमलें ही त्यांची मोठी चूक आहे. इकडे इतका लॅटिन पंडित मिळत असतांना सरकार एवढे पैसे खर्च करून लॅटिनचा प्रोफेसर युरोपमधून कशाला आणतें कोणास ठाऊक !" वरील हकीकतीवरून शंकररावांचें लॅटिनवरील प्रभुत्व कोणत्या प्रकारचें होतें हें उत्तम रीतीनें सिद्ध होतें. पण त्याच्यापूर्वी पंडितांनीं डेक्कन कॉलेजांत असतांना लॅटिन भाषेच्या प्रोफेसरचें कित्येक वर्षें काम केलें होतें व त्यांच्या लॅटिन भाषेच्या ज्ञानासंबंधानें कॉलेजचे प्रिन्सिपाल वर्डस्वर्थ साहेब यांचें उत्तम मत असे याचा मागील एका प्रकरणांत उल्लेख आलाच आहे. एकाद्या भाषेवर परिश्रम करून प्रभुत्व संपादन करण्याची कला पंडितांना उत्तम साधली होती याबद्दल शंकाच नाहीं. त्यामुळें फार वर्षांपूर्वी मुंबईचे एक वृद्ध गृहस्थ कै. भाऊराव बिच्चू हे शंकरराव पंडितांसंबंधानें बोलतांना जें नेहमीं म्हणत कीं, "त्यांच्या जिव्हाग्रीं सरस्वतीच बसली आहे" तें केवळ औपचारिक नसून अक्षरशः खरें असे. याप्रमाणें पंडितांना इंग्रजी, संस्कृत, मराठी, गुजराथी, कानडी, पर्शियन, लॅटिन, जर्मन व फ्रेंच इतक्या भाषा उत्तम येत होत्या. म्हणजे ते आपल्या भाषाज्ञानाच्या योगानें "ओरिएंटल ट्रान्स्लेटर" च्या जागेला सर्वथैव लायक होते हें उघड दिसतें. त्यांच्या पाठीमागून त्या जागेवर त्यांच्या इतका जाडा पंडित आजपर्यंत कोणी आला नाहीं.

५. शंकरराव पंडित हे सरकारी नोकरीवर होते तरी त्यांचा नेहमीं स्वतंत्र बाणा असे. सरकारी कामांत अगर हातीं घेतलेल्या कोणत्याही कामांत ते कधीं कसूर करीत नसत. त्यांच्या सर्व नोकरीच्या मुदतींत–किंबहुना त्यांनीं महत्त्वाचीं कामें केलीं त्या मुदतींत–सर रिचर्ड टेंपल, सर जेम्स फर्ग्यूसन व लॉर्ड रे हे मुंबईचे गव्हर्नर होते. पण त्या सर्वांचें पंडितांविषयीं फार उत्तम मत असे. सन १८७९ सालीं सर रिचर्ड टेंपल यांनींच पंडितांची रा. ब. विनायकराव वासुदेवजी यांच्या पाठीमागून "ओरिटएंल ट्रान्स्लेटर टु धि गव्हर्नमेंट ऑफ् बॉंबे," या मानाच्या व जबाबदारीच्या जागेवर नेमणूक केली, याचें कारण बहुधा त्याच्याही पूर्वी दोन वर्षें ( १८७७–७८ ) कलादगी जिल्ह्यांत दुष्काळ पडल्यावेळीं पंडितांनीं उत्तम प्रकारें काम केल्याबद्दलची टेंपल साहेबांस असलेली जाणीव असावी. पुढें टेंपल साहेबांनंतर सर जेम्स फर्ग्यूसन हे मुंबईचे गव्हर्नर झाले. ते देखील पंडितांचें काम पाहून फार खुष असत. ते इतके कीं, सन १८८५ मध्यें त्यांची मुदत संपून ते विलायतेस जावयास निघाले तेव्हां त्यांचा वाटेंत पहिला मुक्काम एडन येथें झाला. तेथून त्यांनीं ( फर्ग्यूसन साहेबांनीं ) पंडितांना एक स्वदस्तुरचें पत्र लिहून त्यांच्या कर्तबगारीविषयीं 'You were my right hand man' असे अत्यंत गौरवयुक्त उद्गार काढले होते! सर जेम्स फर्ग्यूसन यांच्या पाठीमागून लॉर्ड रे हे मुंबईचे गव्हर्नर होऊन आले. लॉर्ड रे साहेबांचें पंडितांच्या विषयीं काय मत होतें याविषयीं इकडे जास्त लिहिण्याचें कारणच नाहीं. सन १८८५ सालीं पुण्याच्या फीमेल हायस्कुलांत घडलेल्या प्रकाराबद्दल जें कांहीं बड्या लोकांनीं व कांहीं उपद्व्यापी वर्तमानपत्रांनीं मिळून मोठें काहूर उठविलें होतें त्यांतून पंडितांचा खरा बचाव लॉर्ड रे यांनींच केला! असें म्हणतात कीं, गव्हर्नर साहेबांचे दोघे साहाय्यक–पील व मेल्व्हिल हे कौन्सिलर्स–व शिक्षणखात्याचे मुख्य लीवॉर्नर साहेब ही सगळी मंडळी पंडितांच्या विरुद्ध होती. पण इतका जबरदस्त विरोधही एकाबाजूला ठेवून लॉर्ड रे साहेबांनीं पंडितांना उचलून धरलें आणि तशी संधि येतांच त्यांनीं त्यांना पोरबंदरला मोठ्या हुद्द्यावर नेमून पाठविलें. लॉर्ड रे हे केवळ नोकरशाहीच्या ओंजळीनें पाणी पिणारे नसून स्वतंत्र विचाराचे व खंबीर हृदयाचे गृहस्थ होते हें त्यांच्या कारकिर्दीत उद्भवलेल्या "क्रॉफर्ड प्रकरणा" वरून तर सिद्ध होतेंच. पण तसल्या (युरोपीअन लोकांच्या खटपटी

मुळें १८८८-८९ मधील खवळलेल्या ) वातावरणांतही त्यांनीं पंडितांचें स्मरण ठेवलें, व त्यांचें नांव उज्ज्वल राखलें हाही त्यांचा (लॉर्ड रे यांचा) थोरपणा होय ! पंडितांबद्दलच्या खटपटींत त्यांच्या कांहीं मित्रांचा-रानडे, वेस्ट, तेलंग वगैरेंचा-संबंध होताच. परंतु स्वतः लॉर्ड रे साहेब हेच अत्यंत उदारमनस्क व न्यायप्रिय असल्यामुळें त्या मित्रांच्या खटपटीस यश आलें. हे साहेब नसते तर असें यश आलें नसतें. पंडित हे जरी आपल्या सरकारी कामांत चोख असत व त्या दृष्टीनें आपल्या वरिष्ठांस असंतुष्ट होण्याचें कारण ठेवीत नसत तरी ते बाकीच्या बऱ्या युरोपिअन अधिकारी लोकांशीं स्वाभिमानशून्य अशा वृत्तीनें कधीं वागत नसत. इंग्लिश शिकून शहाणे झालेले व नोकरीवर राहून स्वतंत्र बाण्यानें वागणारे हिंदी लोक हे त्यावेळच्या कांहीं बऱ्या इंग्लिश लोकांस आवडत नसत. हल्लीं त्या लोकांची दृष्टि जरा बदलली आहे; पण त्यावेळीं-पन्नास वर्षांपूर्वी-त्यांची तशी मनोवृत्ति होती याबद्दल शंका नाहीं. शंकरराव पंडितांच्या बाबतींत आणखी एक-आणि तें बलवत्तर-कारण होतें असें म्हणतात. विलायतेहून इकडे जे मुलकी किंवा लष्करी अधिकारी लोक येत असतात त्यांची इकडील देशी भाषांसंबंधानें परीक्षा घेण्यांत येत असते. ती परीक्षा घेण्याकरितां सरकारकडून एक कमिटी नेमण्यांत येत असते. तशा 'Civil and Military Officers' Examination' कमिटीचे, शंकरराव पंडित हे ओरिएंटल ट्रान्स्लेटर या नात्यानें, त्यावेळीं सेक्रेटरी असत. त्यामुळें सर्व बऱ्या लोकांच्या परीक्षा पंडितांना घ्याव्या लागत असत. कांहीं थोड्या युरोपीअन लोकांचें देशी भाषांचें ज्ञान बरें असे. पण दुसऱ्या पुष्कळ लोकांचें ज्ञान यथातथाच असे! * अशा अर्धवट भाषाज्ञान असलेल्या बऱ्या लोकांना

---

* यासंबंधाचा खरा प्रकार काय होता याचा न्या. तेलंग यांच्या एका भाषणांत उल्लेख आला होता तो अगदीं समर्पक होता. एकदां एका बंगालमधील युरोपीअन सिव्हिलियन मनुष्यानें "Life in the Moffusil" ( बाहेर गांवीं राहाणें ) या नांवाचें पुस्तक प्रसिद्ध केलें होतें. त्यांत त्यानें प्रांजलपणें कबूल केलें होतें कीं, आपली जरी बंगाली भाषेची परीक्षा पास झाली होती तरी ती भाषा आपणांस फारच थोडी समजत असे, किंबहुना मुळींच समजत नसे ! ( न्या. तेलंगांचें "इल्बर्ट बिल" वरील भाषण पाहा. )

पंडितांसारख्या अनेक भाषाकोविद, पण हिंदी, गृहस्थांपुढें परीक्षेकरितां जाण्याचा किंवा त्यांच्यापुढें आपल्या ज्ञानाचें—किंवा अज्ञानाचें !—प्रदर्शन करण्याचा संकोच वाटावा, किंबहुना त्यांत कमीपणा वाटावा यांत आश्चर्य नाहीं ! अशा लोकांपैकीं कांहीं नापास होत असत, व त्यामुळें त्यांची साहजिकच पंडितांवर खप्पा मर्जी होत असे. अर्थात् वरील दोन कारणांमुळें कांहीं थोड्या सत्यप्रिय लोकांशिवाय बाकीच्या सर्व युरोपीअन बड्या लोकांचें पंडितांविषयीं एकंदरींत चांगलें मत नसे. अशा लोकांपैकीं हातांत कांहीं अधिकार असलेल्या मंडळींना संधि आल्यास पंडितांचा एकदां नक्शा उतरविण्याची बुद्धि व्हावी यांत आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं.

६. शंकरराव पंडित हे मोठे तेजस्वी पुरुष होते. एकदां "नेटिव्ह ओपिनियन" पत्रानें म्हटल्याप्रमाणें "पंडित हे मोठे स्वाभिमानी व मनस्वी होते व स्वदेशभक्तीचेंहि वारें त्यांच्या अंगांत विशेष खेळत होतें." खुद्द न्या. रानडे हे "पंडितांसारखा मानी, तेजस्वी, हुषार व निरलस मनुष्य मिळणें फार दुरापास्त आहे." असे वरचेवर तोंडावाटे उद्गार काढीत असत, असें कै. रमाबाई रानडे यांनीं आपल्या "आठवणींत" नमूद करून ठेवलें आहे. स्वतः पंडितांचें नेहमींचेंच वाक्य "I would sooner break than bend" (मान मोडली तरी चालेल, पण ती वांकविणार नाहीं !) हेंच त्यांच्या स्वभावाचें व मनोवृत्तीचें एक द्योतक असे. याबद्दलचीं अनेक उदाहरणें त्यांच्या आयुष्यांत घडलीं होतीं. त्यांपैकीं एक पुण्यांतील फीमेल हायस्कूलसंबंधानें घडलेलें मागील प्रकरणांत निर्दिष्ट केलेंच आहे. अशा स्वतंत्र मनोवृत्तीच्या माणसाचा व कांहीं अरेरावी करण्यास सोकावलेल्या बड्या लोकांचा संबंध आल्यास त्यांचा खटका उडाल्याशिवाय राहाणें शक्य नाहीं. एकदां पंडित मुंबईस असतांना एक बडे युरोपिअन गृहस्थ तिकडे पोलिस कमिशनर होते. दिवाळीच्या दिवसांत लहान मुलांनीं आपल्या घराच्या आवारांत देखील फटाके उडवूं नयेत, असा त्यांनीं एकदां हुकूम काढला होता असें म्हणतात. या आनंदाच्या दिवसांत शंकरराव पंडितांच्या मुलीनें एके दिवशीं संध्याकाळीं आपल्या घराच्या कंपाउंडांत फटाके उडविले. कर्मधर्मसंयोगानें पोलिस कमिशनर साहेब त्याच वेळीं गिरगांव बॅकरोडवरून, पंडितांच्या घरावरून चालले होते. फटाके उडविले गेलेले पाहतांच

साहेब बहादूर थांबले व त्यांनीं त्याबद्दल पंडितांना विचारलें. त्यावरून दोघां-मध्यें बरीच बोलाचाली झाली. पण अखेर तें प्रकरण तडतोडीनें मिटलें असें रा. घनश्यामपंत पंडित यांजकडून आम्हांस समजलें. दुसऱ्या एका प्रसंगीं शंकरराव हे पुण्याच्या रेल्वे स्टेशनावर नेहमींप्रमाणें तिकीट काढून दुसऱ्या वर्गाच्या डब्यांत जाऊन बसूं लागले तों त्या डब्यांत कोणी एक गोऱ्या बाई पूर्वीच बसल्या होत्या. पंडित येतांच त्या बाई त्यांना "काळा आदमी" म्हणून मज्जाव करूं लागल्या. पंडितांनीं त्या डब्यांत बसण्याचा आपला हक्क आहे असें म्हणून ते तेथें बसलेच. बाईनीं तक्रार केली. पण मग स्टेशन मास्तरा-च्या मध्यस्थीनें तें प्रकरण तेथेंच मिटलें.

पंडित हे अहमदनगरला हुजूर डेप्युटी असलेल्या मुदतींत एकदां मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड रे साहेब हे नगरास खासगी रीतीनें आले होते. भेट खासगी स्वरूपाची असली तरी ते साहेब इलाखाधिपति असल्यामुळें जिल्ह्याच्या मुख्य ठिकाणच्या अधिकारी लोकांची त्यांना जाऊन भेटण्याची वहिवाट असते. त्याप्रमाणें सर्व कामगार लोक गव्हर्नर साहेबांस भेटून गेले. पंडित प्रथम कांहीं दिवस गेले नाहींत. त्याच सुमारास रा. ब. रानडे हेहि नगरासच आले होते. त्यांनीं सहज एके दिवशीं पंडितांना "गव्हर्नर साहेबांस भेटावयास गेलां होतां काय?" म्हणून विचारलें. त्यावर पंडितांनीं "बोलावल्याशिवाय जाव-याचें प्रयोजन नाहीं," असा रोकडा जबाब दिला! दुसऱ्याच दिवशीं पंडि-तांना "गव्हर्नर साहेबांची आपणांस भेटावयाची इच्छा आहे" अशा अर्थाची प्रायव्हेट सेक्रेटरीकडून चिठी येतांच पंडित ताबडतोब रे साहेबांस भेटून आले! अशीं आणखी पुष्कळ उदाहरणें दाखवितां येतील. "अशीं तेजस्वी माणसें ज्या समाजांत उत्पन्न होतात त्या समाजाची त्यांच्या योगानें इभ्रत वाढते" असें जें रा. धनेश्वर यांनीं म्हटलें आहे तें अगदीं सत्य आहे.

७ पुण्याच्या मंडळींना विद्वत्ता व वाङ्मय या क्षेत्रांत आपल्या हातून झालेल्या व होत असलेल्या कामगिरीबद्दल एक प्रकारचा अभिमान वाटत असतो तो बरोबर आहे. एकदां तर पुष्कळ वर्षांपूर्वी मुंबईस दोन गृहस्थांमध्यें कडाक्याचा वाद झाल्याचें आम्हांस स्मरतें. त्यांपैकीं एक रत्नागिरीचे रहिवासी होते व दुसरे पुण्याचे होते. दोघेही कोंकणस्थ ब्राह्मणच होते. वादाचा विषय

काय तर पुण्याची मराठी भाषा श्रेष्ठ कीं रत्नागिरीची ? खरें पाहिल्यास "पुण्यास प्रसिद्धीस आलेले लोक बहुतेक सर्व मूळचे कोंकणचेच होते," ही गोष्ट दोघेही वाद करणारे गृहस्थ विसरले होते ! तें कसेंही असो, पण वाद संपल्यावर अखेर पुण्याच्या तर्फे निकाल लागला हें उघडच आहे. या गोष्टीचा विचार केला म्हणजे शंकर पांडुरंग पंडित यांची वाङ्मयक्षेत्रांतील कामगिरी केवळ श्रेष्ठच नव्हे तर असामान्य ठरते ! कारण त्यांनीं कोंकणांतील एका मागसलेल्या संस्थानांत व एका अगदीं लहान खेड्यांत जन्म घेऊन वय थोडेंसें मोठें झाल्यावर विद्या संपादन केली व संस्कृत व मराठी वाङ्मयक्षेत्रांत अत्युत्तम कामगिरी करून आपलें "पंडित" हें आडनांव अन्वर्थक केलें. एवढेंच नव्हे तर नगरचे रा. धनेश्वर यांनीं म्हटल्याप्रमाणें, पंडितांनीं "वेदार्थयत्न" या सारखें मासिक पुस्तक कित्येक वर्षें मराठींत चालवून महाराष्ट्रावर अपरिमित उपकार केले आहेत यांत शंका नाहीं. पंडितांच्या या ऋग्वेदावरील परिश्रमाबद्दल व त्याचप्रमाणें त्यांनीं संशोधनपूर्वक अथर्ववेदाची सभाष्य आवृत्ति प्रसिद्ध केल्याबद्दल त्यांना कित्येकांनीं सायन, मल्लिनाथ इत्यादि आचार्यांची उपमा दिली आहे !

८. आतां पंडितांच्या चरित्रांतील दुसऱ्या एकदोन विशेषांबद्दल चार शब्द लिहिणें जरूर आहे. हे विशेष कदाचित् कित्येकांच्या दृष्टीनें दोषही असतील. पण त्यांच्या ( पंडितांच्या ) वेळच्या परिस्थितीच्या दृष्टीनेंच या विशेषांचा विचार करणें रास्त होईल. पंडितांनीं कोणत्याही सार्वजनिक चळवळींत भाग घेतल्याचें दिसून येत नाहीं. त्यामुळें पंडितांच्या चरित्रांतलें हें एक प्रकारचें वैगुण्य राहिलें आहे असें कित्येकांस वाटण्याचा संभव आहे. त्यांच्या वेळचे कांहीं प्रसिद्ध पुढारी म्हणजे रा. सा. मंडलिक, डॉ. भांडारकर, न्या. रानडे, न्या. तेलंग, व डॉ. भाऊ दाजी यांचीं चरित्रें हल्लीं प्रसिद्ध झालीं आहेत. त्या सर्व चरित्रांत निरनिराळ्या चळवळींचा व त्यांत त्या त्या चरित्रनायकांनीं भाग घेऊन केलेल्या भाषणांचा वगैरे उल्लेख आलेला आहे. तशा चळवळींचा किंवा तशा भाषणांचा पंडितांच्या चरित्रांत संबंध येत नाहीं. फक्त प्रार्थनासमाजाच्या उत्सवांत किंवा अन्यवेळीं शंकररावांनीं केलेल्या कांहीं भाषणांचा तेवढा अल्पसा उल्लेख आला आहे. त्याचप्रमाणें त्यांनीं अहमदनगरला असलेल्या मुदतींत तिकडे व्याख्यानरूपानें वगैरे जे लोकजागृतीचे प्रयत्न केले त्यासंबंधाचेंही थोडेंसें विवेचन आलें आहे. तशाच प्रकारचे

प्रयत्न त्यांनीं अन्य ठिकाणीं—सुरत, कलादगी, खानदेश वगैरे प्रांतांत—केल्याचा दाखला मिळाला नाहीं. पण यासंबंधीं विचार करतांना पंडितांच्या वेळची परिस्थिति काय होती हें पाहिलें पाहिजे. वरीलपैकीं मंडलिक, भाऊ दाजी, तेलंग ही मंडळी स्वतंत्र होती. त्यामुळें त्यांना राजकीय किंवा इतर चळवळींकडे लक्ष देण्यास सवड मिळत असे व त्यांना सरकारी नोकरीची आडकाठी नव्हती. भांडारकर व रानडे हे दोघे जरी सरकारी नोकर होते, तरी त्यांना कामें बेताचीं असून सुट्या पुष्कळ असत. अर्थात् त्यांना आपले उद्योग संभाळून व सामाजिक किंवा तशाच कांहीं इतर चळवळींकडे लक्ष देण्यास मुबलक सवड मिळत असे. राजकीय चळवळींत उघड रीतीनें भाग घेणें हें तर त्यांना नोकरीच्या बंधनामुळें शक्य नव्हतें. पण तशी पंडितांची अनुकूल स्थिति नव्हती. त्यांची बहुतेक सगळीच नोकरी मुलकी खात्यांत, आणि तीही जबाबदारीच्या जागांवर, झाली होती. त्यामुळें सार्वजनिक चळवळींकडे लक्ष देण्यास त्यांना फुरसदच मिळत नसे. शिवाय त्यांच्याकडे सरकाराकडून वाङ्मयात्मक कांहींना कांहींतरी काम नेहमीं सोंपविण्यांत येत असे. अथर्ववेदाचें काम ते अहमदनगरला होते त्या मुदतींत तर चालू होतेंच. पण तें तेवढ्या मुदतींतही न संपतां शंकरराव पोरबंदरला गेल्यावर पुरें झालें. तरी तें त्यांच्या हयातींत प्रसिद्ध झालेंच नाहीं. अखेर अथर्ववेदाचे चारही खंड पंडित दिवंगत झाल्यावर प्रसिद्ध झाल्याचें मागें सांगितलेंच आहे. तेव्हां शंकरराव पंडितांच्या हातून सार्वजनिक चळवळींत भाग घेणें शक्य झालें नाहीं याबद्दल खरें पाहतां विषाद न वाटतां इतकीं जबाबदारीचीं कामें संभाळून ते वाङ्मयक्षेत्रांत इतकी अत्युत्तम कामगिरी कसें करूं शकले याचेंच आश्चर्य वाटतें ! यासंबंधानें नगरचे रा. धनेश्वर म्हणतता कीं, " सरकारी नोकरी संभाळून त्यांनीं ( पंडितांनीं ) बजावलेल्या वाङ्मयात्मक बहुमोल कामगिरीचें विस्तृत क्षेत्र पाहिलें म्हणजे त्यांना इतका उद्योग करण्यास कसें फावत असे याविषयीं अचंबा वाटतो ! ते वेदार्थयत्न चालवीत; संस्कृत पुस्तकें प्रसिद्ध करीत; सवड साधून " इंडिअन अँटिकेरी " सारख्या मासिक पुस्तकांत प्रसिद्ध होण्याकरितां लेखही पाठवीत !" सारांश, सरकारी नोकरीमुळें राजकीय चळवळींत पंडितांना पडतां येणें शक्य नव्हतें, तरी पेनशन घेतल्यावर राष्ट्रीय सभेचे सेक्रेटरी होण्याची

त्यांची लायकी होती असें माहितगार लोकांचें मत होतें, असें रा. धनेश्वर सांगतात.

९. दुसरी एक गोष्ट सहज दृष्टीस पडते. पण तिचेंही कारण पंडितांना नोकरी-करितां मुंबई–पुण्यापासून लांब लांब ठिकाणीं जावें लागत असे हेंच होय. ती गोष्ट म्हणजे पंडितांचा मुंबई युनिव्हर्सिटीशीं व त्या शहरांतील रॉयल एशियाटिक सोसायटी या संस्थेशीं फारच थोडा संबंध येत असे ही होय. विद्वान् व प्राचीन वाङ्मयक्षेत्रांत काम करणारे अशा लोकांचा रॉयल एशियाटिक सोसायटीशीं संबंध आल्याशिवाय सहसा राहत नाहीं. डॉ. भाऊ दाजी, डॉ. भांडारकर व न्या. तेलंग यांच्या उत्तमोत्तम निबंधांपैकीं कांहीं याच संस्थेंत वाचले जाऊन ते मग तिच्या त्रैमासिकांत प्रसिद्ध झालेले आहेत. तसे शंकरराव पंडितांच्या हातचे निबंध त्या त्रैमासिकांत आम्हांस आढळले नाहींत. याचें आमच्या मतें मुख्य कारण पंडितांचें पुष्कळ वर्षेपर्यंत मुंबईपासून लांब ठिकाणीं राहाणें हें होय. भाऊदाजी व तेलंग हे मुंबईचे रहिवासीच होते. भांडारकर हे पुढं पुण्यास राहात असले तरी त्यांचें मुंबईस वरचेवर येणेंजाणें होत असे. जी अडचण पंडितांना होती ती रानड्यांच्या बाबतींतही कांहीं दिवस होतीच. पण पुढें ते मुंबईस जज्ज होऊन आल्यावर त्यांनीं रॉयल एशियाटिक सोसायटीपुढं अनेकवेळां निबंध वाचल्यामुळें ते तिच्या त्रैमासिकांत प्रसिद्ध झाले आहेत.

ह्याच कारणांमुळें पंडितांचा युनिव्हर्सिटीशीं देखील कांहीं दिवस संबंध घडून आला नाहीं. पण पुढें ते मुंबई सरकारचे ऑरिएंटल ट्रान्स्लेटर झाल्यावर त्यांचा तसा संबंध आला असें उघड दिसतें. सन १८८० व १८८१ सालांत युनिव्हर्सिटीच्या वरिष्ठ परीक्षांचे ते परीक्षक होते. व सन १८८३ मध्यें त्यांनीं युनिव्हर्सिटींत विल्सन फायलॉलॉजिकल व्याख्यानमालेंत व्याख्यानें दिलीं.

१०. शंकर पांडुरंग पंडित यांच्या सर्व चरित्राचा—त्यांची पूर्वींची स्थिति काय होती व पुढें त्यांनीं काय केलें या सर्व गोष्टींचा–सूक्ष्म दृष्टीनें विचार केला म्हणजे असें वाटतें कीं, सावंतवाडी संस्थानांतील अधिकारी वर्गानें शंकररावांची त्यांच्या तरुण वयांत जी मानहानि केली व त्यांच्यांत जी ईर्ष्या उत्पन्न केली, त्याबद्दल सर्व लोकांनीं त्यांचे आभार मानले पाहिजेत. झालेल्या मान-

झानिबद्दल स्वतः पंडितांना त्यावेळीं फार वाईट वाटलें असेल. व तें अगदीं स्वाभाविक होतें. पण त्या अधिकारी लोकांनीं आपल्या कृतीनें देशावर मोठे उपकार केले असेंच म्हटलें पाहिजे. कारण त्यावेळीं शंकरराव हे तसे तडका-फडकीनें आपल्या घराच्या बाहेर पडले नसते तर आम्हीं आज त्यांच्या बिनमोल कामगिरीला मुकलों असतों. आणि स्वतः शंकरराव फार तर वाडी-संस्थानांत एक कारकूनच होऊन राहिले असते ! दुसरें काय !

---

## प्रकरण अठरावें

# शेवटचें दुखणें

शंकरराव पंडितांची लॉर्ड रे साहेबांनीं सन १८९० मध्यें आपण विलायतेस जाण्याच्यापूर्वी काठेवाडांतील पोरबंदर संस्थानच्या ॲडमिनिस्ट्रेटरच्या जागीं नेमणूक केल्याचें मागें सांगितलेंच आहे. या जागेवर पूर्वी कांहीं वर्षें युरोपीअन कामगारांच्याच नेमणुका होत गेल्यामुळें त्या जागेचें निदान त्या काळीं तरी फार महत्त्व होतें असें स्पष्ट दिसतें. कारण शंकररावांच्या पूर्वी त्या जागेवर कोणी केनेडी नांवाचे गोरे गृहस्थ होते, व पंडितांनीं पोरबंदरला आल्यावर केनेडी साहेबांपासूनच चार्ज घेतला. केनेडी यांच्याही पूर्वी त्या जागेवर मिस्टर लेली, जे पुढें उत्तर भागचे कमिशनर झाले ते, ॲडमिनिस्ट्रेटर होते. यावरून जागेच्या महत्त्वामुळें शंकररावांची, म्हणजे आपल्या दृष्टीनें चांगल्या लायक माण-साचीच, रे साहेबांनीं मुद्दाम नेमणूक केली होती असें उघड दिसत होतें. शंकरराव त्या जागेवर सन १८९३ च्या ऑक्टोबर पर्यंत म्हणजे जवळ जवळ चार वर्षें होते. त्या चार वर्षांत त्यांना अतिशय काम पडलें. संस्थानचे कारभार साधारणतः नेहमींच भानगडीचे असतात. त्या भानगडींतून संस्थानचा कारभार सुरळीत रीतीनें चालू राहील अशी स्थिति उत्पन्न करण्याला पंडितांना फार श्रम पडले. कोणतेंही आपण पत्करलेलें काम स्वतः लक्ष घालून चोख करण्याचा शंकररावांचा नित्य परिपाठच असे, यामुळें त्यांना त्रास फार पडत असे; पण त्याची ते फिकीर करीत नसत. या प्रमाणें त्यांना चार वर्षें सारखें

काम—व तेंही काठेवाडसारख्या रुक्ष व उष्ण प्रदेशांत—करावें लागल्यामुळें पंडितांना "Bright's disease" हा रोग झाला व त्यामुळें ते सन १८९३ सालच्या ऑक्टोबर मध्यें रजा घेऊन औषधोपचाराकरितां मुंबईस आले. ते प्रथम कांहीं दिवस कै. घनश्याम नीळकंठ नाडकर्णी, हायकोर्ट वकील, यांच्या घरीं एकादा स्वतंत्र बंगला मिळेपर्यंत, व नंतर कांहीं दिवस रा. मंगेशराव कोळसकर, बॅरिस्टर यांच्या घरीं राहिले. पण चांगल्या सोइस्कर बंगल्याचें जमत नाहीं म्हणून शंकरराव मग आपल्या सर्व माणसांसह त्यांचे अत्यंत जिवलग मित्र न्या. रानडे यांच्या बंगल्यावर व त्यांच्याच सहवासांत येऊन राहिले. शंकरराव पंडित व माधवराव रानडे यांचें एकमेकांवरील प्रेम किती उत्कट प्रकारचें होतें हें कै. रमाबाई रानडे यांनीं आपल्या आठवणींत ठिकठिकाणीं जे तत्संबंधाचे प्रसंग वर्णिले आहेत त्यावरून स्पष्ट दिसून येतें. पंडितांच्या प्रकृतीला आराम वाटावा म्हणून डॉक्टरांचे औषधोपचार चालले होते. व न्या. रानडे यांनीं पंडितांच्या शारीरिक व मानसिक स्वास्थ्यासाठीं ठेवलेली व्यवस्था व घेतलेली काळजी हीं सर्व वर सांगितलेल्या बंधुप्रेमाला अनुरूप अशींच होतीं. पण त्या सर्व उपायांचा कांहींएक उपयोग न होतां, आपल्या प्रेमळ मित्राच्या सहवासांत सुमारें दोन महिने राहिल्यानंतर त्याच्याच गृहच्छायेखालीं सन १८९४ मार्च ता. १८ रोजीं शंकरराव पंडितांचें देहावसान झालें. त्या वेळीं त्यांचें वय चौपन्न वर्षांचें होतें.

लगेच दुसऱ्या दिवशीं टाइम्स, गॅझेट, इन्दुप्रकाश, नेटिव्ह ओपिनियन इत्यादि वर्तमानपत्रांतून पंडितांसंबंधाचे मृत्युलेख प्रसिद्ध झाले. त्यांत त्यांचें गुणवर्णन झालेलेंच आहे. त्यांचें या ठिकाणीं प्रयोजन नाहीं. फक्त एका गोष्टी-संबंधानें चार शब्द लिहावेत असें वाटतें. शंकरराव पंडित व माधवराव रानडे यांच्या अकृत्रिम स्नेहाविषयीं मागें उल्लेख आलेलेच आहेत. पंडित हे रान-ड्यांपेक्षां दोन वर्षांनीं वडील होते. शंकररावांचा जन्म १८४० सालांतला व रानड्यांचा सन १८४२ मधला. परंतु दोघांचे स्वभाव भिन्न, व्यवसाय भिन्न, खातीं भिन्न असा खरा प्रकार होता. रानडे स्वभावानें शांत होते. पंडित थोडे तापट होते. पण त्या दोघांचीं मतें बऱ्याच बाबतींत जुळत असत. आणि मुख्य गोष्ट अशी होती कीं रानड्यांची खरी योग्यता पंडितांनीं पूर्ण ओळखली अस-

त्यामुळें त्यांच्याबद्दल त्यांना अत्यंत आदर वाटत असे, व पंडितांच्या विद्वत्तेबद्दल व तेजस्वितेबद्दल रानड्यांना फार आदर व कौतुक वाटत असे. दोघांमधील स्वभावभिन्नता ही कोणाच्याहि नजरेस सहज पडण्यासारखी होती व तशी ती कै. रमाबाई रानडे यांना पूर्ण परिचित असल्यामुळेंच त्यांनीं खुद्द रानड्यांनाच एकदां "पंडितांचें व आपलें इतकें जमतें कसें ?" असें विचारलें होतें असें त्यांच्या आठवणींत नमूद आहे. त्यावर रानड्यांनीं असें उत्तर दिलें कीं, त्याचा अर्थ "पंडितच अधिक चांगले आहेत असा घ्यावयाचा. चांगल्या माणसांत तेजस्विता जास्त प्रमाणानें नजरेस येते." या उत्तरांत खुद्द रानड्यांची उदारमनस्कता दिसून येते; व त्यांचें पंडितांविषयींचें खरें मनच त्यांत प्रतिबिंबित झालें आहे यांत शंका नाहीं. पंडितांच्या विद्वत्तेविषयींचें रानड्यांना काय वाटत होतें हें त्यांनीं एकदां नगरच्या कांहीं मंडळींस जें उत्तर दिलें त्यावरूनच स्पष्ट होतें. याचा मागील एका प्रकरणांत उल्लेख येऊन गेलाच आहे.

---

## प्रकरण एकोणिसावें

# कुटुंबासंबंधीं माहिती

शंकरराव पंडितांच्या वडिलांचें नांव नारायणराव. त्यांना आठ मुलगे व पांच मुली अशीं अपत्यें झालीं. मुलांचीं नांवें—विठ्ठलराव, माधवराव, दत्तारामपंत, भास्करराव, शंकरराव, बाळकृष्णपंत, सीतारामपंत, व घनश्यामपंत; त्यांपैकीं दत्ताराम अगदीं लहानपणींच वारला. शंकरराव हे नारायणरावांचे चिरंजीव असतां त्यांचें शंकर पांडुरंग पंडित हें नांव पुढें कसें चालू झालें, याबद्दलचा खुलासा पूर्वी झालेलाच आहे. त्या सर्वांमध्यें शंकरराव एक कुलदीपक निघाले आणि त्यांनीं स्वपराक्रमानें मोठी विद्या संपादन करून व अनेक लोकोपयोगी कामें करून सत्कीर्ति मिळविली आणि आपल्या "पंडित" घराण्यास, सारस्वत ब्राह्मणजातीस व विशेषतः हिंदुस्थान देशास जगाच्या दृष्टीनें मोठें भूषण आणलें. शंकररावांनीं आपले बंधु, पुतणे, भाचे व इतर आप्तवर्ग यांस मदत करून पुढें आणण्याचा प्रयत्न केला. त्यांपैकीं त्यांचे धाकटे बंधु सीतारामपंत यांचें त्रोटक चरित्र परिशिष्टरूपानें

पुढें जोडलें आहे. त्यांचे कनिष्ठ बंधु घनश्यामपंत हे परमेश्वरकृपेनें हयात असून हल्लीं राजकोटला सुखवस्तु होऊन राहिले आहेत. घनश्यामपंतांचे वडील चिरंजीव केशवराव हेही राजकोटला वकिलीचा धंदा करीत आहेत. शंकरराव यांचे एक पुतणे बाबुराव हे ओरीएंटल ट्रान्स्लेटरच्या कचेरींत होते. व दुसरे एक पुतणे नारायण भास्कर ऊर्फ भाई हे मुंबईच्या हायकोर्टांत ट्रान्स्लेटर–दुभाषी–होते. तसेंच शंकररावांचे एक भाचे राजारामपंत मसुरेकर हे मुंबईंत इन्कमटॅक्स इन्स्पेक्टर होते.

शंकररावांना चार मुलगे व चार मुली अशीं अपत्यें झालीं. वडील मुलगी कृष्णाबाई ही साताऱ्याचे प्रसिद्ध वकील रा. दत्तोपंत नाबर यांना दिली होती. ती हल्लीं मृत आहे. दुसरी एक मुलगी ताराबाई ही अविवाहित असतांनाच वारली. बाकी राहिलेल्या दोघी मुली सौ. क्षमाबाईराव, प्रसिद्ध डॉ. राव यांच्या पत्नी, व सौ. भद्राबाई माडगांवकर, मुंबई हायकोर्टाचे माजी नामांकित व विद्वान् जज्ज सर गोविंदराव माडगांवकर यांच्या पत्नी, या सुशिक्षित आहेत. शंकररावांच्या चार मुलांपैकीं सर्वांत वडील माधवराव हे बॅरिस्टर असून ते प्रस्तुत मुंबईच्या हायकोर्टांत आपला धंदा करीत असतात. दुसरे चिरंजीव वामनराव हे उत्तम आर्टिस्ट असून ते राजकोटला आपला धंदा करीत असतात. दुसरे दोघे, जयवंतराव व विजयराव, हेही चांगले शिकलेले आहेत. त्यांपैकीं पहिले जयवंतराव हे स्कॉटलंडमध्येंच राहिले आहेत. व दुसरे विजयराव हे आय्. एम्. एम्. असून ते लष्करी खात्यांत झांशीला डॉक्टर आहेत.

शंकरराव पंडित यांचें मित्रप्रेम संस्मरणीय होतें. त्यांनीं, आपल्या दोघां मित्रांचें—माधवराव रानडे व वामनराव मोडक यांचें–सदोदित स्मरण राहावें म्हणून आपल्या पहिल्या दोन मुलांचीं–माधव व वामन–अशीं नांवें ठेविलीं होतीं.

पंडितांचे एक भाचे रा. ब. प. गो. मसुरेकर हे बॅरिस्टर असून ते राजकोटला आपला धंदा करीत असतात व सार्वजनिक कामांत लक्ष घालीत असतात. दुसरे एक भाचे श्री. रामचंद्र रावजी नाबर हे मुंबई शेअर बाजारचे पंचवीस वर्षें सभासद असून पहिले दक्षिणी पदवीधर शेअर ब्रोकर म्हणून प्रसिद्ध आहेत.

याप्रमाणें शंकररावांच्या कुटुंबाची थोडक्यांत हकीकत आहे.

## प्रकरण विसावें

# उपसंहार

मीं हल्लीं चार चरित्रें लिहिलीं आहेत. त्या चार चरित्रांना विषयीभूत झालेल्या पुरुषांमध्यें—डॉ. सर रामकृष्ण भांडारकर, न्या. तेलंग, डॉ. भाऊ दाजी, व रा. ब. पंडित यांच्यामध्यें—जे कांहीं सहज दिसून येणारे विशेष आहेत त्यांविषयीं या चवथ्या चरित्राच्या शेवटीं उपसंहाररूपानें चार शब्द लिहावे हें योग्य वाटतें.

१. चारही चरित्रनायकांसंबंधाचा पहिला विशेष हा कीं, ते चौघेही सारस्वत ब्राह्मण जातीचे होते. वस्तुतः या गोष्टीचें तेवढें कांहीं महत्त्व नाहीं; परंतु परवां एका वृद्ध कोकणस्थ ब्राह्मण गृहस्थांनीं माझ्या पुस्तकासंबंधानें बोलतांना " हीं सर्व चरित्रें सारस्वत जातीच्या लोकांचींच आहेत." असें सहज म्हटलें. पुढें हीच गोष्ट जेव्हां मी एका देशस्थ ब्राह्मण गृहस्थांजवळ सांगितली, तेव्हां त्यांनीं म्हटलें कीं "ही गोष्ट तुम्ही मला सांगितली, तेव्हां समजली. त्याच्यापूर्वी मी जरी तुमचीं प्रसिद्ध झालेलीं सर्व पुस्तकें वाचलीं होतीं तरी, ती गोष्ट माझ्या लक्षांतही आली नाहीं." याप्रमाणें माझ्या चरित्रमालेविषयीं दोन गृहस्थांनीं निरनिराळ्या प्रकारचे उद्गार काढल्यामुळें त्यासंबंधाचा खरा प्रकार काय आहे हें इकडे सांगणें इष्ट वाटतें. प्रस्तुतचीं चार चरित्रें मी, चरित्रनायक हे केवळ सारस्वत ब्राह्मणजातीचे होते म्हणून लिहिलीं नाहींत. माझी दृष्टि याहून अगदीं भिन्न आहे. डॉ. भांडारकर, न्या. तेलंग, डॉ. भाऊ दाजी व रा. ब. पंडित यांनीं केलेली देशाची कामगिरी इतकी उच्च प्रकारची व बहुमोल आहे कीं, त्या कामगिरीकडे केवळ जातीच्या दृष्टीनें पाहणें म्हणजे तिचें महत्त्व कमी करणें होय! शिवाय, स्वतः त्या चार गृहस्थांची अशी संकुचित दृष्टि केव्हांही नव्हती. त्यांनीं जी कांहीं सेवा केली ती केवळ आपल्या जातीच्या लोकांची नसून सर्व देशबांधवांची केली आहे.

इकडे दुसरी एक गोष्ट सांगावी असें वाटतें. आपल्या देशांत होऊन गेलेल्या एकाद्या मोठ्या पुरुषासंबंधानें कांहीं माहिती मिळाली म्हणजे तिच्या आधारानें

# शंकर पांडुरंग पंडित

एकादा चरित्रात्मक लेख किंवा लेखमाला लिहिण्याचा मला पुष्कळ दिवसांचा नाद आहे. त्याला अनुसरून मी सुमारें पावशतकापूर्वी बेळगांव येथील "चिकित्सक" पत्रांत–या पत्राचें त्यावेळीं कै. मंगेश जिवाजी तेलंग यांच्या संपादकत्वाखालीं विशेष महत्त्व वाढलें होतें–महर्षि देवेंद्रनाथ टागोर, शेट दादाभाई नवरोजी, न्या. तेलंग व नामदार गोखले यांच्या संबंधाचे चरित्रात्मक लेख लिहून प्रसिद्ध केले होते. इतकेंच नव्हे तर, त्याच्याही पूर्वी सन १८९७ सालीं कै. प्रि. वामन आबाजी मोडक हे जेव्हां वारले तेव्हां त्यांच्यासंबंधाचा जो एक विस्तृत अशा प्रकारचा इंग्लिशमध्यें लिहिलेला चरित्रात्मक लेख मुंबईच्या "इंदुप्रकाशांत" प्रसिद्ध झाला होता तो संपादकाच्या सूचनेवरून मीच लिहिला होता. तात्पर्य, हल्लींचीं चार चरित्रें लिहिण्यांत आमची केवळ जातिविषयक दृष्टि राहणें शक्य नव्हतें व तशी ती नाहीं हें तीं नुसतीं वरवर वाचणारा कोणीही मनुष्य सांगूं शकेल. हीं चरित्रें लिहिण्यांत आमचा हेतु फक्त इतकाच कीं, मागें पडलेल्या कांहीं थोर पुरुषांचीं चरित्रें जगापुढें यावींत. गेल्या सुमारें दहा–पंधरावर्षांत बरींच चरित्रें मराठींत प्रसिद्ध झालीं. पण या चार पुरुषांकडे कोणाचें फारसें लक्ष गेलेलें दिसलें नाहीं. त्यांपैकीं न्या. तेलंग हे दिवंगत झाल्यास आज बेचाळीस वर्षें झालीं; रा. ब. शंकर पांडुरंग पंडित हे जाऊन एकेचाळीस वर्षें झालीं व डॉ. भाऊ दाजी हे निवर्तल्यास आज एकसष्ट वर्षें झालीं. अशा स्थितींत, परमेश्वरानें बुद्धि दिली म्हणून शक्य तेवढी माहिती गोळा करून मी त्या तीन थोर पुरुषांचीं व दहा वर्षांपूर्वी परलोकवासी झालेले डॉ. भांडारकर यांचें--अशीं चार चरित्रें लिहिलीं, या पलीकडे कांहीं नाहीं.

२. सदरील पुस्तकांसंबंधाचा दुसरा विशेष हा कीं, चारही चरित्रनायक हे उत्तम संस्कृतज्ञ पंडित असून त्यांनीं आपल्या प्राचीन वाङ्मयाचें परिशीलन केलेलें असल्यामुळें त्यांच्या अंतःकरणांत आपल्या आर्यसंस्कृतीबद्दल अत्यंत आदर व अभिमान वसत होता. त्यांच्या संस्कृतज्ञानाविषयीं लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, त्यांनीं त्या भाषेचें ज्ञान परिश्रमपूर्वक जुन्या शास्त्रीमंडळींकडून संपादन केलें होतें. त्यावेळीं शाळेंत किंवा कॉलेजांत संस्कृत शिकण्याचीं हल्लींच्या सारखीं साधनें उपलब्ध नव्हतीं. संस्कृत दुसरी भाषा घेऊन मॅट्रिक

परीक्षेंत पास झालेले असे तेलंग हेच एक पहिले विद्यार्थी होते. असो. पुष्कळ खटपट करून सदहू चार गृहस्थ ती भाषा स्वतः शिकले, इतकेंच नव्हे तर त्यांनीं—विशेषेंकरून भांडारकर, तेलंग व पंडित यांनीं—या भाषेसंबंधीं पुस्तकें लिहून व अनेक संस्कृतग्रंथ सटीप प्रसिद्ध करून भावी पिढ्यांना देखील ती गीर्वाण भाषा शिकण्याचा मार्ग सुलभ करून ठेवला आहे.

३. तिसरी विशेष महत्त्वाची गोष्ट त्यावेळीं—म्हणजे सुमारें शंभर सव्वाशें वर्षांपूर्वी—संस्कृत भाषा शिकून आमच्या देशांतील प्राचीन वाङ्मयाचें परिशी-लन करण्याचें काम सारे युरोपीअन लोक करीत असत अशा पंडितांचें जें एक मंडळ—विद्वन्मंडळ—म्हणजे मुंबईची रॉयल एशियाटिक सोसायटी सर जेम्स मॅकिंटॉश यांनीं सन १८०४ मध्यें स्थापन केली, त्यांत प्रथम कांहीं वर्षें हिंदी सभासद नव्हते. सन १८४० सालीं माणेकजी करशेटजी या नांवाच्या पारशी गृहस्थांनीं सदहू सोसायटींत प्रवेश केला. मग पुढील हिंदी लोकांत डॉ. भाऊ दाजी हे सभासद झाले व त्यांच्या पाठीमागून डॉ. भांडारकर व पुढें कांहीं दिवसांनीं न्या. तेलंग असे येऊन मिळाले. इकडील वाङ्मयाचें तुलनात्मक दृष्टीनें संशोधन करून मोठमोठे ऐतिहासिक शोध लावण्याचें काम प्रथम युरोपीअन लोकांनींच गेल्या शतकांत सुरू केलें हें प्रांजलपणें कबूल केलें पाहिजे. परंतु त्यांच्या मार्गांत कांहीं अनुल्लंघनीय अशा अडचणी होत्या ही गोष्ट दृष्टिआड करून चाला-वयाचें नाहीं. त्यांचें संस्कृतभाषेचें ज्ञान कितीही उत्कृष्ट असलें तरी त्यांची संस्कृतिच भिन्न असल्यामुळें हिंदुलोकांच्या परंपरेचें त्यांना पूर्णपणें आकलन होणें शक्य नव्हतें. त्यामुळें वाङ्मयात्मक संशोधन चाललें असतां इकडच्या परंपरेंतल्या कांहीं गोष्टी, ज्या इकडील सुशिक्षित लोकांस सहज समजतील त्या, परकीय मनुष्यास मोठ्या श्रमानंतरही समजण्यास कठीण पडणें अगदीं साहजिक आहे. त्यामुळें आमच्या विद्वान् मंडळींनीं संशोधनक्षेत्रांत प्रविष्ट होणें अत्यंत जरूर होतें. त्याप्रमाणें प्रथम कै. बाळशास्त्री जांभेकर, व मग अनुक्रमें डॉ. भाऊ दाजी, डॉ. भांडारकर, न्या. तेलंग व रा. ब. पंडित ही मंडळी येऊन सामील झाली. दुर्दैवानें बाळशास्त्री हे अल्पवयींच वारले. परंतु बाकीच्या चौघांनीं संशोधन-क्षेत्रांत केलेली कामगिरी केवळ बिनमोल आहे ! यासंबंधानें इकडे विस्तार करण्याचें प्रयोजन नाहीं. विस्तृत विवेचन त्यांच्या त्यांच्या चरित्रांत आलेलेंच

आहे. तें ज्यांची इच्छा असेल त्यांनीं अवश्य पाहावें. इकडे आम्हीं फक्त त्या-संबंधीं अल्पसें दिग्दर्शन करतों.

डॉ. भाऊ दाजी यांनीं आपल्याही पूर्वी होऊन गेलेल्या प्रिन्सेप, टॉमस ब्रेट इत्यादि पंडितांनीं कांहीं शिलालेखांचीं केलेलीं भाषांतरें कशीं चुकीचीं होतीं हें दाखविलें. इतकेंच नव्हे तर त्यांनीं शिलालेखांतील Cave numerals—संख्या-वाचक शब्दांचा व चिन्हांचा अर्थ–जो पूर्वीच्या पंडितांना समजला नाहीं तो कसा लावावयाचा हेंही दाखवून दिलें. त्याचप्रमाणें डॉ. भाऊ यांनीं गुप्तवंशीय राजांनीं स्थापन केलेल्या शकाचा व क्षत्रप वंशीय राजांच्या वंशावळीसंबंधाचा असे महत्त्वाचे शोध लावले.

डॉ. भांडारकरांनीं पतंजलीच्या महाभाष्याचा काल ठरविला. महाभारताची कालमर्यादा दाखविली व श्रीकृष्णाच्या भक्तिसंबंधाचे पंतजलीच्या महाभाष्यांतून दाखले देऊन तो पंथ किती जुना आहे हें सप्रमाण सिद्ध केलें व तत्संबंधानें कांहीं युरोपीअन लोकांनीं काढलेल्या भ्रांतिमूलक कल्पना निरस्त केल्या.

न्या. तेलंग यांनीं रामायण–होमर व गीता–बायबल यांविषयीं सुमारें साठ वर्षांपूर्वी कांहीं युरोपीअन पंडितांनीं उपस्थित केलेल्या वादविवादांत शिरून दोन मोठे विद्वत्त्वदर्शक निबंध लिहिले व डॉ. वेबर व डॉ. लॉरिन्सर यांज-सारख्या मोठ्या नांवाजलेल्या पंडितांस समर्पक उत्तरें देऊन अगदीं कुंठित केलें! तेलंगांचे हे लेख युरोपीअन लोकांमध्यें देखील मग सर्वमान्य झाले.

रा. ब. शंकरराव पंडितांनीं कालिदासाचा काल कांहीं युरोपीअन लेखकांनीं ठरविलेला होता तो कसा चुकीचा होता हें दाखवून त्याचा बरोबर काल कोणता असूं शकेल हें दर्शविण्याचा यत्न केला आहे. त्याचप्रमाणें रघुवंशकाव्याचा व मालविकाग्निमित्र नाटकाचा कर्ता कालिदास हाच आहे किंवा नाहीं, असे कांहीं युरोपीअन लोकांनीं प्रश्न उपस्थित केले होते त्यांनाही शंकरराव पंडितांनीं समर्पक उत्तरें देऊन तत्संबंधाचे त्यांचे सर्व भ्रम दूर केले.

यापेक्षां अधिक विस्तार करण्याचें कारण नाहीं; पण इकडे ध्यानांत ठेवण्यासा-रखी गोष्ट ही कीं या देशांत युरोपीअन लोकांचीच राजकीय सत्ता असल्यामुळें

व पाश्चात्य पंडितांनींच प्रथम गेल्या शतकांत इकडील वाङ्मयाचें तुलनात्मक दृष्टीनें संशोधन करण्याची पद्धत सुरू केल्याकारणानें त्यांच्याच मतांना महत्त्व असे, व ते म्हणतील तें सर्व खरें–वेदप्रमाण–मानण्याकडे लोकांचा कल असे. असा प्रकार असणें हें कांहीं अंशीं साहजिक होतें. पण त्याचा परिणाम मात्र भलताच होऊं लागला. " वाङ्मयसंशोधन " हें एक पाश्चात्य पंडितांच्याच उद्योगामुळें आजकाल शास्त्र बनलें आहे. सत्यशोधन हें त्यांचें साध्य असून विषयाची पूर्ण माहिती व निर्विकार बुद्धि हीं त्यांचीं साधनें आहेत. मनुष्य हा सामान्यतः विकारक्षम असल्यामुळें तीं साधनें सर्वच पंडितांजवळ भरपूर प्रमाणांत असतात असें धरून चालतां येत नाहीं. यामुळें आणि या देशाच्या प्राचीन वाङ्मयक्षेत्रांत–अज्ञातपूर्व प्रदेशांत म्हणा हवेंतर!–प्रथम बरींच वर्षें केवळ पाश्चात्य पंडितांचाच अनिरुद्ध संचार चालू असल्यामुळें कित्येकांकडून मोठीं विलक्षण मतें प्रतिपादन करण्यांत येऊं लागलीं! एकानें ( वेबरनें ) म्हटलें कीं रामायण हें होमरच्या "ईलियड" चा आधार घेऊन लिहिलें असून त्याचा रचनाकाल फार तर ख्रिस्ती शकाच्या आरंभास असावा! दुसऱ्या ( कर्नल एलिस ) एका पंडितानें आपलें मत प्रसिद्ध केलें कीं, महाभारत हें ख्रिस्ती शकाच्या सोळाव्या शतकांत लिहिलें गेलें असलें पाहिजे! तिसऱ्या एका विद्वान ( लॉरिन्सर ) गृहस्थानें प्रतिपादन केलें कीं, भगवद्गीता ही मुळीं बायबलाच्या आधारानें लिहिलेली असून तिचा काल खिस्ती शकाच्या आठव्या शतकानंतर केव्हांतरी असावा! चवथ्या एका ( विल्सन ) पंडितानें म्हटलें कीं, मालविकाग्निमित्र हें नाटक कालिदासाचेंच असेल असें वाटत नाहीं! आणि पांचव्यानें ( वेबरनें ) शंका काढली कीं कालिदासानेंच रघुवंश काव्य लिहिलें असें खात्रीनें सांगतां येत नाहीं! यापेक्षां ही मालिका अधिक लांबविण्याचें कारण नाहीं व वरील अपसिद्धांतांतील पोकळपणा स्पष्ट करून दाखविण्याकरितां जास्त शब्द खर्चण्याचेंही आज प्रयोजन नाहीं. तसलीं विलक्षण मतें जरा बारीक नजरेनें तपासूं लागलों म्हणजे तीं प्रतिपादन करणाऱ्यांचें इकडील हिंदुलोकांच्या पूर्वपरंपरेविषयींचें गाढ अज्ञान व पुऱ्या माहितीच्या अभावीं मोठमोठे सिद्धांत बांधण्यांत दिसून येणारें त्यांचें धाष्टर्य हीं मात्र स्पष्ट दिसून येतात! वरील सारखे त्यांचे–युरोपीअन पंडितांचे–चुकीचे सिद्धांत किंवा मतें

तशींच राहूं दिलीं असतीं तर ऐतिहासिक दृष्टीनें आमच्या देशाचें–आमच्या संस्कृतीचें–फार नुकसान झालें असतें. आधींच आमच्या लोकांच्या ऐतिहासिक दृष्टीच्या अभावामुळें आमच्या कांहीं ग्रंथांचे काल निश्चितपणें ठरविणें फार कठीण झालें आहे. त्यांत पुन्हां मोठ्या नांवावर–युरोपीअन लोकांचें सगळेंच चांगलें, सगळेंच बरोबर अशा सार्वत्रिक समजुतीमुळें–चुकीच्या सिद्धांतांची भर पडली असती तर वाङ्मयक्षेत्रांतील घोंटाळ्याला सीमाच उरली नसती! पण ती आपत्ति परमेश्वरकृपेनें टळली आणि त्याबद्दलचें मुख्य श्रेय डॉ. भाऊ दाजी, डॉ. भांडारकर, न्या. तेलंग व रा. ब. पंडित यांना दिलें पाहिजे. या दृष्टीनें विचार केला म्हणजे या थोर पुरुषांनीं देशाची–आर्यसंस्कृतीची–केवढी महत्त्वाची कामगिरी केली आहे ह्याचें चित्र मनश्चक्षूंपुढें उभें रहातें व त्यांच्या-बद्दल पराकाष्ठेचा आदर व अभिमान वाटतो. आजकाल लोकप्रियता इतकी सवंग झाली आहे कीं, कोणीही पांच पंचवीस निबंध लिहिले किंवा चार कादं-बऱ्या रचल्या अथवा वर्तमानपत्रांतून सरकारी अधिकारी लोकांवर कडक टीका केली कीं, आम्ही त्याला "मोठे" म्हणतों. मग ज्या लोकांनीं केवळ स्वाभिमानानेंच प्रेरित होऊन नव्हे, तर परिश्रमपूर्वक संपादन केलेल्या आपल्या विद्वत्तेच्या व बिनतोड कोटिक्रमाच्या जोरावर पाश्चात्य पंडितांनीं आमच्या हिंदु संस्कृतीवर केलेल्या हल्ल्यांना समर्पक उत्तरें देऊन परतविलें व आमच्या देशाच्या इतिहासांत होऊं घातलेला घोंटाळा टाळला, त्यांच्या मोठेपणाला व देशाभिमानाला कोणतें माप लावावयाचें? या सगळ्याचें तात्पर्य एका शब्दांत सांगावयाचें म्हणजे वरील चार थोर पुरुषांनीं आपल्या विद्वत्तेनें युरोपीअन-पंडितांनीं सुरू केलेल्या तुलनात्मक पद्धतीनें त्याच युरोपीअन पंडितांच्या बरोबरीनें संशोधन करणारे लोक, हिंदुस्थानांतही आहेत हें जगास दाखविलें व त्या दृष्टीनें आमच्या देशास भूषण आणून आपलें नांव अजरामर करून ठेविलें आहे!

४. सदहू पुरुषांमधील चवथा विशेष हा कीं, त्यांनीं आपल्या मोठमोठ्या कामांच्या गर्दीत मातृभाषेकडे दुर्लक्ष केलें नाहीं. डॉ. भाऊ दाजी यांनीं मुकुंद-राज आदिकरून आपल्या कविश्रेष्ठांसंबंधीं निबंध लिहिले आहेत. डॉ. भांडार-करांचीं मराठी साहित्यशास्त्रावरील व्याख्यानें व तसेच त्यांचे मराठींत लिहि-लेले धर्मपर लेख व व्याख्यानें हे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. न्या. तेलंग यांनीं मराठींत

ग्रंथरचना केली आहे व अनेक प्रसंगीं व्याख्यानें दिलीं आहेत. रा. ब. पंडित यांनीं परिश्रमपूर्वक तयार केलेली तुकारामाची गाथा, मोरोपंतांचें सर्वांत गहन काव्य बृहद्दशम, व वेदार्थयत्न हे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. गेल्या शतकाच्या मध्यास मराठी भाषेची किती अनुकंपनीय स्थिति होती हें कै. गोविंद नारायण माडगांवकर यांनीं एके ठिकाणीं निवेदन केलें आहे. ते म्हणतात, "पूर्वीं मराठी भाषा म्हणजे रानटी व अज्ञान लोकांची भाषा असें मानून ती शिकण्याचे कोणी परिश्रम घेत नसत. त्या भाषेंत कोश, व्याकरण, गद्यपद्यादि ग्रंथ नसल्यामुळें शास्त्री, पंडित व पुराणिक हे लोक कोणी मराठी भाषेंत कांहीं लिहावयास लागला म्हणजे त्याचा उपहास करीत !" हा प्रकार पुढें कांहींसा बदलला. तरी नवीन शिकलेल्या लोकांचा आपल्या जन्मभाषेविषयींचा अनादर कायम होताच. या गोष्टीचा विचार केला म्हणजे भाऊ दाजी, भांडारकर, तेलंग, पंडित यांचें मातृभाषेवरील प्रेम अत्यंत प्रशंसनीय ठरतें व त्यांच्या वरील कृतींचें महत्त्व नजरेंत भरतें.

५. वरील चार चरित्रांवरून दिसून येणारा पांचवा विशेष म्हणजे त्या चरित्रनायकांच्या ठिकाणीं वसत असणारी अत्यंत तीव्र अशी ज्ञानलालसा व ती पुरविण्यासाठीं वाटेल तेवढे श्रम करण्याची त्यांची तयारी ! वस्तुतः सारस्वत ब्राह्मणानें ज्ञानलालसा बाळगली—अर्थात् सरस्वतीचें सेवाव्रत आरंभिलें—तर त्यांत मोठें असें कांहीं नाहीं; पण ही ज्ञानाची हौस त्या मंडळींना जी प्रथमपासून लागली ती शेवटपर्यंत टिकली हेंच विशेष. दुसरीं कामें त्यांच्या आड आलीं नाहींत. त्यांचा धंदा त्यांना बाधक झाला नाहीं. उलट त्यांपैकीं कांहींच्या धंद्यांचा विचार केला म्हणजे त्यांच्या उद्योगशीलतेविषयीं अधिकच कौतुक वाटतें व त्यांच्याबद्दलचा आदर दुणावतो. डॉ. भांडारकरांची सगळी नोकरी शिक्षणखात्यांतच झाल्यामुळें व त्यांचा वाङ्मयाशीं कमीअधिक संबंध येत राहिल्यामुळें त्यांच्या ज्ञानलालसेला अवकाश तरी मिळे; पण डॉ. भाऊ दाजींचा धंदा डॉक्टरीचा, न्या. तेलंगांचा धंदा बॅरिस्टरीचा आणि रा. ब. पंडितांची सगळी नोकरी मुलकी खात्यांत, या सर्व गोष्टींचा विचार केला म्हणजे त्या तिघांच्या ज्ञानलालसेचें व परिश्रमशीलतेचें विशेषच कौतुक वाटतें व त्यांनीं केलेली वाङ्मयसेवा पाहून मन थक्क होतें ! इतकें असून पुन्हां डॉ. भाऊ दाजी व न्या. तेलंग यांच्या पाठीमागें राजकीय व इतर सार्वजनिक कामें होतींच. तीं इतकीं कीं, एकदां इंदुप्रका-

शानें ( न्या. तेलंगांविषयीं लिहितांना ) म्हटल्याप्रमाणें "त्यांच्याइतका सार्वजनिक कामें करणारा त्यावेळीं मुंबईंत दुसरा कोणीच नव्हता."

६. सहावा विशेष हा कीं, आमचे चारही चरित्रनायक हे उदारमतसंप्रदायांतीलच होते. उदारमत संप्रदाय म्हणजे "Liberal School of Thought" या संप्रदायालाच न्या. रानडे यांनीं एकदां–१८९८ मध्यें–थोरपणानें "तेलंग संप्रदाय" हें नांव दिलें होतें. या संप्रदायाचें पहिलें लक्षण म्हणजे "पूर्ण आशावादित्व!" या लक्षणाविषयीं न्या. रानड्यांनीं असे उद्गार काढले आहेत:–"We should be unworthy of ourselves if we are not hopeful with our traditions which transcend the tradition of every other nation of the world." आमची परंपरा, आमचा गतकाल इतका उज्ज्वल आहे कीं, तसा दुसऱ्या कोणत्याही राष्ट्राचा मिळणार नाहीं! ही एकच गोष्ट आमच्या देशाच्या भावी काळाविषयीं आम्ही तसा उद्योग करीत राहिल्यास, आशा बाळगण्यास पुरे आहे, असा सदहू तेलंग–रानडे संप्रदायाचा पूर्ण विश्वास आहे. अन्य शब्दांत सांगावयाचें म्हणजे मनुष्याला आपल्या पूर्वजांच्या कृतींविषयीं अभिमान असल्याशिवाय त्याच्या हातून आपणांस चांगली स्थिति आणण्याकरितां नेटाचा उद्योग होणार नाहीं. या न्या. रानड्यांच्या कसोटीला आमचे चारही चरित्रनायक उत्तम प्रकारें उतरतात. त्यांचा आपल्या पूर्वजांविषयींचा किंबहुना आपल्या आर्यसंस्कृतीसंबंधाचा अभिमान व आदर किती कडकडीत असे याचें विस्तृत विवरण त्यांच्या चरित्रांत आलेंच आहे. त्याची इकडे पुनरुक्ति करीत नाहीं.

सदरील संप्रदायाचें दुसरें मुख्य लक्षण म्हणजे आपल्याला देशाच्या उन्नतीकरितां यत्न करावयाचे ते सर्व दिशांनीं, राजकीय, सामाजिक, औद्योगिक वगैरे दिशांनीं केले पाहिजेत. आधीं एक व मग दुसरें असें उपयोगी नाहीं. पण आतां हें तत्त्व सर्वमान्य झाल्यामुळें त्याविषयीं अधिक चर्चा करण्याचें कारणच नाहीं. आमच्या चार चरित्रनायकांपैकीं डॉ. भाऊ दाजी व न्या. तेलंग हे दोघेतर राजकीय, सामाजिक व इतर सार्वजनिक चळवळी करीतच असत. डॉ. भांडारकर व रा. ब. पंडित हे सरकारी नोकर असल्यामुळें त्यांना राजकीय चळवळींत फारसें पडतां येत नसे. तरी डॉ. भांडारकरांनीं एक दोन प्रसंगीं तशा चळवळींत

देखील भाग घेतला होता. सामाजिक बाबतींत मात्र दोघांचीं मतें सदरील संप्रदायाला अनुरूप अशींच होतीं. रा. ब. पंडितांच्या स्वभावाची ठेवणच अशी होती कीं, ते स्वतंत्र असते तर राष्ट्रीय सभेंत सहज सामील झाले असते. नगरचे रा. धनेश्वर तर असें सांगतात कीं, पेनशन घेतल्यावर पंडित हे राष्ट्रीय सभेच्या सेक्रेटरीच्या जागेला सर्वथैव लायक होते असें माहितगार लोकांचें मत असे. तात्पर्य, सदरील चौघेही पुरुष उदार मतवादी होते.

७. आणखी एक या चार गृहस्थांसंबंधाची लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे त्यांचें नैतिकवर्तन, व त्यांचें शील चांगलें होतें ही होय. या गोष्टीचें कदाचित् कित्येकांस महत्त्व वाटणार नाहीं. परंतु ते सगळेच आपापल्या काळीं सुधारकांचे अग्रणी होते हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. आणि सुधारक म्हणजे वाटेल तें खाणारे, वाटेल तें पिणारे, वाटेल तसें वागणारे, म्हणजे व्यसनी असा सामान्य लोकांचा समज असे. पण असा व्यसनाधीनपणाचा आरोप वरील चौघां-पैकीं एकाही गृहस्थावर करतां येण्यासारखा नव्हता; दुसरी गोष्ट ही कीं, ते चौघेही जरी नवीन पद्धतीनें वरिष्ठ पायरीपर्यंत शिकलेले होते, व सुधारणापक्षाचे कैवारी होते तरी त्यांचें घरांतील मंडळीशीं—विशेषें करून आईबापांशीं—अत्यंत प्रेमळपणाचें व आदराचें वर्तन असे. आमच्या महाराष्ट्रांतील कांहीं लोकांच्या दृष्टीनें "मोठे" म्हणून ठरलेल्या कांहीं पुरुषांच्या ठिकाणीं आपल्या वडिलांसंबंधीं उघड दिसून येणाऱ्या अनादर बुद्धीचा विचार केला म्हणजे डॉ. भाऊ दाजी, डॉ. भांडारकर, तेलंग, पंडित यांचें अखेरपर्यंतचें वर्तन अत्यंत स्तुत्य व आमच्या हिंदुपरंपरेला अनुरूप होतें असें स्पष्ट ठरतें. यासंबंधानें त्यांच्या त्यांच्या चरित्रांत विस्तार केलेला आहे, तो वाचकांनीं जरूर तर अवश्य पहावा. न्या. तेलंगांनीं तर आपल्या पितृवात्सल्याच्यापायीं आपणांवर मृत्यूच ओढवून घेतला होता हें प्रसिद्ध आहे.

८. आतां फक्त वरील चार चरित्रनायकांमधले आमच्या दृष्टीनें व्यक्तिशः जे विशेष वाटले तेवढ्यांचा उल्लेख करून हा उपसंहार संपवितों. चौघेही विद्वान् होते, थोर होते; चौघांनींही देशाची बहुमोल कामगिरी केली आहे, हें झालेंच. पण त्यांतलेही विशेष गुण कोणी विचारल्यास आम्ही—

१. डॉ. भाऊ दाजीमध्यें–जुन्या माहितीचा संग्रह करण्याची हौस व परोपकारबुद्धि;

२. डॉ. भांडारकरांमध्यें–एकमार्गीपणा व धर्मबुद्धि;

३ न्या. तेलंगांमध्यें–बुद्धिमत्ता, चतुरस्रपणा व सार्वजनिक कामाची हौस;.

४. रा. ब. पंडितांमध्यें–निरलसत्व व तेजस्वीपणा;

हे गुण प्रामुख्यानें दिसत होते असें सांगूं. प्रत्येकाच्या अंगीं इतर गुण होतेच, पण आम्ही सांगितलेले विशेषेंकरून दिसत होते.

कोणत्याही दृष्टीनें पाहिलें तरी सदर्हू चार थोर पुरुष आपल्या विद्वत्तेनें व कामगिरीनें सर्व महाराष्ट्रीय लोकांस वंदनीय झालेले आहेत. आणि त्यांचीं चरित्रें आमच्या तरुण मंडळींना अत्यंत अनुकरणीय व स्फूर्तिदायक वाटतील याबद्दल आम्हांस मुळींच शंका वाटत नाहीं.

---



दानशूर सीताराम नारायण पंडित,
बार-ॲट-लॉ.

## परिशिष्ट

# सीताराम नारायण पंडित

सीताराम नारायण पंडित हे शंकर पांडुरंग पंडित यांचे धाकटे बंधु असून त्यांचा सन १८४८ सालीं बांबुळी गांवीं जन्म झाला. सीतारामपंत हेही शंकररावांप्रमाणेंच बुद्धिमान् व वाङ्मयप्रेमी होते. त्यांनीं आपल्या स्वकष्टानें मिळविलेल्या संपत्तीचा सत्कार्यीं उपयोग करून मोठी कीर्ति मिळविली आहे.

सीतारामपंतांच्या बालपणांत त्यांच्या प्राथमिक शिक्षणाची कुडाळ येथेंच सुरवात झाली. परंतु मग ते त्यांचे वडील बंधु विठ्ठलराव हे वेंगुर्ल्यास खासगी नोकरीवर होते तेथें गेले व त्यांचें मराठी पांच इयत्तेपर्यंतचें प्राथमिक शिक्षण वेंगुर्ल्यासच झालें. तितकें शिक्षण पुरें झाल्यावर इंग्रजीचें पहिलें पुस्तक त्यांनीं घरींच तयार केलें. तेव्हां त्यांचें वय तेरा वर्षांचें होतें. पुढें ते त्यांचे दुसरे वडील बंधु भास्करराव हे कराचीस नोकरीवर होते तेथें शिक्षणाकरितां गेले. परंतु कराचीस थोड्या दिवसांनीं सीतारामपंत आजारी पडल्यामुळें ते कोंकणांत बांबुळीस परत आले, व आजारांतून ते बरे झाल्यावर इंग्रजी शिक्षणाकरितां रत्नागिरीस गेले. तेथें त्यांनीं अडीच वर्षांत इंग्रजी सात इयत्ता पुऱ्या करून ते वयाच्या सतराव्या वर्षी मॅट्रिकच्या परीक्षेस बसून त्यांत पास झाले. रत्नागिरीस त्यावेळीं डॉ. रामकृष्णपंत भांडारकर हे हेडमास्तर होते. ते सीतारामपंतांची तीव्र बुद्धि व स्मरणशक्ति पाहून फार खुष होत असत.

रत्नागिरीच्या शाळेंतून मॅट्रिकची परीक्षा पास झाल्यावर सीतारामपंत हे मुंबईस एल्फिन्स्टन कॉलेजांत पुढील अभ्यासाकरितां जाऊं लागले. पहिल्याच वर्षाच्या शेवटीं ते एफ्. ई. ए. च्या परीक्षेंत पास होऊन पहिल्या वर्गांत पहिले आले. पुढें लिटलगोच्या परीक्षेंतही ते पहिले आल्यामुळें त्यांना हिंदुस्थान सरकारची “ गिलक्राइस्ट ” स्कॉलर्शिप मिळाली.

शंकरराव पंडित त्यावेळीं पुण्यास डेक्कन कॉलेजांत होते. सीतारामपंतांची बुद्धिमत्ता पाहून त्यांना विलायतेस आय्. सी. एस्. करितां पाठविण्याची त्यांची फार इच्छा होती. त्यांस (सीतारामपंतांस) वर सांगितल्याप्रमाणें सरकारी स्कॉलरशिप मिळाल्यापासून दुजोरा मिळाला, व त्याप्रमाणें सीतारामपंतांस इंग्लंडला

पाठविण्यांत आलें. विलायतेस जाणें त्या दिवसांत जातिबहिष्काराच्या भीती-मुळें सोपें काम नव्हतें. परंतु त्याबद्दलचे सर्व विचार दोघांही बंधूंनीं एका बाजूस सारून अखेर पंतांना विलायतेस पाठविलेंच ! इंग्लंडला गेल्यावर सीतारामपंतांनीं पहिल्याच सहामाहींत होणाऱ्या परीक्षेंत बरेंच वरचें स्थान पटकाविलें, परंतु दुसऱ्या सहामाहींत ते आजारी पडल्यामुळें त्यांचे पुष्कळ दिवस व्यर्थ गेले, व वर्ष अखेरच्या परीक्षेंत त्यांचा नंबर जितका वर यावयास पाहिजे होता तितका आला नाहीं, व त्यावेळची वयाची अट—उमेदवाराचें वय एकवीस वर्षांचें असलें पाहिजे ही—त्यांच्या आड आल्यामुळें सीतारामपंतांना शेवटीं आय्. सी. एस्. चा नाद सोडून द्यावा लागला. व त्यांनीं मग कायद्याचा अभ्यास सुरू केला. सिव्हिल सर्व्हिस परीक्षेचा अभ्यास चालू असतांना सीतारामपंतांचे सुरेंद्रनाथ बानर्जी, कृष्ण गोविंद गुप्त, बिहारी लाल गुप्त हे सहाध्यायी होते. कायद्याचा अभ्यास संपल्यावर सन १८७० मध्यें सीतारामपंत बॅरिस्टर होऊन मुंबईस परत आले व हायकोर्टांत धंदा करूं लागले. पण पुढें एका मित्राच्या सूचनेवरून ते काठेवाडांत राजकोटला गेले व ते तिकडे बॅरिस्टरीचा धंदा करूं लागले.

बॅरिस्टरच्या धंद्यास आवश्यक असे सर्व गुण सीतारामपंतांच्या ठिकाणीं होते. त्यामुळें त्यांचा धंदा राजकोटला उत्तम रीतीनें चालून त्यांना बरीच किफायत होऊं लागली. धंद्याच्या कामांत सीतारामपंतांना मुंबईचे प्रसिद्ध बॅरिस्टर सर फेरोजशहा मेथा व मिस्टर बद्रुद्दीन तय्यबजी यांच्याशीं वरचेवर सामना करावा लागत असे. पण केव्हां केव्हां त्यांच्यावरही पंत मात करीत असत ! त्यामुळें सीतारामपंतांचा त्यावेळीं जो मेथा व तय्यबजी यांच्याशीं स्नेहसंबंध जुळला तो शेवटपर्यंत कायम होता.

पण सीतारामपंतांची खरी योग्यता त्यांनीं मिळविलेल्या द्रव्यनिधीवर नसून ती त्याचा सदुपयोग करण्यावर होती. सीतारामपंतांच्या ठिकाणीं परोपकारबुद्धीचें बीज ते आपल्या घरीं बालपणांत होतें तेव्हांपासूनच रुजलें होतें. ते आपल्या लहान वयांत देखील गरीब सोबत्यांना आपल्या कल्पनेप्रमाणें यथाशक्ति साहाय्य करीत असत. अशा रीतीनें पंतांची मदत घेतलेले कांहीं गृहस्थ बांबुळीगांवांत अद्यापही हयात आहेत ! या परोपकारबुद्धीच्या बीजाला पुढें अंकुर फुटून सीतारामपंतांच्याजवळ द्रव्यनिधि सांठविला

आतांच त्याला अत्यंत परिणत स्वरूप प्राप्त झालें व अखेर अखेर तर ते " धर्मात्मा " हें बहुमानपद पावले. सीतारामपंतांच्या धर्मादायाचा विस्तार पाहिला म्हणजे ते आधुनिक काळांतील एक कर्णावतार होते असें वाटूं लागतें. त्यांनीं मोठमोठ्या शिक्षणसंस्थांना तर उदार हस्तानें द्रव्यसाहाय्य केलेंच, परंतु कांहीं वर्षांपूर्वी काठेवाडांत दुष्काळ पडल्यावेळीं गोरगरीबांना अन्नदान करून व मूक जनावरांचे प्राण संरक्षण करून त्यांनीं आपली अतुल भूतदया प्रकट केली होती ! सीतारामपंतांच्या धर्मबुद्धीची खरी किंमत ही होती कीं त्यांना आपल्या कृतीची परिस्फुटता होणें बिलकूल आवडत नसे. त्यांची इच्छा फक्त आपल्या संपत्तीचा सत्कार्यीं उपयोग व्हावा एवढीच असे. परमेश्वरानें आपल्यास जी संपत्ति दिली आहे, ती गोरगरीबांना यथाशक्ति मदत करण्याकरितां व इतर उपयुक्त कार्याला खर्च करण्याकरितां दिली आहे अशी त्यांची भावना असे. त्याबद्दल आपल्या नांवाची प्रसिद्धि व्हावी अगर स्तुतिस्तोत्र गाइलें जावें अशी वासना त्यांच्या मनाला कधींच शिवली नाहीं. याबद्दलचीं एक दोन उदाहरणें इकडे दिल्यास त्यायोगें सीतारामपंतांच्या सर्व चारित्र्यावर उत्तम रीतीनें प्रकाश पडेल असें वाटतें.

प्रोफेसर धोंडो केशव कर्वे यांची व त्यांनीं हिंगणें येथें काढलेल्या संस्थांची आतां सर्वांस माहिती झालीच आहे. त्या संस्थांच्या बाल्यावस्थेंत सीतारामपंत पंडित यांच्या दातृत्वाचा त्यांना केवढा उपयोग झाला हें खुद्द प्रो. कर्वे यांच्याच अत्यंत साध्या व म्हणूनच केवळ अव्याजमनोहर अशा भाषेंत देणें हेंच बरें वाटतें. अण्णासाहेब कर्वे हे आपल्या आत्मवृत्ताच्या ३१६ व्या पृष्ठांत पुढीलप्रमाणें लिहितातः—

ज्यांच्या ऋणांतून आश्रम कधींही मुक्त होणार नाहीं, असे अत्यंत थोर मनाचे राजकोटचे गृहस्थ श्रीयुत सीताराम नारायण पंडित यांच्या भेटीचा लाभ याच वर्षी झाला. या गृहस्थांच्या औदार्याविषयीं मी ऐकलें होतें, व एका सामाजिक परिषदेच्या प्रसंगीं त्यांची मुद्दाम गांठ घेतली होती. त्यावेळीं त्यांना रिपोर्ट वगैरे देऊन मी एवढीच विनंति केली कीं, सवड होईल तेव्हां आपण आश्रम प्रत्यक्ष येऊन पहावा. त्या गृहस्थांना आग्रह करणें बरें नव्हे हें जाणून

मी ती गोष्ट तशीच राहूं दिली, व पुढें विसरूनही गेलों! पण १९०३ सालच्या दिवाळीच्या सुट्टींत एके दिवशीं सकाळीं माझे मित्र व त्यांचे पुतणे श्रीयुत नारायण भास्कर पंडित, ट्रान्स्लेटर, हायकोर्ट, यांना घेऊन ते एकदम आश्रमांत आले, व त्यांनीं आम्हां सर्वांना चकित केलें. सुट्टीमुळें बऱ्याच मुली घरीं गेल्या होत्या, पण कांहीं थोड्या तेथें होत्या. तेथील एकंदर सर्व व्यवस्था पाहून त्यांना फार आनंद झाला व ते खूष होऊन परत गेले. नंतर कांहीं दिवसांनीं त्यांनीं तीनशें रुपयांचा एक चेक पाठविला, व कांहीं अडचण उत्पन्न झाली असतां ती कळविण्याबद्दल एक पत्र लिहिलें. पण अशी विशेष जरूरी उत्पन्न होईपर्यंत ते थांबले नाहींत! थोड्याच दिवसांनीं त्यांनीं दरमहा ५० रुपये मदत पाठविण्याला सुरवात, केली. व मुलींची संख्या वाढलेली पाहून ही मदत त्यांनीं ७५ रुपये केली. आम्ही १९०४ सालीं नवीन इमारतीची योजना केली, तेव्हां ते पंचगणीला राहात होते; तेथें जाऊन मी त्यांना भेटलों व सर्व हकीक़त सांगितली. मी परत आल्यानंतर लवकरच त्यांनीं एक हजार रुपयांचा चेक पाठविला. या त्यांच्या उपकारांनीं माझें अंतःकरण अगदीं भरून आलें, व त्या स्थितींत मी त्यांना एक कृतज्ञतापूर्वक पत्र लिहिलें. त्यांनीं एवढेंच उत्तर लिहिलें कीं, " तुमचे व संस्थेचेच उलट मजवर उपकार आहेत. तुम्ही माझ्या पैशाला योग्य मार्ग दाखविला. " हे त्यांचे शब्द औपचारिक नव्हते. इमारतीचें काम सुरू झाल्यानंतर सहासात महिने ते दरमहा पांचशें रुपये पाठवीत असत. या त्यांच्या उपकारांच्या ओझ्यानें मी अगदीं दडपून गेलों, आणि पैशाच्या अडचणींतून पार पडलों असें वाटल्याबरोबर मी त्यांना तसें कळविलें. श्रीयुत पंडित हे आश्रमाची प्रगति अगदीं काळजीपूर्वक पाहात आहेत. व दरसाल निदान पांचशें रुपये तरी ते मदत पाठविल्यावांचून राहात नाहींत. त्यांच्याकडून आजपर्यंत सुमारें १३,००० रुपये आले आहेत. **जगांत अशाप्रकारचे पुष्कळसे दाते तरी निपजावे, अगर जगांतली पुष्कळशी विपत्ति तरी कमी व्हावी!**

आम्हांस तर वरीलप्रमाणें, उलटे कर्वे यांचेच आपणांवर उपकार आहेत असें पंडितांनीं म्हटल्याचें वाचून " नता करुनि मुक्तही म्हणसि मी बुडालों ऋणें " या मोरोपंतांच्या ओळीची आठवण होते!

दुसरा दाखला सीतारामपंतांनीं बनारस येथें मिसेस ॲनी बेझंट यांनीं स्थापन केलेल्या "सेंट्रल हिंदु कॉलेज" ला एक मोठी रक्कम देणगीरूपानें दिल्यावेळचा आहे; सन १९०१ सालीं सीतारामपंत पंडित यांनीं सदरील कॉलेजास १६,००० रुपयांची देणगी दिली. यासंबंधानें पुण्याच्या "मराठा" वर्तमानपत्रानें (त्याचे त्यावेळीं रा. नरसिंह चिंतामण केळकर हे संपादक होते असें वाटतें) आपल्या ता. ३ मार्च १९०१ च्या अंकांत पुढीलप्रमाणें लिहिलें आहे:—

"Mr. Pandit is known to be a singularly unselfish donor; and, as in the case of several other donations, he would not have his name given out to the public in connection with the present donation to the Central Hindu College. But as a result of a long correspondence with college authorities, he had to yield. Mr. Pandit's noble words in his letter to the college authorities were to this effect:

"I cannot conclude this letter without an earnest and fervent prayer that the All-wise Father in his infinite love and mercy may bless your work and carry it to a successful issue. Within the range of human wisdom and activity, no work can be imagined so well-calculated to advance the best interests of our country. To me it is a blessing unspeakable that it has been given to me to be able to assist in that work, in however small a degree; many an earnest heart, seeking for the highest, which has been rendered desolate by the unreal hand of our ignorant materialism, but will be filled with a new hope, a new life, and an unaccustomed joy; and will bless the founders of the Central Hindu College for their self-sacrificing efforts to restore the religion and ethics of the Hindus. To them, far more than to any one else apply the words of the Gita:—

य इदं परमं गुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति ।
भक्तिं मयि परां कृत्वा मामेवैष्यत्यसंशयः ॥ ६८ ॥

नच तस्मान्मनुष्येषु कश्चिन्मे प्रियकृत्तमः ।
भविता नच मे तस्मादन्यः प्रियतरो भुवि ॥ ६९ ॥"
(गी. अध्याय १८)

सारांश, सीतारामपंत पंडित हे एक अत्यंत स्वार्थरहित दाते होते व वरील देणगीसंबंधांत आपल्या नांवाची परिस्फुटता होऊं नये अशी त्यांची फार इच्छा होती, व त्याप्रमाणें त्यांनीं बनारस येथील कॉलेजच्या अॅनी बेझंट आदि मंडळींना विनंतिपूर्वक कळविलें होतें. परंतु अशा निःस्वार्थ बुद्धीच्या उदारात्म्याची जगास माहिती झाली पाहिजे असें साहजिकच त्या मंडळींना वाटलें. अर्थात् उभयतांमध्यें बराच पत्रव्यवहार झाला. अखेर बाईंच्या आग्रहामुळें पंडितांना आपली अट मागें घ्यावी लागली. बाईंनीं मग पंडितांचें नांव तर प्रसिद्ध केलेंच, पण त्यांनीं पंडितांचें मूळपत्रही प्रसिद्ध केलें. त्यावरून पंडितांच्या कल्पना किती उदात्त होत्या, त्यांच्या भावना किती उच्च प्रकारच्या होत्या व त्यांची आपल्या हिंदुधर्माबद्दल किती पूज्यबुद्धि होती या गोष्टी स्पष्ट होतात. पण इतकें सर्व असूनही ते किती पराकाष्ठेचे विलीनमनस्क होते हेंही उत्तम रीतीनें दिसून येतें. पंडितांनीं आपल्या पत्रांत बनारस कॉलेज स्थापन करणाऱ्या मंडळींचें मनःपूर्वक गौरव करून अशा सत्कार्यांत कांहीं तरी अल्पस्वल्प साहाय्य करण्याचें आपणांस सामर्थ्य दिल्याबद्दल परमेश्वराचे उपकार मानले आहेत ! अशाच सत्पुरुषांना पुढील भर्तृहरीचे उद्गार अक्षरशः तंतोतंत लागू पडतात :–

भवन्ति नम्रास्तरवः फलोद्गमैः ।
नवांबुभिर्भूरिविलंबिनो घनाः ॥
अनुद्धताः सत्पुरुषाः समृद्धिभिः ।
स्वभाव एवैष परोपकारिणाम् ॥ १ ॥

हें हिंदु संस्कृतीच्या दृष्टीनें तर प्रशंसनीय झालेंच. पण सीतारामपंत पंडित हे त्याच्याही पलीकडे गेले होते. किंबहुना ते

अयं निजः परोवेति गणना लघुचेतसाम् ॥
उदारचरितानां तु वसुधैव कुटुंबकम् ॥ १ ॥

या कविवचनांत गोविलें गेलेलें तत्त्व स्वतःच्या आचरणानें कसे सिद्ध करीत होते हें पुढील हकीकतीवरून स्पष्ट होईल.

सीतारामपंतांच्या धर्मबुद्धीला जात, रंग किंवा धर्म हीं आड येत नसत. त्यांनीं जशी एक मोठी देणगी—मागें सांगितल्याप्रमाणें—काशीच्या हिंदु कॉलेजास दिली, तशीच त्यांनीं अलिगड येथील मुसलमान धर्मीय कॉलेजास ४५०० रुपयांची देणगी दिली. यासंबंधानें त्यांची जी विचारसरणी होती तिजवरून ते कांहीं कांहीं गोष्टींचा विचार करतांना किती व्यापक किंबहुना राष्ट्रीय दृष्टि ठेवीत असत हें उत्तम रीतीनें दिसून येतें. सीतारामपंतांना या कालाच्या ( १९०१ च्या ) सुमारें २५ वर्षांपूर्वी सरकारी स्कॉलरशिप मिळाली होती. तें आपण देशाचें कर्ज घेतलें होतें असें मानून त्या रकमेंत त्यांनीं पंचवीस वर्षांचें व्याज मिळविलें आणि ती सगळी रक्कम हिंदु व मुसलमान यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणांत वरीलप्रमाणें देणगीच्या रूपानें देऊन टाकली ! याप्रमाणें सर्व हकीकत लिहून " मराठा " म्हणतोः—"What an object lesson of unselfish patriotism and self-sacrifice ? Mr. Pandit, will, we hope, excuse us, if, only to further illustrate this object lesson, we inform our readers that he has spent more than Rs. 20,000 in the last famine."

" मराठा " नें सांगितल्याप्रमाणें सीतारामपंत हे नुसते इतकी मोठी रकम—वीस हजार रुपये—सन १९००-१९०१च्या काठेवाडांतील दुष्काळांत खर्च करून थांबले नाहींत ! तर ते आपला किफायतशीर धंदा सोडून दिवसांचे दिवस दुष्काळपीडित लोकांना भेटण्यांत व त्यांची समक्ष चौकशी करण्यांत घालवीत असत ! ! या निःस्वार्थबुद्धीचें, अत्यंत शुद्ध अशा भूतदयेचें व त्यांतूनच झळकणाऱ्या खऱ्याखुऱ्या देशाभिमानाचें कोणत्या शब्दांनीं वर्णन करावें ?

याशिवाय सीतारामपंतांनीं लहान मोठ्या माणसांना व संस्थांना किती द्रव्यसाहाय्य केलें याचा हिशोबही सांगतां यावयाचा नाहीं. बांबुळीच्या कांहीं त्यांच्या ओळखीच्या गृहस्थांची स्थिति अजूनहि गरिबीचीच आहे. व बालपणांतील ह्या आपल्या मित्रांस सीतारामपंतांकडून दरमहाचे दरमहा नियमितपणें आमरण द्रव्यसाहाय्य चालू होतें. कोणीहि कुटुंबाचा कर्तासवरता

पुरुष नाहींसा होऊन तें कुटुंब निराधार व अनाथ पडलें आहे व त्यास मदतीची जरूर आहे, असें खात्रीलायक समजतांच सीतारामपंतांकडून त्यास मदत मिळूं लागे, व ती नियमितपणें मिळे. एकट्या सावंतवाडी संस्थानांत केवळ सीताराम-पंतांच्याच मदतीनें सांवरून वर आलेलीं अशीं कैक कुटुंबें तिकडील पुष्कळ लोकांच्या माहितींत आहेत. Charity begins at home ( धर्मबुद्धि मूळां-तच असावी लागते ) हें तत्त्व सीतारामपंतांच्या बाबतींत चांगलेंच प्रत्ययास येत असे. त्यांच्या दयामूलक उदार स्वभावानुरूप त्यांचा दानधर्म अमर्याद असे. तरी आपली जन्मभूमि, आप्त, इष्ट, आपली जात यांस ते विसरले नाहींत. श्री. कर्वे यांच्या संस्थांना पंडितांनीं द्रव्यसाहाय्य केल्याचा मागें उल्लेख आलाच आहे. त्याचप्रमाणें डिप्रेस्ड क्लासेस मिशन, सारस्वत विद्यार्थी साहाय्यक मंडळी, सारस्वत दीनवत्सलसंघ इत्यादि संस्थांना पंडितांनीं सढळ हातांनीं मदत केली आहे.

सीतारामपंतांच्या सर्व दानधर्मांत निःस्वार्थबुद्धि व प्रसिद्धीची नावड हे गुण किती मोठ्या प्रमाणांत असत हें स्पष्ट करण्याकरितां कांहीं उदाहरणें मागें दिलींच आहेत. आणखी एकादें दुसरें लक्षांत ठेवण्यासारखें उदाहरण द्यावें असें वाटतें. एकदां पंडितांनीं वाडीसंस्थानांत कुडाळ येथें धर्मार्थ इस्पितळ बांधण्यासाठीं म्हणून बरीच मोठी रक्कम दिली. तेव्हां तेथील लोकांनीं व संस्था-नांतील अधिकारी मंडळींनीं इस्पितळास सीतारामपंतांचेंच नांव द्यावें अशी सूचना केली. पण ती त्यांना पसंत न पडून इस्पितळ हें "महाराणी व्हिक्टोरिया" यांचें स्मारक म्हणून त्यांचें नांव त्या इमारतीस द्यावें असें त्यांनीं लिहून कळविलें व त्याप्रमाणें मग महाराणी यांचेंच नांव देण्यांत आलें! त्याचप्रमाणें सीतारामपंतांनीं लोकहितार्थ सतत चालविलेल्या प्रयत्नांचें व केलेल्या दानधर्मांचें स्मरण ठेवून ब्रिटिश सरकारानें सन १९१२ सालीं त्यांना "केसर–ई–हिंद" नांवाचें सुवर्णपदक बहाल केल्याचें जाहीर केलें. व तें जाहीर रीतीनें समारंभ करून राजकोट येथें पोलिटिकल एजंटकडून सीतारामपतांना अर्पण करण्याचें ठरलें. परंतु या गोष्टीची सीतारामपंतांना बातमी लागतांच त्यांनीं मुंबईस कांहीं काम काढून ते राजकोटहून तेथें गेले व मुंबईसच कांहीं आठवडे राहिले! आणि या रीतीनें त्यांनीं एजंटाच्या मुखांतून होणारी आपली स्तुति आपण ऐक-

ण्याचा प्रसंग टाळला ! स्वतःची मर्दुमकी गाऊन आपल्याभोंवतीं आपणच दिवे ओवाळावयाची अगर आपल्या स्तुतिपाठकांकडून ओवाळून घ्यावयाची ज्यांना अनिवार हौस असते, त्यांनीं सीतारामपंत पंडितांच्या वरील उदाहरणापासून कितीतरी बोध घेण्यासारखा आहे !

सीतारामपंतांच्या दानधर्मांतील दुसरा एक विशेष सांगण्याचा राहिला. ते एकाद्या संस्थेला द्रव्यसाहाय्य करूनच राहात नसत, तर ते त्या संस्थेच्या जबाबदार मंडळीशीं वरचेवर पत्रव्यवहार करून तिच्या प्रगतीविषयीं चौकशी करीत असत व केव्हां केव्हां तिच्या कारभारांत सुधारणा करण्याविषयीं सूचना करीत असत. अशा प्रकारचा पंडितांचा सारस्वत विद्यार्थी साहाय्यक मंडळीबरोबर पत्रव्यवहार कांहीं वर्षांपूर्वी झालेला आम्हांस माहीत आहे. सीतारामपंत हे राष्ट्रीय वृत्तीचे असून जातीच्या संस्थेसंबंधानें इतकी बारीक चौकशी करीत असत याविषयीं कदाचित् कोणास शंका येईल म्हणून त्यांनीं एकदां त्याबद्दल खुलासा केला होता. त्यांचें म्हणणें इतकेंच कीं, आम्ही कितीही उदार बुद्धीचे असलों तरी ज्या लोकांचा आमच्याशीं अत्यंत निकट असा—लग्नमुंजी वगैरे शुभकार्यांपासून तों मृत्युविधीपर्यंत—नेहमीं कांहींना कांहीं संबंध येण्याचा संभव असतो, अशा लोकांच्या हिताकरितां ज्या संस्था निघाल्या असतील त्यांना यथाशक्ति साहाय्य करणें व त्या संस्था चांगल्या रीतीनें चालतील अशी तजवीज करणें हें त्या लोकांपैकीं प्रत्येक घटकाचें कर्तव्य आहे.

खासगी रीतीचा सीतारामपंतांचा दानधर्म किती तरी असे. त्यांतूनही विद्यार्थिवर्गाला त्यांचें द्रव्यसाहाय्य फारच असे. कोणत्याही जातीचा गरीब विद्यार्थी असो, तो सीतारामपंतांकडे मदतीकरितां गेला व तो निराश होऊन परत आला असें सहसा कधीं घडलें नाहीं. इतकेंच नाहीं तर त्यास मदतीचें आश्वासन देऊन ते त्याला एक भगवद्गीतेची प्रत फुकट देत असत, व यांतील तूं नित्यनियमानें एक अध्याय–निदान पांच श्लोक–वाचीत जा असा अत्यंत हितकर उपदेश करून मग त्याला निरोप देत असत.

सीतारामपंतांच्या सर्व चरित्राचा अगदीं काळजीपूर्वक विचार केला म्हणजे असें वाटतें कीं, आपल्या महाराष्ट्रांत आधुनिक काळांत जे कांहीं सुशिक्षित लोक होऊन गेले व जे कांहीं आज हयात आहेत, त्यांत ज्यांनीं आपल्या धंद्यांत

प्रामाणिकपणानें पैसे मिळवून त्याचा मुक्त हस्तानें सत्कार्यीं उपयोग केला अशीं सीतारामपंत पंडितांच्या सारखीं उदाहरणें फार फार थोडीं मिळतील !

शंकर पांडुरंग पंडित यांनीं सरस्वतीची निःसीम सेवा करून जसें वाङ्मयक्षेत्रांत आपलें " पंडित " हें नांव अजरामर करून ठेवलें आहे, तसेंच सीतारामपंतांनीं आपल्या संपत्तीचा सत्कार्यीं व्यय करून आपल्याला अमरकीर्ति केलें आहे. सीतारामपंतांची बुद्धिमत्ता अगर उद्योगशीलता ही शंकरावांच्यापेक्षां मुळींच कमी नव्हती. त्यांचें सगळें आयुष्य बॅरिस्टरीच्या धंद्यांत गेल्यामुळें त्यांच्या हातून वाङ्मयक्षेत्रांत कांहीं कामगिरी होऊं शकली नाहीं. तथापि त्यांचा इंग्लिश, संस्कृत, फ्रेंच, मराठी, व गुजराथी इतक्या भाषांतील उत्तमोत्तम ग्रंथांशीं चांगला परिचय असे. ते हर्बर्ट स्पेन्सर, जॉन स्टुअर्ट मिल वगैरे तत्त्ववेत्त्यांचे ग्रंथ वाचीत असत व त्या दिशेनें त्यांचा दांडगा व्यासंग असे. भगवद्गीतेवर त्यांची अत्यंत भक्ति असून ते तिचा नित्य पाठ करीत असत.

असे हे सत्पुरुष सन १९१८ सालीं वयाच्या सत्तरावे वर्षी वारले. सीतारामपंत हे काठेवाड प्रांतांत फार लोकप्रिय झालेले होते. यामुळें तेथील सर्व लहानथोर माणसांस त्यांच्याविषयीं अत्यंत प्रेम व आदर वाटत असे. त्यांच्या अखेरच्या दुखण्याची बातमी समजतांच असंख्य लोक त्यांच्या प्रकृतीविषयींची चौकशी करण्याकरितां त्यांच्या बंगल्यावर येत असत. त्यांचें देहावसान झाल्यावर त्यांची प्रेतयात्रा निघाली, तेव्हां त्यांच्या शेवटच्या दर्शनाकरितां म्हणून सुमारें चार हजार लोक बरोबर चालले होते.

सीतारामपंतांच्या पाठीमागें त्यांचे दोन मुलगे व दोन मुली आहेत. मुलांपैकीं एक श्री. रणजितराव हे पंडित मोतीलाल नेहरू यांचे जांवई असून ते अलाहाबादेस बॅरिस्टरीचा धंदा करीत असतात. राजकीय चळवळींतही ते पुढाकार घेऊन काम करीत आहेत. दुसरे श्री. प्रतापराव हे मुंबईस व्यापारधंदा करीत असतात. मुलींपैकीं एक स्वतः बी. ए. असून ती रा. रा. आर्. आर्. नाबर, बी. ए., यांना दिली आहे. ते मुंबईस शेअर–ब्रोकरचा धंदा करतात. व दुसरी रा. ब. प. गो. मसुरेकर यांस दिली आहे; ते राजकोट येथें बॅरिस्टरी करीत असतात; व सार्वजनिक कामांतहि लक्ष घालीत असतात. मागें एकवार सांगितल्याप्रमाणें हे दोघेही पंडितांचे भाचे आहेत.

---